# अमृतबिंदू

संत तुकाराम महाराजांच्या निवडक अभंगांचे संकलन


## रविंद्र फडके, बंगळुरु

rgphadke@gmail.com

http://tukaramasteachings.blogspot.in/





## प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान

www. esahity. com

esahity@gmail. com

प्रकाशन : १० डिसेंबर २०१६ (मोक्षदा एकादशी)

ॐ



# अमृतबिंदू अर्थात

## संत तुकाराम महाराजांच्या निवडक अभंगांचे संकलन

# संकलना विषयी लेखकाचे निवेदन व अर्पण पत्रिका

जय नंदलाला.

सर्व प्रथम परमपूज्य सद्गुरू श्री. आक्कांच्या चरणी माझा साष्टांग नमस्कार करतो.

सुमारे ३ १/२ वर्षांपूर्वी बंगलोर येथील श्री.नंदलाला सेवा समितीतर्फे आयोजित संतान गोपालकृष्ण यज्ञाच्या संबंधित सभेला आम्ही सर्व कार्यकर्ते जमलो होतो. त्यावेळी समितीमधील एक सद्स्य श्री. जयराम ह्यांनी मला म्हटले की त्यांना संत तुकाराम महाराजांच्या अभंगाचा अर्थ समजून घ्यावा व मी त्यासाठी त्यांना मदत करावी. संत तुकाराम महाराजांनी जवळ जवळ ४००० अभंग लिहिले आहेत.त्यातील कोणतेही अभंग Randomly घ्यावे व त्यांचा अर्थ सांगावा असे ठरले.

पण वेळ व अंतर ह्याचा विचार करता रोज ह्या साठी एकत्र येणे शक्य नाही म्हणून ईंटरनेट चे माध्यम पण वापरता येईल; ह्या कल्पने मधून अभंगांचा अर्थ लिहिण्याचे काम ब्लौगवर लिहावे असे ठरले. लिखाण सुरवातीस ईंग्रजीत केले होते पण कांही जणांनी मराठीत लिहावे म्हणून सुचवले. त्यामुळे मराठी व ईंग्रजी दोन्ही भाषांमधे लिखाण झालेल आहे. हे सर्व अभंग http://tukaramasteachings.blogspot.com ह्या ब्लौगवर वाचायला उपलब्ध आहेत. त्यातील मराठी भाग येथे वेगळा विषयवार संकलित केला आहे

अभंगाचा अर्थ स्पष्टीकरणासाठी खालिल प्रमाणे रचना वापरावी असे पण ठरले.

१) मूळ अभंग

२) शाब्दिक अर्थ.

३) अभंगाचा अर्थ समजावा म्हणून लागणारी माहिती वा अभंगाची पार्श्वभूमिका.

४) अभंगाचे अर्थस्पष्टीकरण.

५) अभंगापासून मिळणारी शिकवण.

सुमारे दीड वर्षभरापूर्वी महाराष्ट्रामधील ई-साहित्यचे श्री.रा.रा.सुनीलजी सामंत ह्यांनी हे अभंग ई-पुस्तकरूपे प्रसिद्ध करावे असे सुचवले पन त्यावेळी तुकाराम महाराजांनी जे सांगितले आहे त्यावर पूर्णपणे लेखन झालेले नव्हते.. आता ९० च्या जवळ अभंगांचे अर्थ स्पष्टीकरण ब्लौगवर लिहिले आहे व तुकाराम महाराजांच्या उपदेशाचे सार ह्या निवडलेल्या अभंगांमधे आले आहे अशी मनास खात्री वाटते म्हणून आता हे अभंगांचे संकलन केले आहे. मी श्री, सुनीलजी सामंत यांचा अत्यंत आभारी आहे.त्यांच्या सूचेनेमुळेच पुस्तक करावे ह्या विचाराला चालना मिळाली.

संत तुकाराम महाराज हे महाराष्ट्रातले गृहस्थाश्रमी संत होते. संत ज्ञानदेव महाराजांना वारकरी पंथाचा पाया तर तुकाराम महाराजा हे पंथाचा कळस होत, असे सर्वमान्य मत आहे. तुकाराम महाराजांचा काल स.१६०२ ते १६४३ असा आहे.

तुकाराम महाराजांच्या अभंगांमधे आपल्याला विविध भावनांचे आविष्करण आढळते , जसे पांडुरंगाबद्दल उत्कट प्रेम, वैराग्य,भक्ती, महाराजांचे विविध अनुभव ईत्यादी. तसेच अभगांमधे अध्यात्माचे विविध पैलू उदाहरणार्थ विविध भक्तीमार्ग, भगवंताच्या भेटिसाठी आवश्यक असणारे प्रेम, वैराग्य, श्रद्धा ईत्यादी भाव; मुख्यत: नामस्मरण हे आपल्याला पहायला मिळतात . महाराजांचे सुमारे ४००० अभंग गाथेरूपाने आधीच प्रसिद्ध झालेले आहेत.

**तुकाराम महाराज हे ब्रह्मज्ञानी पुरुष होते त्यामुळे महाराजांना सर्वसामान्याच्या दु:खांचा निरास व्हावा ही तळमळ पण होती. अभंगाची वाणी ही परमेश्वरी वाणीच आहे.अर्थात हा आपल्या सर्वांच्या उद्धारासाठी त्यांनी केलेला उपदेशच आहे हे स्पष्टच आहे.**

पुस्तकामधे खाली दिलेल्या तक्त्या प्रमाणे अभंगांचे विषयाप्रमाणे वर्गीकरण केलेले आहे.

| **अभंगाचा विषय** |
|---|
| **सद्गुरूस्तवन , सद्गुरुकृपा** |
| **सुखदु:ख संतवचनाचे महत्व , भक्तीमार्ग** |
| **संत ,त्यांचे कार्य व अनुभव** |
| **खरा देव ,सगूण , निर्गूण** |
| **अज्ञानी लोकांची भक्ती व वर्णन** |
| **अज्ञान्याने जागे व्हावे ह्यासाठी केलेला उपदेश** |
| **मुमुक्षू माणसाची मन:स्थिती वर्णन** |
| **मुमुक्षूला केलेला उपदेश** |
| **भाव, प्रेम व सत्संगतीचे महत्व** |
| **नामस्मरण भक्ती** |
| **प्रार्थनापर अभंग** |

अर्थात हे सर्व अभंग ही परमेश्वरी वाणी आहे व आपल्यासाठी ती तुकाराम महाराजंच्या द्वारे प्रगट झालेली आहे हे मी जाणतो. म्हणुनच मी लावलेला अभंगांचा अर्थ बरोबरच आहे असे मी म्हणत नाही. म्हणून वाचकांना पण माझी हीच प्रार्थना आहे की जे लिहिले आहे त्यांत जर कांही चुका असतील तर मोठ्या मनाने क्षमा करावी.

ज्यांच्या कृपेमुळे हे कार्य घडले त्या सद्गुरू श्री.आक्कांच्या श्रीचरणी हे पुष्प त्याच्या आशीर्वादासाठी प्रार्थनाकरून अर्पण करतो आहे.

जय नंदलाला.

रवींद्र गोपाळ फडके.

दि.१२ नोव्हेंबर २०१६, बंगलोर.

| भाग क्र. | अभंगाचा विषय | अभंग क्र | अभंगाचे पहिले चरण |
|---|---|---|---|
| | | | |
| १ | सद्गुरू स्तवन , सद्गुरूकृपा | १ | ज्ञानियांचा राजा गुरू महाराव |
| | | २ | सद्गुरु रायें मज कृपाकेली |
| | | ३ | माझिये मनीचा भाव |
| | | | |
| 2 | सुखदु:ख मिमांसा,संतवचने, भक्तीमार्ग | ४ | सुख पाहा एवढे |
| | | ५ | मैत्र केला बळी |
| | | ६ | न करी रे संग |
| | | ७ | लक्षुनिया योगी पाहाती आभास |
| | | | |
| ३ | संत व त्यांचे कार्य, अनुभव | ८ | आम्ही वैकुंठवासी आलों याचि कारणासी |
| | | ९ | सेवितो हा रस वाटितो सकळा |
| | | १० | सकळ चिंतामणी शरीर |
| | | ११ | रवी  दीप हिरा दाविती देखणें |
| | | १२ | पाप ताप दैन्य जाय उठाउठी |
| | | १३ | जें कां रंजले गांजले, त्यांसि म्हणे जो आपुलें |
| | | १४ | पुण्य पापा ठाव नाही सुख दु:खा |
| | | १५ | संतांचा महिमा तो बहू दुर्गम |
| | | १६ | अवघें ब्रह्मरूप नांहि रिता ठाव |
| | | १७ | वृक्षावल्ली आम्हां सोयरे वनचरें |
| | | १८ | अणुरेणिया थोकडा तुका आकाशाएवढा |
| | | १९ | आनंदाचे डोही आनंद तरंग |
| | | २० | आंता कोठे धावें मन तुझे चरण देखियेलें |

| | | | |
|---|---|---|---|
| | | २१ | माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव |
| | | २२ | कृष्ण माझी माता, कृष्ण माझा पिता |
| | | २३ | आम्हांसाठी अवतार |
| ४ | खरा देव, सगूण, निर्गूण | २४ | तुज वर्णी ऐसां तुजविण नाही |
| | | २५ | विश्वाचा जनिता , म्हणें यशोदेसी माता |
| | | २६ | जयांपासोन सकळे महीमण्डळ जालेम |
| | | २७ | नाही रूप नाही नांव |
| | | २८ | आहे सकळा वेगळा |
| | | २९ | केला मातीचा पशुपती |
| | | ३० | चालें हे शरीर कोणाचिया सत्ते |
| | | ३१ | देव सखा जरी, जग अवघें कृपा करी |
| | | ३२ | प्रेमसूत्र दोरी नेतो तिकडे जातो हरी |
| | | ३३ | कांरे नाठविसी कृपाळू देवासी |
| | | | |
| ५ | अज्ञानी माणसांचे वर्णन, त्यांची भक्ती | ३४ | मुखे बोले ब्रह्मज्ञान |
| | | ३५ | बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग |
| | | ३६ | अज्ञानाची भक्ती ईच्छीती संपत्ती |
| | | | |
| ६-१ | अज्ञान्याने जागे व्हावे म्हणुन केलेला उपदेश | ३७ | आयुष्य गेलें वायाविण |
| | | ३८ | बहूत जन्माअंती जन्मलास नरा |
| | | ३९ | बरे झाले आजवरी नाही पडलो मृत्युमुखी |
| | | ४० | आयुष्य मोजाविया बैसला मापारी |
| | | ४१ | जरा कर्णमूळी सांगो आली गोष्टी |
| | | ४२ | आता उघडी डोळे, जरी अद्यापी न कळेम |
| | | ४३ | अवघाचि आकार ग्रासियेला काळे |
| | | ४४ | आवासाचिये आशा गळ गिळी मासा |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | |
| | | | |
| ६-२ | मुमुक्षु माणसाची मनस्थिती | ४५ | पंचभूतांचिये संदी सापडलो |
| | | ४६ | कन्या सासुरासी जाये मागे परतोनी पाहें |
| | | ४७ | झाली होती काया बहूत मळिण |
| | | ४८ | तुजलागी जीव माझा जाला पिसा |
| | | ४९ | बहू जन्म केला लाग तो हा भाग |
| | | ५० | दुर्बुद्धी ते मना कदा नुपजो नारायणा |
| | | ५१ | देवावर भार वृत्ती अयाचित |
| | | | |
| ६-३ | मुमुक्षुला उपदेश | ५२ | ऐसा हा लौकिक कदा राखवेना |
| | | ५३ | जन्मा येणे घडे पातकाचें मूळ, संचिताचें फळ |
| | | ५४ | म्हणसी होऊनि निश्चिंता |
| | | ५५ | युक्ताहार न लगे आणिक साधन |
| | | ५६ | होऊ नको मना या आधीन |
| | | ५७ | पराविया नारी माऊली समान |
| | | ५८ | न ये तुज जरी मधूर उत्तर |
| | | ५९ | दुडीवर दुडी चाले मोकळी गुजरी |
| | | ६० | साधू बचनाग खाती तोळा तोळा |
| | | ६१ | आतां कांही सोस न धरी आणिक |
| | | ६२ | आतां तळमळ केली पाहीजे सीतळ |
| | | ६३ | रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग |
| | | ६४ | काळ सारावा चिंतने, एकांतवास |
| | | ६५ | हें चि थोर भक्ती आवडतें देवा |
| | | ६६ | करांवी तें पूजा मनेची उत्तम |
| | | ६७ | सोनियाचें ताट क्षिरीनें भरलें |

| | | | |
|---|---|---|---|
| | | | |
| ६-४ | भाव,प्रेम , सत्संगाचे महत्व | ६८ | शुकसनकांदिकी उभारिला बाहो |
| | | ६९ | चित्ती नाही तें जवळी असोनी काय |
| | | ७० | अवघ्या वाटा जाल्या क्षीण |
| | | ७१ | अन्नाच्या परिमळे जरी जाये भूक |
| | | ७२ | सरतें माझें तुझें, तरी हे उतरते ओझे |
| | | ७३ | ढेकणाचे संगे हिरा जो भंगला |
| | | ७४ | अखंड जया तुझी प्रिती मज दे गा त्यांची संगती |
| | | | |
| ६-५ | नामस्मरण भक्ती | ७५, ७६ | जया ज्याचे ध्यान तेंचि होये त्याचें मन + गोविंद गोविंद मना लागलिया छंद |
| | | ७७ | स्मरणाचे वेळी व्हावे सावधान |
| | | ७८ | कुमुदिनी काय जाणें परीमळ |
| | | ७९ | काये करूनी धंदा, चिता तुझे पायी गोविंदा |
| | | ८० | एक धरिला चित्ती, आम्ही रखुमाईचा पती |
| | | ८१ | शरण शरण जी हनुमंता , तुज आलो रामदूता |
| | | ८२ | राम म्हणें वाटचाली, यज्ञ पाऊलो पाऊली |
| | | ८३ | बोलावा विठल, पहावा विठल |
| | | ८४ | नाम संकीर्तन साधन तें सोपे |
| | | | |
| ७ | प्रार्थनापर अभंग | ८४ | उठा सकळ जन उठले नारायण |
| | | ८५ | सदा माझे डॊळां जडो तुझी मूर्ती |
| | | ८६ | आता केशिराजा हेंचि विनवणी |
| | | ८७ | घेई घेई माझे वाचे गोड नांव विठोबाचे |
| | | ८८ | मन माझे चपळ , न राहे निश्चळ |
| | | ८९ | हेंचि दान देगा देवा तुझा विसर न व्हावा |

# भाग १ ला

## सद्गुरू स्तवन व सद्गुरुकृपा



भगवान श्रीकृष्ण



संत ज्ञानेश्वर महाराज

**ह्या भागामधे सद्गुरुस्तवन व सद्गुरुकृपेवरचे  अभंग आहेत, मानव जन्माचे मुख्य ध्येय काय ह्याचे विवरण पण आहे.**

*प्रथम विघ्नहर्त्या गणेशाला म्हणजेच सद्‌गुरुंचे वंदन करूनच कार्य सुरु करायचे आहे.*

*हा अभंग सद्‌गुरु स्तवनाचाच आहे.*

**सदगुरु वंदनाचा अभंग :-**

ज्ञानियांचा राजा गुरू महाराव । म्हणती ज्ञानदेव तुम्हा ऐसें ॥१॥
मज पामरा हें काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ॥२॥
ब्रह्मादिक जेथें तुम्हां वोळंगणें । इतर तुळणे काय पुरे ॥३॥
तुका म्हणे नेणें युक्तिची ते खोली । म्हणोनि ठेविली पायीं डोई ॥४॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

तुम्ही सर्व ज्ञानी लोकांमधे सर्वश्रेष्ठ महाराज आहात. म्हणुनच तुम्हाला ज्ञानदेव असे लोक ओळखतात,॥१॥

( लोकहो) माझ्या सारख्या पामराला तुम्ही थोरपण देऊ नका. पायतली वाहाण पायातच असलेली बरी॥२॥
ब्रह्मादिक देव तुम्हाला शरण येतात अशा तुमचे वर्णन करण्यास कोणतीही उपमा अपूरीच आहे॥३॥ तुका म्हणतो की मी कांही युक्ति कलाकुसरीचा खोलपणा जाणत नाही; म्हणून मी तुमच्या पायी मस्तक ठेवून तुम्हाला शरण आलो आहे.॥ ४ ॥

**अभंगाच्या अर्थस्पष्टीकरणासाठी असलेली भूमिका:-**

तुकाराम महाराजांनी वारकरी पंथाच्या देवळाचा ( संप्रदायाचा) कळस म्हणतात ह्याचे कारण म्हणजे त्यांची विठ्ठलावरची प्रीती. प्रीतीचे नाते हे नेहमीच आपोआपच निर्माण होत असते. उदाहरणार्थ ज्या क्षणी मूल जन्माला येते त्या क्षणी आई व मुलामधे असे विलक्षण नाते निर्माण होते. ***भक्त व भगवंतामधल्या प्रीतीला ही उपमा सुद्धा खरेतर अपूरीच आहे.*** कारण जेंव्हा भक्ताकडुन भगवंताचे स्मरण अत्यंत प्रीतीने होते तेंव्हा भगवंत व भक्ताचे ऐक्य

घडते. दोघे वेगळे असे रहातच नाही . हे ऐक्य झाले की भक्तामधे व भगवंतामधे फरक उरत नाही
अशा भक्ताचे जगणे सर्वकांही भगवंतच, तोच कर्ता व करविता आहे ह्या जाणीवेमधे असते. **ह्यालाच अखंड ध्यान म्हणता येते.**
भक्तीचे महत्व तुकाराम महाराजांनी स्वत:च्या वागणुकीने व अभंगांद्वारे लोकमानसामधे प्रगट केले आहे.

श्री.ज्ञानेश्वर महाराजांना आपल्याकडे भगवान् श्रीकृष्णांचाच अवतार मानतात. श्रीकृष्णांना जगद्गुरू पण म्हणतात. गीताध्यानामधे असलेल्या खालील श्लोकामधे म्हटले आहे की
**वसुदेवसुतं देवं कंसचाणूर मर्दनम् । देवकी परमानंदं कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥**

अर्थात कंस चाणूरादि दुष्टांचे मर्दन करणारा , देवकीमातेला परम आनंद देणारा , जगाचा गुरू ; असा जो वसुदेवाचा पुत्र परमात्मा श्रीकृष्ण; त्याला मी वंदन करतो.

ह्या अभंगाचे वैशिष्ठय म्हणजे तुकाराम महाराज स्वत: ब्रह्मज्ञानी असूनही ह्या अभंगामधे त्यांनी स्वत:कडे कमीपणा घेऊन येथे श्री. ज्ञानेश्वरमहाराजांना ( सदगुरुं म्हणून ) वंदन केलेले आहे.
**ह्या भूमिकेवरूनच ह्या अभंगाचे महत्व आपल्याला लक्षांत येते.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

जसे श्रीकृष्ण हे जगद्गुरू आहेत तसेच ज्ञानेश्वर महाराज पण आहेत. म्हणून तुकाराम महाराज त्यांना " गुरूमहाराव" असे पहिल्याच चरणामधे संबोधत आहेत. म्हणुनच तुम्हाला ज्ञानदेव असे लोक म्हणतात असेही पुढे लगेच तुकाराम महाराज अभंगात म्हणत आहेत.

सद्गुरूं ज्ञानेश्वर महाराजांची स्तुती करताना नंतर अभंगात तुकाराम महाराज म्हणताहेत की जेथे ब्रह्मादीक देव सुद्धा तुमची सेवा करतात त्या हे सदगुरू तुम्हाला कशाचीच उपमा देऊन तुमचे वर्णन करता येत नाही.

तसेच लोकांनी जेंव्हा तुकाराम महाराजाना मोठेपणाने आदराने पाहिले आहे व हे महाराजांच्या लक्षांत आले आहे म्हणुन स्वत:कडे कमीपण घेऊन अभंगामधे तुकाराम महाराज म्हणतात की मला उगाच मोठेपण देऊ नका. मी पायांमधे घालायच्या वाहाणे सारखाच अशा सदगुरुंपुढे तुच्छ आहे.

सदगुरुंच्यापायांवर मी डोके ठेवले , त्यांना शरण गेलो ह्यामुळेच मला सर्व कांही मिळाले आहे ( स्वस्वरूपाचे ज्ञान झाले)

मोक्ष मिळणे म्हणजेच आत्मज्ञान होणे होय. आत्मज्ञानालाच दुसरे नांव स्वस्वरूपाचे ज्ञान आहे. सर्व तत्वज्ञ,शास्त्रे, संतांचे हेच सांगणे आहे की मनुष्यजन्माचे मुख्य ध्येय आत्मज्ञान करून घेणे हेच आहे..

***ह्यामागचे तत्व हेच आहे की माणसाच्यामधला " मी पणा " जोवर असतो तोवर त्याला आत्मज्ञान होत नाही" ह्यासाठी सद्गुरुकृपाच हवी . सदगुरु आपल्यावर शक्तीपात करून आपल्यामधील मीपणाच नष्ट करतात व मग मन उन्मन होते व स्वस्वरूपाचे ज्ञान होते.***

असा हा सदगुरू स्तवनाचा अभंग संत तुकारामांनी लिहिलेला आहे.

ॐ

***************

**अशा सद्गुरुंची आपल्यावर कृपा कशी झाली ते वर्णन खालील दोन अभंगांमधे तुकाराम महाराजांनी केले आहे**

**अभंग १ ला :-**

सद्गुरू रायें कृपा मज केली । परि नाही घडली सेवा कांही ॥१॥
सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकी तो जाणा ठेविला कर ॥२॥
भोजना मागती तूप पावशेर । पडला विसर स्वप्नामाजीं ॥३॥
काय कळें उपजला अंतराय । म्हणोनियां काय त्वरा जाली ॥४॥
राघव चैतन्य केशव चैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥५॥
बाबाजी आपुलें सांगितलें नाम । मंत्र दिला रामकृष्णहरि ॥६॥
माघ शुद्ध दशमी पाहूनि गुरुवार । केला अंगिकार तुका म्हणें ॥७॥

**अभंग २ रा :-**

माझिये मनींचा जाणोनिया भाव । करी तो  उपाय गुरूराजा ॥१॥
आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंफा कांही कोठें ॥२॥
जाती पुढे एक उतरले पार । हाभवसागर साधुसंत ॥३॥
जाणत्या नेणत्या ज्या जैंसी आवडी । उतार सांगडी तापे पेटी ॥४॥
तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरु पांडुरंग ॥५॥

**अभंगांचा शब्दार्थ :-**

**अभंग १ ला:-**
सद्‌गुरुरायांनी माझ्यावर कृपा केली पन त्यांची कांहीच सेवा माझ्याकडून घडली नाही ॥१॥ मी गंगास्नानाला जात होतो त्या वाटेवर ते मला भेटले व माझ्या मस्तकावर त्यांनी आपला हात ठेवला॥२॥ हे स्वप्नच होते व ह्या स्वप्नामधे त्यांनी माझ्याकडे जेवणासाठी पावशेर तूप मागितले, परंतु त्याचा मला स्वप्नामधेच विसर पडला ॥३॥कळत नाही की त्यांच्या मनांत काय होते व त्यांन कसली घाई होती ॥ ४॥ त्यांनी आपली परंपरा राघव चैतन्य, केशव चैतन्य अशी सांगितली व आपले नांव बाबाजी असे सांगून मला रामकृष्णहरी हा मंत्र दिला ॥ ५.६॥,तुका म्हणतो की माघ महिन्यातल्या, गुरुवारी  माघ शुद्ध दशमीला सद्‌गुर्रायांनी शिष्य म्हणून माझा स्विकार केला ॥७॥

**अभंग २ रा :-**
माझ्या मनातला भाव सद्‌गुरुंनी जाणून योग्य तो उपाय केला ॥१॥
त्यांनी मला माझ्याच आवडीचा मंत्र मला सांगितला व त्यामुळे माझा संशयामुळे होणारा गोंधळ  वाचला ॥ २॥ ह्या जगामधे कांही जण भवसागर पार करून जातात व कांही गटांगळया खात रहातात।३। जाणता वा नेणता असो ज्याला जशी आवड असते त्याप्रमाणे त्याला सांगड पेटी मिळून तो उतार पावतो.॥४॥ तुका म्हणतो की मला कृपासागर पांडुरंग हेच तारू आहे हे मला ( सदगुरुंनी) दाखवले ॥५॥

**अभंगामागचे अर्थस्पष्टीकरणासाठी असलेली पार्श्वभूमिका :-**

भक्तीमार्ग असो  व ज्ञानमार्ग असो कोणत्याही मार्गाने केलेल्या परमार्थ साधनेमधे साधक अनेक टप्पे पार केल्यानंतरच त्याच्या ध्येयाकडे म्हणजे मोक्षापर्यंत पोहोचतो.  तो जसाजसा प्रगती करतो तसेतसे त्याला कांही अतिंद्रिय अनुभव येत असतात. व हे सर्व एखाद्यामार्गावर असणाऱ्या मार्गदर्शक पाट्यांप्रमाणे असते. खरा साधक हे संकेत ओळखतो व त्याच्या साधनेला ह्यामुळे अधिकाधिक जोर येतो.

साधनेमुळे मुख्यत: साधकामधील "मीपणा" म्हणजेच अहंभावाचे जवळजवळ संपूर्ण निर्मूलन होते व मनाची शुद्धी होते. पण तरीही एका तह्नेने साधना अपूरीच असते. कारण मनामधे अत्यंत थोडा कां होईना  अहंभाव " की "मी साधना करतो आहे ही जाणीव " उरलेली असते. ती सुद्धा जेंव्हा संपूर्ण संपते तेव्हाच त्याला स्वस्वरूपाचे ज्ञान होते मोक्ष मिळतो. देवदर्शन होते. हे घडण्यासाठी सद्गुरुकृपाच आवश्यक असते. म्हणुनच अध्यात्मामधे सद्गुरुंचे महत्व अनन्यसाधारण आहे.

सद्गुरु आपल्या शिष्याला अनुग्रह देऊन ( सद्गुरू आपल्या शिष्याला उपदेश करतात व त्याला मोक्षाची वाट दाखवतात.)  साधनेच्या ह्या शेवटच्या टप्प्यावर नेतात. म्हणुनचज़ अशी सद् गुरूभेट होणे ही साधकासाठी अत्यंत महत्वाची घटना असते.  अशी भेट झाली की होणारा आनंद प्रत्येक संतानी शब्दबद्ध केलेला आढळतो.

उदाहरणार्थ संत मीराबाईचे पद " म्हाने चाकर राखोजी ", परमहंस योगानंदांचे पुस्तक " एका योग्याची आत्मकथा " मधे  हे  असे वर्णन आढळते..

हा अभंग स्पष्टिकरणा साठी घेतला तेंव्हा नुकतीच गुरुपोर्णिमा होऊन गेली होती. गुरुपोर्णिमा आषाढ महिन्याच्या शुक्लपक्षात येते. गुरुपोर्णिमेला आपल्याकडे गुरुपूजन करतात. येथे मुख्यत: सद्गुरूंचे पूजन करणे महत्वाचे मानले जाते. **सद्गुरू आपल्यामधील "अहंभावाचे " निर्मूलन करून आपल्याला भवसागर पार नेतात. म्हणुनच -त्यांच्या ह्या कृपेबद्दल गुरुपोर्णिमेला त्याचे पूजन करून आपंण आपली कृतज्ञता व्यक्त करत असतो.**

तुकाराम महाराजाचे वरील दोन अभंग असा झालेला आनंद व कृतज्ञता व्यक्त करणारे आहेत. तुकाराम महाराजांनी त्यांच्यावर गुरुकृपा कशी झाली ते पहिल्या अभंगात सांगितले आहे व दुसरा अभंग त्याचेच सविस्तर वर्णन करणारा आहे.

**अभंगांच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

**अभंग १ ला :-**

तुकाराम महाराज आपल्याला सद्‌गुरुंनी अनुग्रह कसा दिला ते सांगताना म्हणतात की " माघ महिन्यातल्या शुद्ध दशमी ह्या तिथीला, गुरुवारी माझ्या सद्‌गुरुंनी माझ्यावर कृपा केली व स्वप्नामधे येऊन मला अनुग्रह दिला. स्वप्नामधे मी गंगास्नानासाठी जात होतो तेंव्हा ते मला भेटले , माझ्या मस्तकावर आपला हात ठेवून मला त्यांनी आपले नांव बाबाजी असे सांगितले. तसेच आपली गुरुपरंपरा राघवचैतन्य केशवचैतन्य अशी आहे हे पण सांगितले. मला त्यांनी "रामकृष्णहरि" हा मंत्रोपदेश त्यांनी केला. व माझा अंगीकार केला. ”

अभंगामधे तुकाराम महाराज आनंदानेच म्हणतात की माझ्या मनी पांडुरंगाची भेट व्हावी अशीच ईच्छा होती. माझ्या अंतरंगातील भाव पाहून माझ्या सद्‌गुरुंना मला उपदेश करण्याची घाई झाली होती असेच मला वाटते. तसेच मला ह्याची खंत वाटते की सद्‌गुरुरायांनी माझ्याकडुन फक्त पावशेर तूप मागितले पण मला त्यांची ही मागणी पूर्ण करता आली नाही. ***तुपाची मागणी पुर्ण न होणे व तेथेच तुकाराम महाराजांचे स्वप्न भंग झाले ह्याचा अर्थ माझ्या मते “ सद्‌गुरुंच्या मनामधे तुकाराम महाराजांनी जागृत अवस्थेमधे असताना आपले वागणे सात्विक ठेवावे”, असा असावा.***

स्वप्नावस्थेत कालाची परिमाणे व जागृतीतली काळाची परिमाणे वेगळी असतात. स्वप्नामधला मोठा काळ जागृतीतला फारतर तासाभराचा असतो हा आपल्या सर्वांचाच अनुभव आहे. तुकाराम महाराज ब्रह्मावस्थेत असल्याने त्यांच्या दृष्टीने स्वप्न व जागृतीमधे फरक नाही. ते स्वत:तर कालातीत होते. ***पण संतांचे अनुकरण बाकीचे करतात. त्यासाठीच आम्ही ह्या जगामधे आलेलो आहोत असे एका अभंगात स्वत: तुकाराम महाराजांनी सांगितलेच आहे.***

***आपण जर महाराजांचे चरित्र पाहीले तर असे आढळते की महाराज हे शांतीची व सात्विकतेची सगुण मूर्तीच होते. त्यांचा सर्व योगक्षेम भगवंताने वाहिला व त्यांना***

***कोंणत्याही परिस्थितीत कसलाही कमीपणा येऊ दिला नाही.*** . त्यांचे अभंग भगवंताने भिजू दिले नाहीत. शिवाजी महाराज त्यांचे कीर्तन ऐकत असताना मोगलांना सगळे श्रोतेगण शिवाजीमहाराजांसारखे दिसल्याने कांहीच करता आले नाही. तसे घडले नसते तर काय इतिहास झाला असता याची कल्पनाच करवत नाही. असो.

**अभंग २ रा :-**

आधिच्या अभंगात म्हटल्याप्रमाणे सद्‌गुरुंना तुकाराम महाराजांच्या मनातला भाव कळला होता हे ह्या अभंगात स्पष्ट होते. तसेच तुकाराम महाराज हा अनुग्रह होण्यापूर्वी ज्या मंत्राचा जप करीत असत तोच मंत्र सद्‌गुरुंनी त्यांना अनुग्रह देताना सांगितला असे महाराज येथे म्हणताहेत. ह्यामुळे त्यांच्या मनामधे कसलाही गोंधळ उरलेला नाही असेही त्यांनी स्पष्टपणे म्हटले आहे. **खरेच आहे ! सद्‌गुरू आपल्या शिष्य़ाला कधीच संशयात टाकत नाही उलट संशयाचे निवारणच करतात. हे सद्‌गुरुंचे वैशिष्ठ्य येथे स्पष्ट झाले आहे. सद्‌गुरू हे खरेतर कल्पवृक्षा सारखेच असतात. ज्याला जसे आवडते व ज्याच्यामुळे भलेच होईल तेच सद्‌गुरु आपल्या शिष्याला देतात. त्यांचा मुख्य भर शिष्याने ह्या भवसागरातून तरून जावे ह्यावरच असतो.**

**सद्‌गुरु तसेच परब्रह्म पांडुरंग हे वेगळे नाहीत. हे पण येथे स्पष्ट झाले.** तुकाराम महाराज परब्रह्मासच पांडुरंग म्हणतात, मीराबाई श्रीकृष्ण तर समर्थ रामदास श्रीराम असे संबोधतात. अभंगात म्हटल्याप्रमाणे नामस्मरण करूनच अनेकांचा उद्धार झाला हे पुन:एकदा तुकाराम महाराजांनी ह्या अभंगात सांगितले आहे.

**अभंगाची शिकवण :-**

माणसाने भगवंतावर अनन्यभावे श्रद्धा ठेवून त्याचे अखंड नामस्मरण करावे ,निदान तसे प्रयत्न करावे . योग्य वेळी सद्‌गुरूकृपा होईलच ह्याची ग्वाही ह्या दोन अभंगाद्वारे आपल्याला येथे मिळाली आहे. अर्थात आता यापुढे तसे आचरण करणे हे आपल्याच हाती आहे..

ॐ

*************

# भाग २ रा



**भगवंताची भेट ही भक्तीमुळेच घडते .**

**सुखदु:ख मीमांसा, ज्ञानमार्ग व भक्ती मार्ग कोणते ,**

**संतवचनांवर विश्वास कां ठेवावा**

**हे सांगणारे अभंग येथे घेतलेले आहेत.**

**अभंग जोडी :-  सुख दु:ख मीमांसा, दु:ख:निवृत्तीचा  कायम स्वरूपी उपाय,**

**अभंग १)**

सुख पाहातां जवापाडे । दु:ख पर्वतायेवढे ।
धरी धरी आठवण। मानी संतांचे वचन ॥ १ ॥
नेले रात्रीने तें अर्धे । बाळपण जरा व्याध ।
तुका म्हणे पुढा । घाणा जुंजी जसा मूढा ॥ २ ॥

**अभंग २ रा**

२) मैत्र केला महाबळी । कामा न ये अंतकाळी ।। १ ॥
आधी घे रे रामनाम । सामा भरी हा उत्तम ॥ २ ॥
नाहीतरी येम । दाढा खातो कराकरा ॥ ३ ||
धन मिळविले कोडी । काळ घेतल्या न सोडी ॥ ४॥
कामा न ये परीवार। सैन्य लोक बहू फार ।। ५ ॥
तंववरी तुमचे बळ। जंव आला नाही काळ ॥ ६ ॥
तुका म्हणे बापा। चुकवी चौ्याशींचा खेपा ॥ ७ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

**अभंग १ ला :-**

**सुखाचे क्षण जीवनामधे फारच कमी कालावधीचे असतात. त्या मानाने दु:खाचा कालावधी नेहमीच मोठा असतो. त्यामुळे सुख जवाच्या दाण्याएवढे लहान आहे म्हटले तर दु:ख पर्वताएवढे आहे असे अनुभवास येते..॥१॥**

**( शाश्वत सुख लाभावे म्हणून अहो लोकहो) . संत काय सांगतात ते ऐका व त्यांचा वचनांवर विश्वास ठेवून ( त्यांनी सांगितल्या प्रमाणे)  भगवंताची आठवण सतत ठेवा॥२॥**

**तुमच्या आयुष्यातला अर्धा काळ रात्रीने नेला ,उरलेला बाकीचा काळ म्हणजे बालपण,तारुण्यावस्थेचा काळ व शेवटी वृद्धवस्थेचा काळ  सर्व जरा व्याधी मधे गेला.॥ ३॥**

**हे मूढा, जसा घाण्याला जुंपलेला बैल सतत गोलगोल फिरत जातो तसेच तुझे झाले आहे ॥ ४॥**

**अभंग २ रा :-**
**अत्यंत बलवान माणूस जरी मित्र असला तरी मृत्यूच्या वेळी तो सुद्धा तुला वाचवू शकत नाही.॥१॥**
**तू रामनामाचा जप कर हीच यमा पासून वाचण्याची युक्ती आहे, ॥ २॥**
**असे केले नाहीस तर यमराज कर्करा दाढा खाऊन तुला मारेल॥ ३॥**
**एखाद्याने कितीहि संपत्ती मिळवली असली तरी अशाला सुद्धा काळ सोडत नाही॥ ४॥**
**जरी जवळ मोठे सैन्य असले', किंवा अनेक जीवाला जीव देणारी नातेवाईक मंडळी असली ,तरी तुमचे सर्व बळ मृत्यू येईपर्यंतच चालते ॥ ५॥**
**तुका म्हणतो की आता ( वर संगितल्या प्रमाणे प्रयत्न करून ) चौर्याऐंशी योनींमधे फिरणे थांबवा॥६॥**

**अभंगाचा भावार्थ समजण्यासाठी लागणारी माहिती:**

१) सुख दु:खाचे स्वरूप.

आपण जर सुख म्हणजे काय हे शोधण्याचा २ प्रयत्न केला तर असे म्हणता येते की आपण पंचेंद्रियांद्वारे जेंव्हा एखाद्या वस्तूचा भोग घेतो तेंव्हा जो आनंद मिळतो त्याला सुख म्हणता येते. वस्तू स्थूल दृश्यातली असू शकते किंवा सुश्राव्य गाण्या सारखी अव्यक्त असू शकते. कांही मनाप्रमाणे घडले तर पण आनंद होतो . सुखाचा समाधानाचा अनुभव येतो. पण सुखाचा हा काळ अल्प असतो व कांही काळाने पुन: तेच सुख मिळवावेसे वाटते. अर्थात समाधान पण तात्पुरतेच मिळते.

हे सर्व सुख जरी मिळत असले तरी माणसाला सतत मृत्यूचे भय असतेच, तसेच आपले वय वाढत आहे व आपण वृद्धत्वाकडे वाटचाल करत आहोत ही खंत / जाणीव पण मनाची साथ कधीच सोडत नाही.

**थोडक्यांत म्हणायचे झाले तर असे सुख सतत टिकणारे म्हणजे शाश्वत नसते.**

**तसेच ह्या सर्व क्रियेमधे वासना बीजे निर्मान होतात व त्यांचा पूर्तीसाठी जीव नवे नवे जन्म घेत रहातो. जन्म आल की पुन: मृत्यू असे हे चक्र सतत चालू रहाते.**

२) **मोक्ष म्हणजे काय ?**

मोक्ष मिळणे म्हणजेच जन्ममृत्यूचक्रामधून सुटणे होय. आपण जाणतोच की फक्त मनूष्यजन्मामधेच मोक्ष मिळवण्याचे प्रयत्न करता येतात.

**३) संत कोणाला म्हणतात.**

माणसाचेच नव्हे तर प्रत्येक प्राण्याचे सर्व आयुष्य मृत्यूभयापासून मुक्ती मिळावी ह्यासाठीच खर्च होते.परंतू फार कमी लोकांना शाश्वत सुख व समाधान मिळते. ज्यांना असे शाश्वत सुख समाधान मिळालेले असते व जे जन्ममृत्यू चक्रामधून सुटले आहेत अशांना संत म्हणतात.

फक्त संतांकडूनच मोक्ष मिळवण्यासाठी मार्गदर्शन मिळू शकते संत हे पावसाप्रंमाने हे मार्गदर्शन

कांहीही भेदभाव न ठेवता सर्वांना , कसलीही अपेक्षा न ठेवता देतात.

४) **संत वचनाला कां मानायचे?**

आपण जेव्हा शाळेला गेलो व पुढे महाविद्यालयात शिक्षणा साठी जातो तेव्हा नेहमीच आपल्याला असेच शिक्षक मार्गदर्शनासाठी लागता ज्यांची ज्ञानाची पातळी आपल्या पेक्षा वरची असावी लागते..जो विषय असतो त्याच विषयामधलेच तज्ञ शिक्षक मार्गदर्शक असावे लागतात. हे झाले व्यावहारिक विषयांच्या शिक्षकाच्या अहर्तेबद्दलचे विवरण.

अध्यात्मातले मुख्य विषय म्हणजे "भगवंत व मी मधील सबंध जाणून घेणे"".मी कोण? माझे खरे स्वरूप काय आहे? मला जन्म मृत्यु चक्रामधून कशी सुटका मिळेल? ह्या सारख्या प्रश्नांची उत्तरे शोधणे.

हे विषय जरी गहन असले तरी ब्रह्मज्ञानी संत हेच ह्या विषयांतले मार्गदर्शक असतात. त्यांच्या मार्गदर्शनाखाली माणसाला सहजपणे आत्मज्ञान होते आणी वर उल्लेखिलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरे मिळतात. आत्मज्ञान झाले म्हणजे अक्षय सुख, शांती व समाधानाचा अनुभव मिळतो. सर्वांत मोठे भय म्हणजे मृत्युभय , त्यातून सुटका होते.

संताचे परब्रह्माशी ऐक्य झालेले असते. परब्रह्म अर्थात परमेश्वर म्हणजेच खरा देव. **“ कांरे नाठविसी कृपाळू देवासी ह्या** अभंगाच्या विवरणामधे आपंण खरा देव कोण ह्यावर थोडिशी

चर्चा केली आहे. परमेश्वराला सर्वज्ञ हे विषेशण आहे. अर्थात त्याला सर्व कांहि ज्ञान आहे. संत व परब्रह्म ह्यांचे ऐक्य असल्यामुळॆ संत पण म्हणूनच सर्वज्ञानी असतात.
संताचे एक वैशिष्ठ्य म्हणजे त्यांना सर्वसामान्य माणसाला असे आत्मज्ञान व्हावे ही त्यांची तळमळ. लागलेली आढळते. ह्यासाठीच त्यांनी विविध ग्रंथरचना केलेली आहे. उदा. तुकारामांची गाथा, दासबोध, विवेकसिंधु , कबीरवाणी , इत्यादी अनेक ग्रंथ आता सहजपणे उपलब्ध आहेत. ह्या ग्रंथांमधे जे जे लिहिलीले ती सर्व संतवचनेच होत अर्थात ती परमेश्वरी वाणीच आहे.

**संतवचनाचे असे महत्व आहे व म्हणूनच ज्याला शाश्वत सुख, समाधान हवे आहे त्याने संतवचनाला प्रमाण मानायला हवे.**

**ह्या माहितीच्या संदर्भातून आपल्याला दोनही अभंगांचा अर्थ समजायाला उपयोग होतो.तोच पुढे लिहिला आहे.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :**

संत तुकाराम महाराज पहिल्या अभंगात म्हणताहेत की माणसाला मिळणारे सुख हे अल्प असते व दु:ख मात्र फ़ार मोठे असते.
रोजच्या व्यवहारामधे आपल्याला पंचेंद्रियां द्वारे निरनिराळया विइषयांचा भोग मिळतो. भोग त्यामुळे आपल्याला सुख मिळते. व भोग संपला की ते सुख समाधान नष्ट होतेव संपते. उदा. आंबा खाल्ला की आनंद मिळतो. चवीमुळे खाण्याचे समाधान मिळते. पण हे समाधान अशाश्वत असल्यामुळे ते सतत मिळत रहावे ह्या साठीच आंबा परत परत खावास वाटतो. थोड्याबहूत फरकाने सर्वच विषयांच्या बाबतीत हाच अनुभव येतो.
येथे समाधान संपल्याच्या जाणीवेला दु:ख म्हणता येईल. ह्या व्यतिरिक्त अनेक कारणांमुळे आपल्याला कांहीतरी चिंता, असमाधान वाटतच असते उदा. मिळालेली नोकरी टिकेल

कां? कांही असाध्य रोग तर होणार नाही ना? कॊणी कळत अथवा नकळत केलेला अपमान , फसवणूक ह्यामुळे मनाचा क्षोभ होतो, स्पर्धेमुळे मागे फेकले जाणे घडते ,अशा कितीतरी कारणांमुळे आपण जीवनांत जास्तवेळ दु:खी असतो. शिवाय मृत्युचे सतत भय असतेच. म्हणुनच सुखाचि तुलना एखाद्या जर धान्याच्या दाण्याशी केली तर दु:ख एखाद्या मोठ्या पर्वताएवढे वाटते.

महाराज पुढे म्हणतात की अरे मूढ माणसा, तुला मिळालेल्या आयुष्यतल्या काळाची वाटणी पाहिलीस तर दिसेल की कांही काळ बालपणाचा गेला, कांही म्हात्तारपण व निरनिराळया व्याधींबरोबर झुंजण्यात गेला, व बाकीच झोपेतच गेला व जातो आहे.

**(येथे झोप म्हणजे अज्ञानामुळे हे आपले शरीरच सर्वकांही समजून सर्व काळ ह्या देहाचे चोजले पुरविण्यात घालवणे होय .)**

ह्यामुळे काय परिणाम होईल तर तू एखादा घाण्याला झुंपलेला बैल जसा गोल गोल रिंगणात फिरत राहतो त्या बैलाप्रमाणे तू पण अनंतकाल जन्म-मृत्युच्या फेऱ्यामधे फिरत राहशील. शाश्वत सुख, समाधानाला पारखा होशील.**तरी आता जागा हो व संतवचंवनांवर विश्वास ठेवून आचरण सुधार..**

**तुकाराम महाराजांनी हाच मुद्दा पुढच्या अभंगामधे थोड्या वेगळया पद्धतीने मरणाची आठवण देवून मांडला आहे व उपाय पण सांगितला आहे.**ते म्हणतांत :

जरी माणसाचा एखाद मित्र महाबलवान असेल, माणसाने अलोट संपत्ती मिळवली असेल, अनेक सुहृद मित्रमंडळी व नातेवाईकांचा परिवार जवळ केला असेल, तरी मृत्युच्या वेळी ह्यांतले कोणीच माणसाला वाचवू शकत नाहीत धन, मित्र, इत्यादिंचा उपयोग जोपर्यंत मृत्युघटीका येत नाही तो पर्यंतच होतो. सगेसोयरे हे जणू बाजारबुणग्यांची मोठी फौजच. ;लढाईसाठी कुचकामाची.. खरेतर यमराज हे झडप घ्यायला तयारच असतात . मृत्यु केंव्हा झडप घालेल सांगता येत नाही.

**अभंगाची शिकवण :**

जर माणसाने रामनामस्मरणाचे  साधन केले  तर मात्र ही साधना माणसाला जन्म-मृत्युच्या चक्रांतुन सोडवते. रामनामस्मरणाने जीवाचा ८४ लक्ष योनिंमधे जन्म घेत फिरत राहण्याचा धोका टळतो. म्हणून नामस्मरण करणे हेच उत्तम.

**टीप: हाच मुद्दा श्री.समर्थ रामदास, ज्ञानेश्वर महाराज, गोंदवलेकर महाराज, गुरूदेव रानडे, नाम्देव महाराज एकनाथ महाराज, शिरडीचे साईबाबा ईत्यादी अनेक संतांनी पण सांगितला आहे.**

ॐ

***************

**ह्या अभंगाची निवड करताना मी धारिष्ठ्यच दाखवले आहे. ह्याचे कारण म्हणजे ह्या अभंगातले विचार अत्यंत उच्च कोटीचे आहेत., व माझ्यासारख्या अनपढ माणसाला त्यांचा अर्थ स्पष्ट करून सांगणे म्हणजे पाचवी सहावीमधे शिकत असलेल्या मुलाने उच्च शिक्षणांतले प्रमेय सोडविण्यासारखे आहे..**

**म्हणून वाचकांना माझी नम्र विनंती आहे की जर कांही चुका झाल्या असतील तर त्यांबद्दल वाचकांनी मला उदार अंत:करणाने क्षमा करावी. पण माझी काय चूक झाली आहे ते मात्र जरूर सांगावे.**

न करी रे संग राहे रे निश्चळ । लागो नेदी मळ ममतेचा ॥ १ ॥
या नांव अद्वैत खरे ब्रह्मज्ञान । अनुभवा वाचून बडबड ॥ २ ॥
इंद्रियांचा जय वासनेचा क्षय । संकल्पाहि न ये वरी मन ॥ ३ ॥
तुका म्हणे न ये जाणीव अंतरा । अंतरी या थारा आनंदाचा ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

हे सज्जन हो मन स्थिर ठेवा व कसल्याही गोष्टीचा स्वत:ला संग लावू नका ॥ १॥

ह्या असे राहण्यालाच अद्वैतात असणे म्हणतात. अद्वैत हेच खरे ब्रह्मज्ञान आहे. बाकी जे कांही बोलले जाते ती अनुभवावाचूनची अर्थहीन बडबड आहे॥ ३॥

इंद्रियांवर जय मिळवणे म्हणजे वासना क्षीण करणे होय. असे जमले की मन संकल्प करण्याचे सोडून देते॥ ४॥

|तुका म्हणतो की असे घडले की "मी" पण अंतरांत रहात नाही. मग अंतरात उरतो तो फक्त निर्मळ आनंद ॥ ५॥

**अभंगाच्या मागची अर्थ स्पष्टिकरणासाठी असलेली भूमिका :-**

हा अभंग जीवन्मुक्ताच्या मनाची स्थिती तर दर्शवणारा आहेच , **शिवाय ह्या अभंगाद्वारे ह्याच जन्मी आपण जीवन्मुक्त होण्या साठी कोणते प्रयत्न करायला पाहिजेत ते पण सांगितले आहे.**

**" संपूर्ण शरणागती" " हरीनामस्मरण "** आणी भगवंताला नेहमीच आठवून सर्व कांमे करणे ही साधनेची महत्वाची अंगे आहेत. असे प्रयत्न करूनच आपल्याला आपले सर्वोच्च असे मोक्षाचे साध्य गांठता येईल.

ह्या प्रयत्नांमधे येणारा मुख्य अडथळा म्हणजे आपले अस्थिर मनच आहे. मन सतत कांहीतरी करण्यासाठी प्रयत्नशील असते. सतत कोणतेतरी विचार मनामधे येतच असतात. जर त्या विचारंनुसार आपण कार्य केले तर त्यांचे फळ मिळते. हे फळ कधी आनंद देते तर कधी दु:ख देते. दोन्हिंचा परिंणाम शेवटी एकच असतो तो म्हणजे बंधनांत आपले अडकणे.

भगवान पतंजली त्यांच्या योगसूत्रांमधे म्हणतात ," मन एव मनुष्याणां कारण बंध मोक्षयो : " **अर्थात मनच बंधनाचे कारण आहे व मनच मोक्षाचेही कारण आहे " आपले मन सतत आनंदासाठी धडपडत असते ह्याचे कारण म्हणजे " आनंद हेच आपले खरे स्वरूप आहे ".**

आपल्याला अनुभवास येतो तो आनंद प्रगट होण्यास मन व कांहितरी बाह्य उपलब्ध असलेली वस्तू असते. ही वस्तु कधी जड स्वरूप असते तर कधीकधी अव्यक्त असते.( उदाहरणार्थ ; सुंदर निसर्गाअला पाहून आनंद होतो. येथे निसर्ग ह जड स्वरूप , आपल्या डोळय़ांनी दिसतो. पण एकादे गोड गाणे आपल्याला दिसत नाही , ते अव्यक्तरुपात असते. ) **मुख्य मुद्दा हा की मन त्या वस्तुशी संलग्न होते व आपल्याला आनंदाच अनुभव देते. ह्या शिवाय आठवणीच्या द्वारे मन ह्या वस्तूंशी नंतर पण जोडलेले राहते. सुख वा दु:खाच्या आठवणी मनामधे अनंतकाळापर्यंत राहतात.**

मनामधल्या आठवणी कधीही परत डोके वर काढू शकतात. तसे करण्याचे मनास सामर्थ्य देवाने दिलेले आहे. अशी आठवण झाली की मन कधी कधी परत आनंदी होते , कधी कधी क्षोभित पण होते किंवा इतर कांही भावना मनात जाग्या होतात.

**मनाचे हे व्यापार कसे चालतात हे आपण पाहीले व आता यांच्या मागोव्याने आपल्याला तुकाराम महाराज आपण काय करायचे जे सांगतात तेही स्पष्ट होईल. ह्या भूमिके वरून अभंगाचा अर्थ स्पष्ट होतो.**

खरेतर सर्व सृष्टीचे सर्वच व्यवहार मनाच्या असे वस्तू व आठवणींशी जोडले जाण्यामुळे (संग होण्यामुळे) घडत असतात. **ह्यालाच अध्यात्मात "मायाशक्तीचे कार्य " असे म्हणतात . ह्यामुळेच जग चालू राह्ते व सर्व प्राणी कार्यरत राहातात .ह्यां पैकी माणूस हा (व्यक्तीगत स्वरूपांत ) मोक्ष मिळावा म्हणून प्रयत्न करत असतो.**

अभंगाचे अर्थ स्पष्टीकरण :

अभंगाच्या पहिल्याच ओळींत तुकाराम महाराजांनी **" संग "** हा श्ब्द वापरला आहे. संग म्हणजे आपली दृश्यांतल्या वस्तू, प्राणीमात्र, घरदार संपत्ती, बायकोमुले , पती, आईवडील भाऊ इत्यादी सरवांविषयी असणारी आसक्ती , ममता, माया, मोह हा आहे. ही आसक्ती जडवस्तूंचीच नव्हे तर अव्यक्ताची पण असते.
१) जडा बद्दलची आसक्ती : आपले घरदार, संपत्ती, देह म्हणजे शरीर (स्वत:चे व आपल्या नातेवाईकाअंचे, बायको मुलांचे शरीर हे जडामधेच येते) . ह्या आसक्तीला ममता हे नांव आहे . ह्या शिवाय निरनिराळय़ा खाद्यपदार्थांची आवड म्हंणजे पण जडाचीच आसक्ती होय. जड पदार्थ नाशवंत असतात हे आपण नेहमी अनुभवत असतोच.
उदाहरण १) खाद्यपदार्थांची आसक्ती सुद्धा आपल्याला बंधनात टाकते. एखाद्या मधुमेही माणसाचे उदाहरण घेऊया. मधुमेही व्यक्तीने जर साखरचे गोड खाल्ले तर रोग बळावतो. हे ठाऊक असूनही गोड खाता येत नाही म्हणुन दु:ख उद्वेग करणारी अनेक माणसे आपण रोज

पहात असतो. ही भावना नक्कीच आनंददायी नाही हे सहज समजते.खाद्यपदार्थ निरनिराळ्या रंगाचे, चवीचे व सुगंध असलेले असतात. ह्यांपैकी कोणत्याही एकाची आठवणसुद्धा खाण्याच्या वासनेला वर आणायला पुरेशी असते.
मग ही वासनापुर्ती झाली नाही की ती मनामधे आठवणीच्या रुपाने बीजरूप होते. चित्तामधे ही आठवण साठते. जेंव्हा मृत्युहोतो तेंव्हा आपले सूक्ष्म शरीर ह्या सर्व पूर्ण न झालेल्या वासनांना, तसेच बीजरुपाने साठवलेल्या वासनांना बरोबर घेऊन स्थूल शरीराबाहेर पडते. मग ह्या वासना कोठे शमवल्या जातील असा देह शोधून पुन: नवा जन्म घेते. नव्या जन्मामधे नवी वासना निर्मिती होते व हे चक्र सुरू राहते.

**म्हणजे जरी सुरवातीला जड पदार्थ होता तरी बीज हे सुक्ष्मरुपातच आठवणी म्हणुन साठवले गेले. त्या आठवणीचेच ओझे आपण खांद्यावर घेतले व पुढच्या जन्माची तयारी केली असे म्हणता येईल.**

**२) अव्यक्त रुपांतील वस्तूंचे उदाहरण :**

**१ ले उदाहरण :**वस्तू अव्यक्त असेल पण परिणाम जडाप्रमाणेच असतात. साधारणत: उगाचच कांही आठवणी मनांत उसळी मारुन बाहेर येतात. आपल्यापैकी सर्वांनाच जुने मान अपमान आठवतात. कांहीजण त्यांच्यावर विचार पण करतात. ह्याचा परिणाम म्हणजे ज्याने अपमान केला त्याचा बदला घ्यावा , त्याचे वाईट व्हावे इत्यादी भावना जन्म घेतात. थोडक्यांत म्हणायचे झाले तर आपल्या आठवणीच इतरही वस्तुंप्रमाणे आपल्याला सुखदु:खाचे अनुभव देतात . अर्थात त्यांना मन चिकटून राहते. नंतर जर आलेल्या आठवणीप्रमाणे वासना पूर्ती झाली नाही तर परत एकदा जन्ममृत्युच्या चक्रामधे आपण अडकतो.

**२रे उदाहरण :** समजा एखादी घटना वाईट दु:ख/ क्षोभदायक मागे कधीतरी घडली असेल ( अपमानास्पद प्रसंग, कॊणाचे टोचून बोललेले आठवणे वगैरे), तर अशा घटनांची कधीकधी कांही कारणास्तव किंवा उगाचच जर आठवण झाली तर आपल्या क्रोध, नैराश्य, भीती, द्वेष अशा भावनांचा उद्रेक होऊ शकतो. ह्या भवनांच्या अंमलाखाली गेल्याने आपण वर्तमानात नकॊ तसे वागतो. परिणाम घातक होतात. व कधी पश्चाताप होतो. पण असे वागल्याने आपण पुन: जन्म-मृत्युचक्रामधे स्वत:ला गुंतवत असतो.

**३रे उदाहरण** : कधीकधी बाह्या कारणामुळे आठवण जागृत होते.जसे एखादे गोड गाणे ऐकले तर होते तसे. त्यामुळे त्यावळी भोगलेल्या आनंदमय दिवसांची आठवण तसेच दिवस पुन: यावे असा विचार मनामधे आणते. बालपणीच्या आठवणी असे विचार नेहमीच मनामधे निर्माण करतात. ह्या मुळे नकळत नवी वासना निर्माण होत असते. वासनापूर्ति तर शक्य नसते. मग परिणाम काय हे सहज लक्षांत येऊ शकते.

**४थे उदाहरण :** बरेच वेळा कोणी बोललेले आठवते व मनाला अत्यंत वाईट वाटते. आठवणीच नव्हे तर एखाद्या पुस्तकामधले / वर्तमानपत्रातले वर्णन ऐकूनही मन क्षुब्ध होते. काहीतरी करावेसे वाटते.

**५वे उदाहरण :** ध्यानी मनी नसताना एखादा अपघात होतो व आपले भयंकर नुकसान होते. असे घडले की लोक शोकाने म्हणतात की " माझी काय चूक होती म्हणून मला हे भोगावे लागत आहे ? कां? कां? असे घडले? अशा प्रश्नाचे उत्तर एकच आहे ते म्हणजे आपले "प्रारब्ध".तरीही आपण नकळत अशा दु:खात व्यस्त होतो व कांहितरि असे काम करतो की पुन: जन्ममृत्यु चक्रामधे अडकतो..

**वर पाहिलेली सर्वच उदाहरणे , आपण " संगामधे " म्हणजेच नाशवंताच्या आसक्तीमधे कसे गुंततो ते स्पष्ट करतात. आपल्या पंचेंद्रियांच्या माध्यमाद्वारे आपण असे करत असतो. आपल्यामधला " अहंकार " “मीपणा " अपल्याला आसक्ती ममते मधे बांधत असतो.. हेच खरे कारण आहे.**

आपल्या शास्त्रांप्रमाणे हा सगळा मायेचा खेळ आहे. मायेमधे आपल्याला जन्म-मृत्यु चरामधे बांधण्याची खूप मोठी ताकद आहे. पण हे विसरून चालणार नाही की मायाच आपल्याला सारासार विवेक बुद्धी पण देते. **तुकाराम महाराज आपल्याला ह्या अभंगामधे ही विवेकबुद्धीची देणगी नीटपणे वापरायला सांगत आहेत.**

**टीप:** वर पाहिलेल्या उदाहरणांमधे कांही बद्दल अपवाद पण असतात. विषेशत: आनंदाच्या अनुभवांचे. जेंव्हा आपल्याला भगवंताच्या कांही लीला इत्यादिचे वर्णन ऐकून आनंद होतो तो सात्विक असतो. असा आनंद झाला की भगवंबद्दल प्रेमाची तीव्र भावना उत्पन्न होते. अशी

भावना आपल्याला भगवंताकडेच नेणारी असते व आपल्यामनामधे भगवंतभेट व्हावी अशी आसक्ती निर्माण करते. अशी आसक्ती जन्म-मृत्यू बंधनात बांधत नाही उलट मोक्षाकडेच नेते. असे भवनांचे असणे म्हणझे आपण योग्य मार्गावर वाटचाल कर आहोत हे दर्शवणारे मैलाचे दगडच असे म्हणता येते. **असा संग चांगला असतो.**

तुकाराम महाराज म्हणुनच सांगत आहेत की "संगत्याग" करा. संग म्हणजे जणू शुभ्र कापडावरचा काळय़ा रंगाचा डाग. अशा डागाच दृष्टांत अभंगात आहे. येथे कापड म्हणजे आपले मन व डाग म्हणजे ममता आसक्तीचा मनाला लागलेला मळ. असा मळ मनास लागू नये म्हणून सावध राहणे हेच "राही रे निश्चळ" ही ओळ सांगते. ह्या ओळीद्वारे महाराज आपल्याला विवेकबुद्धी जागी ठेवून मनाला असा मळ लागू देऊ नका असेच सांगत आहेत.
**हे प्रत्यक्ष जीवनात कसे करायचे त्याचेवर खाली दिलेले मुद्दे आहेत, ते आपल्या आचरणांत आणायचे आहेत.**
१) नेहमी हे लक्षांत ठेवावे की भगवंत हाच कर्ता आहे व मी त्याचे कार्य करणारे यंत्र आहे.
२) सर्वकांही भगवंताच्या ईच्छेप्रमाणेच घडत आहे . ( तोच काम करायची प्रेरणा देतो, म्हणुन प्रत्येक काम नीट होईल असा प्रयत्न मी केला पाहीजे.
३) भगवंताची आठवण सतत त्याच्याच नांवाचे स्मरण करुन ठेवावी.
तुकाराम महाराज नामस्मरणावर कां भर देतात ह्याचे कारण कदाचित हेच असावे. आपण भगवंताचे कॊणतेही नांव घेऊन त्याचे स्मरण करू शकतो.

**श्री.रामकृष्ण परांमहंसांनी मन स्वस्थ्र कसे ठेवावे यासाठी एक उदाहरण "लोहाराच्या ऐरणी" दिले आहे. ऐरणीवर लोहार सतत हातोडीने लोखंडाच्या वस्तुंना ठोकत असतो. पण ऐरणीवर ह्याचा कांहिही परिणाम होत नसतो. ऐरण जागच्याजागी स्थिरच असते.**
**असेच आपले भगवंतावर प्रेम व भक्तीभाव हवेत. आपले मन नेहमी ह्या भावांत असले की मग जगामधे घडणारे सर्व कठीण प्रसंगी माणूस स्थिरबुद्धिने जे होईल ते सहन करू शकतो. त्याला सृष्टितल्या सुंदर वस्तूंची भूल पडत नाही. तसेच कठोर बोलही तो सहन करू शकतो. मना मधे बदल्याची भावना सुद्धा असे बोल ऐकले तरी येणार नाहीजर स्थिर बुद्धि असेल तर. फक्त**

बगवंताचेच बद्दल विचार अशा माणसाच्या मनामधे येतील. समजा वर लिहिलेल्यापैकी एखादा प्रसंग जर आला तर विवेकाने माणूस योग्य तेच कर्म करेल.

भगवंतावर असे मन लागणे ही मोठी भाग्याची स्थिती आहे . ज्याला मोक्ष हवा अहे त्याला अशी स्थिती हवीहवीशीच वाटते. कारण जर फक्त भगवंताच मनात असेल तर मग मनामधे दुसरे कांहीही नसेल.

अशा मनाच्या अवस्थेला "उन्मनी "अवस्था असे नांव आहे.

ह्या अवस्थेमधे भक्त व भगवंत वेगळे उरत नाहीत. ह्य़ालाच अद्वैतामधे जाणे म्हणतात. ह्या अव्स्थेमधे राहतो तो ब्रह्मानंद . फक्त ब्रह्मज्ञानी पुरुषाचीच अशी अवस्था होते.

हेच तुकाराम महारजांनी अभंगाच्या शेवटच्या २,३,४ ह्या कडव्यांमधे सांगितले आहे.

महाराज पुढे म्हणतात की अशी अवस्था जोवर येत नाही तोवर शब्द एखाद्या रिकाम्य़ा कवच्याप्रमाणे फोलपटाप्रमाणे आहेत. प्रत्यक्ष अनुभवच महत्वाचा आहे. असा अनुभव येतो त्याला ब्रह्मानंद मिळतो.

अभंगाची शिकवण : अभंगाची शिकवण पण आहे ती खालील प्रमाणे असावी.

अभंगामधे ज्ञानयोगातील प्रयत्नांचे वर्णन आहे . मनास ऐरणीप्रमाणे करणे हे ज्ञान योगामधले प्रयत्न आहेत. तसेच वासना जय व पंचेद्रियांवर ताबा हे ज्ञान योगातले प्रयत्न आहेत. तसेच भगवंताकडेच सतत मन लावणे हे भक्तीयोगातले प्रयत्न आहेत. ह्या प्रयत्नांमुळेच आप्ण सुखद:खाच्या चक्रामधून नेहमीकरता सुटू शकतो.

नामस्मरणावर तुकाराम महाराजांनी भर कां दिला आहे ते पण येथे स्पष्ट झाले. नाम स्मरणासाठी कसलीच आडकाठी ( जाग, वेळ , तब्बेत इत्यादी ) येत नाहीत. म्हणुन आपण भक्तीयोगाचे मार्गावर जाणे सोईस्कर आहे हे महाराज सांगत आहेत.

ॐ

*******************************************************

**अभंग :- सगूण भगवंताची भक्ती करणॆ सोपे म्हणून सगूणापासून भक्ती सुरू करावी.**

लक्षुनिया योगी पाहाती आभास । तेचि दिसे आम्हास दृष्टीपुढे ॥ १॥

कर दोनी कटी राहातसे उभा। सांव हे प्रभा अंगकांती ॥ २॥

व्यापुनि वेगळे राहिलेसे दुरी । सकळां अंतरी निर्विकार ॥ ३॥

रूप नाही रेखा नामही जयासी । आपुल्या मानसी शिव ध्याय ॥ ४॥

अंत नाही पार वणा नाही थार । कुळ याति शिर हस्त पाद ॥ ५॥

अचेत चेतले भक्तिचिया सुखे । आपुल्या कौतुके तुका म्हणें ॥ ६॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

जे ध्यान योगीजन लक्ष लावून पाहातात तेच आम्हाला दृष्टीस दिसते आहे ॥ १॥

तो दोन्ही हात कटीवर ठेवून उभा आहे व त्याची सांवळी अंगकांती शोभून दिसते आहे ॥ २॥

सर्वांच्या अंतरी असूनही तो निर्विकारपणे वेगळा आहे ॥३॥

त्याला रूपरंग नाही नामही नाही व अशा त्याचे ध्यान शिवजी सतत मनाने करत असतात.॥४॥

तो एवढा विराट आहे की त्याचा अंत लागत नाही, त्याल अर्थातच कुळ, जात,डोके, हात पाय नाहीत ॥ ५॥

भक्तीच्या प्रेमापोटी मिळणार्या सुखामुळे मी तुका चैतन्यमय झालो असे तुका कौतुकाने म्हणतो }॥ ६॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी माहिती :-**

वेद व श्रुतींनी भगवंताचे वर्णन " नेति नेति अर्थात असा नाही असा नही " ह्या व्यतिरेक पद्धतीने केले आहे. ह्या भूमिके वरूनच आपल्याला अभंगाचा अर्थ काय आहे ते पाहात येते.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण** :-

**अभंगाच्या पहिल्याच चरणामधे** तुकाराम महाराज म्हणतात की योगी व संतांना हे दृश्य जगत स्वप्नवत भासत असते ( हा त्यांचा अनुभव पण आहे) पण महाराजांच्यामते त्यांना हे जगत खरे वाटते.

योग्यांना जगत भासमय वाटते व बाकिच्यांना मात्र ते खरे वाटते ह्याचे कारण काय असावे ह्याव वर आपल्या शास्त्रांनी खोलवर विचार केला आहे. आपण कार्य-कारण भावाने विचार करतो. ह्यामुळे खालील प्रश्न उद्‌भवतात.

जर हे जग देवाने निर्माण केले आहे तर देवाला कोणी निर्माण केले ? ज्याने देवाला निर्माण केले त्यला कोणी निर्माण केले? अशी न संपणारी प्रश्नशृंखला तयार होते. उत्तर सापडणे दूरच राहाते. मग ह्यावर काय उपाय आहे?

उत्तर देण्यासाठी एक दृष्टांत अर्धवट अंधार असलेल्या खोलीतल्या दोराचे देतात.जेंव्हा कोणीतरी एक मनुष्य अशा खोलीत गेला तेंव्हा त्याला साप दिसला व तो खूप घाबरला. त्यानंतर एक दुसरा माणुस खोलित गेला व त्याने दिवा लावला. दिवालावल्यावर असे आढळले की तेथे एक दोरी पडली होती. साप मुळी नव्हताच! साप असल्याचा भास अर्धवट उजेड असल्यामुळॆ झाला. प्रत्यक्षात तो दोरीचा तुकडाच होता. हे स्पष्ट झाल्याबरोबर सापाचे भय उअरले नाही.

**सापाचा भास दोरीच्या असण्यामुळे ( अधिष्ठानावर) झाला होता.**

आपल्याल जग असेच खरे वाटते. खरा देव म्हणजे परब्रह्म होय. फक्त परब्रह्मच खरे आहे बाकी सगळा भासच आहे.आपण जेंव्हा झोपी जातो तेंव्हा आपल्या स्वत:पुरते तरी दॄश्य जगत अस्थित्वातच नसते. हा अनुभव आपण रोजच घेत असतो.

असे हे भासमय जगत खरे वाटणे म्हणजेच अज्ञान होय. जरी जग भासमय आहे तरीही तेच खरे असा समज असल्यामुळे आपण सर्व सुखदु:खे भोगत असतो.जगातल्या वस्तुंपासून मिळालेले भोग परत परत भोगाची ईच्छा नकळत आपण बाळगतो व त्यामुळे जन्म मृत्यूच्या चक्रात सुख - दु:खे भोगत रहातो.

आपले खरे स्वरूप हे आनंदमयच आहे.आपण म्हणजे खरेतर आपल्यामधील चैतन्य -अंतरात्मा जो अमरच आहे हेच आहे.पण आपण ते विसरलेलो असल्यामुळे आपल्याला शरीराला सोडण्याची भिती वाटते.ह्यालाच मृत्यूभय म्हणतात.

ह्या सगळ्या विवरणातून मुख्यत: हाच मुद्द समोर येतो की आपण मनाने ह्या सर्व नाशवंताची आसक्ती सोडावी.ईंद्रियेच आपल्याल फसवतात व नाशवंत वस्तूंचा भोग घ्यावा ही लालसा निर्माण करतात. ह्या लालसेचेच न दुसरे नांव वासना हे आहे. ज्या वासना ह्या जन्मात पूर्ण होत नाही त्यांचा भोग मिळाव म्हणून जीव पुन: जन्म घेत रहातो.प्रत्येक वेळि नव्या वासना निर्माण होतात. व जन्म-मृत्यूचे घातचक्र सतत चालूच रहाते.

**माझ्यामते  अभंगाचा पहिला चरणच अभंगाचे सर्वकांही तत्वज्ञान सामावणारा आहे.अभंगाचा दुसरा चरण :-** ह्या चरणामधे तुकाराम महाराजांनी पांडूरंगाचेच वर्णन केले आहे.तो दिन्ही हात कटिवर ठेवून उभा आहे. त्याची कांती कृष्णरूप अर्थात आकाशाप्रमाणेच आहे. तुकाराम महाराजांना निर्गूण भगवंताचेच कल्पनेच्या सामर्थ्यामुळे सगूण दर्शन झाले आहे .

**कृष्ण म्हणजे काळा नव्हे तर ज्याच कांहीच थांग लागत नाही ते आकाश तत्व होय. उपाधीरहित आकाश म्हणजेच परब्रह्म हे सर्व शास्त्रांनी पण स्पष्टपणे सांगितलेच आहे.**

**अभंगाचा तिसरा, चौथा,पाचवाहे एकत्र पणे पहायला हवेत.** कारण येथे आपल्याला तुकाराम महाराज परब्रह्माचेच पांडुरंग म्हणून वर्णन हे स्पष्ट होते. आता अभंगाचा शेवटचा चरण पाहता येतो.

ह्या सहाव्या चरणामधे तुकाराम महाराजांनी हेच स्पष्ट केले आहे की निर्गूण , निर्विकारी, अविनाशी ईत्यादी शब्दांनी ज्याचे वर्णन करण्याचा प्रयत्न शब्द करतात; असे परब्रह्मच भक्तांच्यासाठी सगूनात आले ले आहे. म्हणुनच कोणत्याही रूपात आपण त्याला आपापल्या आवडीप्रमाणे पाहू शकतो. आपल्या स्वप्नामधे सर्व वस्तू आपल्यामधूनच निर्माण आपणच केलेल्या असतात. ह्या आपल्या स्वप्नातल्या त्या वस्तू , प्राणी, माणसे आपणच आहोत. तद्वतच सर्व सृष्टी हे भगवंताचे स्वप्नच आहे . म्हनून सर्व सगूण म्हणजे तोच आहे.

हा विचार आपल्याला उपनिषदांमधे ऐकायला , वाचायला मिळतो. सगूण रुपाची भक्ति करणे तसे सोपे असते.हे सुद्ध येथे स्पष्ट झाले.

**अभंगाची शिकवण** :-

शिकवण हीच आहे की जोपर्यंत आपण द्वैतभावामधे आहोत, जोवर आपण देवाला वेगळे समजत आहोत ; तोवर सगूण रूपाचीच भक्ती करावी. अंती हीच भक्ती जेंव्हा अनन्य भावे होऊ लागते तेंव्हा आपोआपच निर्गूणाची भक्ती घडते.

ॐ

****************

# भाग ३ रा


"Karthavyam Hari Keerthanam" Brothers Catering, Kalpathy, Palakkad, 09447078453 E.Mail:kalpathycatering@yahoo.co.in "Karthavyam Hari Keerthanam"
"Karthavyam Hari Keerthanam" Brothers Catering, Kalpathy, Palakkad, 09447078453 E.Mail:kalpathycatering@yahoo.co.in "Karthavyam Hari Keerthanam"

## संतांचे वर्णन व त्यांचे कार्य .

अ) ह्या भागामधे संतांचे वर्णन व ते भूतलावर कोणते कार्य करतात ह्याचे वर्णन करणारे अभंग घेतलेले आहेत.

ब) ब्रह्मज्ञान झाल्यानंतर तुकाराम महाराजांना जग कसे दिसते , काय अनुभव आले ते सांगणारे अभंग पण येथे घेतलेले आहेत.

**अभंग १ला:-  संत मानवजन्म कां घेतात ह्याचे कारण सांगणारा**

आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणासी। बोलिले जे ऋषी । साच भावें वर्ताया ॥१॥
झाडूं संतांचे मारग । आडराने भरले जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरला तो सेवूं ॥२॥
अर्थ लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें ।विषयलोभीजन । साधन हे बुडविलें॥३॥
पिटू भक्तीचा डांगोरा । कळीकाळासी दरारा।तुका म्हणें करा । जयजयकार आनंद ॥४॥

**अभंगाचा शब्दार्थ** :-
जे ऋषीमुनिंनी सांगितले आहे ते खर्या अर्थाने सांगण्यासाठीच आम्ही वैकुंठवासी संत येथे आलो आहोत॥१॥ हे करण्यासाठी संतांचा मार्ग आम्ही झाडुन स्वच्छ करू कारण जग आडरानामधे (अर्थ न समजल्याने )  भटकत आहे. ॥२॥ विषयी व लोभी लोकांनी पुराणांचा  वेगळाच अर्थ लावून अशा शब्दज्ञानाने साधनेचा नाश केला आहे.॥ ३॥ (म्हणून ) तुका म्हणतो की मी भक्तीचा दांगोरा पिटेन. लोकहो भगवंताच्या नामाचा जयजयकार करण्याचा आनंद लुटा .त्यामुळे कळिकाळालाही तुम्हाला स्पर्श करण्याची हिंमत होणार नाहि ॥४॥

**अभंगामागची भूमीका :-**

आपली पुराणे, उपनिषदे इत्यादी ग्रंथांमधे ज्ञानाचा जणू खजिनाच भरलेला आहे. हे ज्ञान व्यवहारात आपल्याला जगावे कसे ते शिकवाणारे आहेच तसेच आपल्या मानवी जन्माचे सार्थक कसे करून घ्यावे हे पण सांगणारे आहे. पुराणांमधे अनेक रूपकात्मक कथा आहेत व त्यांच्याद्वारे कठीण वाटणारे वेदांतातलेच सिद्धांत समजायला सुलभ होते.

परंतू बरेच वेळा असे होते की फक्त वरवरचा अर्थ पाहिला जातो. कांही स्वार्थी मंडळी स्वत:च्या विषय भोगपूर्तीसाठी पुरांणांतल्या कथांचा भलताच अर्थ लावतात.त्यांच्या लौकीक विद्वत्तेच्या प्रभावामुळे हे लोक जे सांगतात तेच योग्य असे पण भोळीभाबडी मंडळी समजतात. ह्या दांभिकांमुळे मूळ ज्ञानाचा लोपच होतो व लोकांचे खरेतर नुकसानच होते.

तुकाराम महाराजांना अशा दांभिकतेबद्दल चीडच आहे. अशा लोकांवर विश्वास ठेवू नका व आत्मज्ञानी संताच्या उपदेशा प्रमाणे वागा असे संत ह्यासाठीच अवतरले आहेत असे ह्या अभंगात सांगतात.

वेळोवेळी असे संत आपल्या भारतभूमीमधे अवतरले आहेत हे आपण इतिहासाकडे दृष्टी टाकली तर सहज लक्षांत येते. अगदी अलिकडच्या काळामधे श्री रामकृष्णपरमहंस, स्वामी विवेकानंद , शिरडीचे साईबाबा, शेगांवचे गजानन महाराज, अक्कलकोटचे स्वामीसमर्थ होऊन गेले. हे सर्वजण तुकाराम महाराजांप्रमाणेच आपल्याला मार्गदर्शन करण्यासाठीच आले होते हे त्यांच्या चरीत्रावरून समजते.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण:_**

ह्या अभंगामधे तुकाराम महाराज सुरवातीलाच स्पष्ट करताहेत की ते स्वत:सुद्धा ह्याच कामासाठी आलेले आहेत. पुढे महाराज म्हणतात की आपल्या ऋषींनी सागितले आहे ते खरेच आहे. हे ज्ञान त्याच्या मुखातून बाहेत पडेले आहे व हे ज्ञान म्हणजेच जणू अन्न आहे.
अर्थात हे उच्छीष्ट अन्न म्हणजे ज्ञान आपण सेवन करायला काहीच आडकाठी येत नाही.
हे ज्ञान म्हणजे परमार्थाचा मार्ग आहे. महाराज म्हणतात की ह्यामार्गाव बरीच झाडी व जंगले वाढली आहे व महाराज स्वत: ही झाडी साफ करून मार्ग स्पष्ट दिसावा ह्यासाठी प्रयत्न करणार आहेत.
येथे झाडी हे एक रूपक आहे. दांभिक लोकांनी पुराणाचा जो भलताच अर्थ लावून दिशाभूल केली आहे ती म्हणजेच झाडी व जंगले होय.

उदाहरणार्थ भागवतामधली भक्त प्रहलादाचीच कथा घेता येते.
हिरण्यकश्यपूने प्रह्लाद सतत नारायणाचे नामस्मरण करतो म्हणुन त्याला ठार मारण्याचे अनेक प्रयत्न केले पण उपयोग झाला नाही. शेवटी त्याने अत्यंत रागाने विचारले की तुझा नारायण कोठे आहे? प्रह्लादाने सांगितले की तो तर सर्वत्र आहे , तो सर्वव्यापी आहे. तो नाही अशी कोणतीच जागा नाही.

मग हिरण्यकश्यपूने खांबावर लाथ मारली व भगवंत नृसिंहरूपे प्रगट झाले व त्यांनी हिरण्यकश्यपूच वध केला.

**ह्या कथेमधून आपल्याला हेच समजावले आहे की भगवंत सर्वत्र आहे. त्याला प्रेमाने आळवले की तो भक्तासाठी अव्यक्तामधून व्यक्तरूपात येतो.व भक्ताचे संरक्षण करतो.**

***पण आजकाल अशा कथांना भाकड कथा म्हणून समजले जाते. दोष कथाकाराचा नाही तर कथेकडे पाहणारी जी व्यक्ती आहे तिचा आहे.***

तुकाराम महाराज आपल्याला  असा दोषपूर्ण दृष्टीकोन ठेवू नका व कथेमागचे तत्वज्ञान समजून घ्या असेच ह्या अभंगात आपल्याला सांगून अभंगाच्या शेवटी सांगताहेत की म्हणूनच म्हणतो की भक्ती करा, भगवंताचा जयजयकार करून जीवन आनंदी करा.असे केल्याने तुम्ही कालातीत व्हाल हे पण येथे सांगितले आहे.

तसेच दांभिकांपासून दोन पाऊले दूरच रहाहे पण महाराजांनी सांगितले आहे.

**अभंगाची शिकवण :_**

संतांच्या सांगण्यावर विश्वास ठेवावा व त्यांनी दाखवलेल्या मार्गावर चालत रहावे.

ॐ

****************

**अभंग २ रा :- संतांचे कार्य काय ते सांगणारा**

सेवितों हा रस वांटितो आणिकां । घ्यारे होऊं नका रानभरी ॥१॥

विटेवरी ज्याची पाऊले समान । तोचि येक दाता दानशूर ॥२॥

मनाचें संकल्प पाववील सिद्धी । जरी राहें बुद्धी याचें पायी ॥ ३॥

तुका म्हणें मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

ज्याची समचरणें विटेवर आहेत असा विठ्ठल अत्यंत दानशूर आहे. ॥२॥
त्याच्या पाय़ी जर मन ठेवले तर तो तुमचे सर्व संकल्प पूर्ण करेल ॥३॥
त्याने दिलेला हा (अंमृताचा ) रस मी चाखतो आहेच व सर्वांना वाटतो पण आहे ॥१॥
तुका म्हणतो की (त्या विठ्ठलानेच) मला हा संदेश सर्वांना सांगण्यासाठी ह्या जगामधे धाडले आहे . त्याच्या पाय़ी मन ठेवणे हाच सोपा व सुखकर मार्ग आहे ॥ ४॥

**अभंगामागची भूमिका ;-**

गेल्या २९ मार्च २०१३ तारखेलाच तुकाराम बीज झाली , महाराज देहू येथे ह्याच दिवशी सदेह वैकुंठास गेले . बीजेच्या दिवशी देहूला मोठा सोहळा साजरा केला जातो.

ह्या अभंगाचे वैशिष्ठ्य़ म्हणजे येथे महाराजांनी आपण कां जन्म घेतला ते सांगितलेआहे. म्हणुनच ह्या अभंगाचे वेगळेच महत्व आहे.
महाराजांचे दैवत विठ्ठल हेच आहे. पंढरपूरास विठोबाची मूर्ती एका विटेवर दोन्ही चरण जोडून उभी अशी आहे.भक्त पुंडलिकाने पुंडलिकाने आपल्या आईवडीलांमधे भगवंतास पाहिले व जेंव्हा भगवंत त्याला दर्शन देण्यास आले तेंव्हा .आईवडीलांच्या सेवेत मग्न असल्याने त्याने फेकलेल्या विटेवर भगवंत उभे राहिले. अशी ह्या मागची आख्यायिका आहे. पुंडलिकाची समाधी म्हणजेच विठ्ठलमंदिराची पहिली पायरी आहे. पुंडलिकाने आपल्या आईवडीलांमधे भगवंतास पाहिले .भगवंत हा असा भक्तांचा भुकेला आहे.

**अभंगाचे अर्थ स्पष्टीकरण :-**

तुकाराम महाराज म्हणतात की त्यांचे दैवत श्री.विठ्ठल हा फार उदार व दानशूर आहे. सगळयांत उत्तम दान कोणते ह्या प्रश्नाचे उत्तर म्हणजे ज्यामुळे सर्व विश्वावर सत्ता मिळते ते अर्थात मोक्षलक्ष्मीचे दान होय. हे दान भगवंत त्याच्या अनन्य भक्तालाच देतो.
तुकाराम महाराज ह्या अभंगाच्या तिसऱ्या चरणांत म्हणतात की लोकहो अश्या ह्या विठोबाच्या पायी तुमचे मन स्थिर ठेवा . असे जर केलेत तर मी खात्रीपूर्वक सांगतो आहे की तुमचे सर्व मनोरथ ईच्छाआकांक्षा तो पूर्ण करेल.

पुढे स्वत:चेच उदाहरण देऊन , तुकाराम महाराज म्हणतात की हा अमृताचा रस मी तर चाखतोच आहे व तुम्हा सर्वांना पण वाटतो आहे. हा रस घ्या ह्याला नाही म्हणू नका.स्वता:च्या कल्याणाचा हाच एक अत्यंत सोपा व सुखकर मार्ग आहे. ह्या मार्गावर चालायला तुम्हाला कांहीही कष्ट पडणार नाहीत.मला ह्याच कामा करीता पांडुरंगाने ह्या जगामधे पाठवलेले आहे.

**अभंगाची शिकवण :-**

सतत भगवंताची आठवण ठेवणे हेच मोक्षप्राप्तीसाठी सोपे साधन आहे. त्यासाठीचनामस्मरण , भगवंतच कर्ता करविता हे ध्यानी ठेवायला हवे.

ॐ

**************************************************

**अभंग ३ रा :- संत पुरुषाचे वर्णन करणारा**

सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार समूळ आशा ।
निंदा हिंसा नाही कपट देहबुद्धि। निर्मळ स्फटिक जैसा ॥ १ ॥
मोक्षाचे तिर्थ न लगे वाराणसी । येती तयापासीं अवघें जन ।
तीर्थासी तीर्थ जाला तोचि एक । मोक्ष तेणें दर्शने ॥ २॥
मन शुद्ध तया काय करीसी माळा । मंडित सकळा भूषणांसी ।

हरिच्या गुणें गर्जताती सदा । आनंद तया मानसीं ॥ ३ ॥
तन मन धन दिले पुरुषोत्तमा । आशां नाहीं कवणाची ।
तुका म्हणे तो परिसाहूनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ:-**

जेंव्हा अहंकाराचाव आशांचा नाश होतो तेंव्हा सर्व शरीर शुद्ध होते.चिंतामणी सारखे रत्न रूप होते.॥ १॥ .

जेंव्हा निंदा, हिंसा , कपटिपणा व हे देणारी देहबुद्धी, हे सर्व नसतात तेंव्हा मन स्फटिकाप्रमाणे निर्मळ होते ॥ २॥

असा जो माणुस असतो तेहेच सर्व तीर्थे वास करत असतात. मग ज्याला पापक्षालन करायचे असेल त्याला वाराणशीला जाण्याची जरुरी नाहि. अशा माणसाकडे सर्व लोक त्यचे द्र्शन घ्यायला येतात.॥ ३॥

तो स्वत:च तीर्थरूप असल्याने त्याच्या दर्शनानेच मोक्ष मिळतो.॥ ४॥

ज्याचे मन असे शुद्ध असते त्याला बाह्य अलंकार माळा वगैरेंची आवश्यकता नसते. ति स्वत:च जणू अलंकार असतो.॥ ५॥

असे संतपुरुष नेहमी हरीनामाच गजर करत असतात व हरीनाम म्हणण्याचा आनंद लुटत असतात.॥६ ॥

त्यांचे तन , मन सर्व पुरुषोत्तमास अर्पण केलेले असते.त्यांना कसलीच आश वासना मनांत नसते.।॥७॥

तुका म्हणतो की असा पुरुष परुइसापेक्षाही श्रेष्ठ असतो . त्याची थोरवी किती म्हणून वर्णावी॥ ८॥

**अभंगाचा अर्थ स्पष्टीकरणासाठी लागणारी माहिती, अभंगाची भूमीका**

आपण आतापर्यंत हे पाहिलेच आहे की ब्रह्मज्ञानी संत कसे असतात. हा अभंग अशा संताची कांही वैशिष्ठ्य प्रगट करतो.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :**

भगवंतासाठी फक्त प्रेमाने भरलेले असे संताचे अंत:करण हे अत्यंत निर्मळ असते. त्यांच्यामधे अहंकाराची नाम निशाणीही उरलेली नसते. त्यामुळे त्यांच्या मनामधे काम, क्रोध,आसक्ती, लोभ, मद व मत्सर हे षडरिपू कधीच नसतात. व खरेतर त्यांचे मन उन्मनी अवस्थेमधे असते. अर्थातच फक्त शुद्ध ब्रह्मानंद अशा संताच्या ठायी असतो.

असे जेंव्हा मन असते तेच खरे शुद्ध असते असे म्हणता येईल.

आपल्या देशामधे असे समजतात की अशा संताची भेट झाली व त्यांचा उपदेश ऐकायला मिळाला तर जो असा लाभ घेतो त्याची सर्व पापे नष्ट होतात. ( जणू त्याने गंगेसारखा पापक्षालक नदीमधे स्नानच केले आहे तसे.)
आप्ल्याकडे असाही समज आहे की जे वाराणशीला देहत्याग करतो त्याला अनायसे मुक्ती मिळते, असे वारणशी( सध्याचे नाव काशी) ह्या तीर्थक्षेत्राचे माहात्म्य आहे. अशी अनेक तीर्थक्षेत्रे आपल्या देशामधे आहेत. तुकाराम महाराज म्हणतात की सत्पुरुषाचे दर्शन घेणे असे तीर्थक्षेत्रास जाऊन येण्यासारखेच असते. अशा पुरुषाकडे जाऊन त्यांचे आशीर्वाद घेतले तर मग इतर कोठल्याही ठिकाणी जाण्याची आवश्यकता नाही. संताचे दर्शन सुद्धा मोक्षदायीच असते.

आपले रोजचे वागणे पाहिले तर आपण चांगला पोषाख करतो, त्याव कधीकधी अलंकार पण घालतो. हे सर्व आपण लोकांना हुशार, व आकर्षक दिसावे म्हणुन करतो. पण मनाचे सौन्दर्य हेच खरे सौंदर्य असते. ब्रह्मज्ञानी पुरुषाचे मन सर्वांपेक्षा अत्यंत सुंदर असते. त्याची तुलना कोठल्याच सौन्दर्यवंत वस्तूशी करणे ही अशक्यातली गोष्ट आहे. तरीही जर एखाद्या अशा सर्वज्ञानी व्यक्तिने जर कांही अलंकार धारण केले तर असे म्हणावे लागेल की "अलंकारानाच त्या व्यक्तीमुळे शोभा आली आहे."

अशी ब्रह्मज्ञानी व्यक्ती तनामनाने नेहमीच भगवंतमय झालेली असते व भगवंता विषयीच बोलताना आढळेल. जनसामान्याला अशा व्यक्तीचे महात्म्य ठावूक असल्याने ते अशा व्यक्तिंचे दर्शन घेण्यास , त्यांचे बोलणे ऐकण्यास लोक गर्दी करतात. अशा

व्यक्तीला बाह्य संपत्ती, देखावा, भोग इत्यादी कशाचीही ईच्छा वा वासना नसते. भगवंतास संपूर्ण शरणागत झाल्याने व ब्रह्मरूपता आल्यामुळे त्यांना सर्वत्र भगवंतच भरून आहे हाच अनुभव सतत येत असतो. सर्वांभूती भगवंत पाहिल्याने तो सर्वांचे भले व्हावे ह्याचीच चिंता करतो.

संत तुकाराम म्हणतात की असा पुरुष हा कोठल्याही परीसापेक्षा जास्त श्रेष्ठ असतो. परीस फक्त लोखंडाचे सोन्यामधे रुपांतर करतो. पण अशा पुरुषाचे सांनिध्य, सहवास, हे अत्यंत बद्धालाही ब्रह्मपदावर नेणारे असते. अर्थात परीसाची उपमा अशा प्रुरुषाला कंमीच पडते.
म्हणुनच महाराज अभंगाच्या शेवटी म्हणतात की अशा पुरुषाच्या थोरवीचे वर्णन करण्यास
शब्द अपुरेच पडतात.
टीप: ह्या अभंगामधे सत्पुरुषांच्या गुणांचे वर्णन आहे. आपण आहोत ह्या शतकांत पण असे सत्पुरुष होऊन गेले आहेत. अर्थात असे सत्पुरुष ओळखण्यास भाग्यच हवे. ज्यांना अशा व्यक्तिंचा प्रत्यक्ष सहवास लाभत असतो ती मंडळी खरोखरच भाग्यवान म्हटली पाहिजेत. असो..
आता अशा व्यक्तींची चरित्रे पुस्तक रूपात वाचायला मिळतात. ही चरित्रे वाचल्याने सुद्धा संत काय सांगतात ते समजायला मदत होते.
महाराष्ट्रामधे गोंदवलेकर महाराज , गजानन महाराज, शिरडिचे साईबाबा , बंगालचे श्री. रामकृष्ण परमहंस हे संत ह्या शतकात होऊन गेले. श्री. म. लिखित Gospel of Shri. Ramakrishna “ ह्या पुस्तकामधे तर त्यांच्या एका भक्ताने ते कसे बोलले इत्यादीची रोजनिशी लिहिली आहे. दक्षीण भारतातले श्री.रमण महर्षी , शृंगेरी मठाचे स्वामीचंद्रशेखर सरस्वती शंकराचार्य , योगी अरवींद हे प्रसिद्ध संत होऊन गेले आहेत.

ॐ

*******************

**संतांचे कार्य व संतसंगतीचे महत्व काय ? हे सांगणारे २ अभंग**

**अभंग १ ला :-**

रवी दीप हिरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें संतांचेनि ॥१॥
त्यांचा महिमा काय वर्णूं मी पामर । न कळें तो साचार ब्रह्मादिकां ॥२॥
तापली चंदन निववितो कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥३॥
मायबापें पिंड पाळियला माया। जन्ममरण जाया संत संग ॥४॥
संतांचे वचन वारी जन्मदु:ख । मिष्टान्न तें भूक निवारण ॥५॥
तुका म्हणें जवळीं न पाचारिता जावें । संतचरणी भावें रिघावया ॥६॥

**अभंगाचा शब्दार्थ** :- सूर्य ,दिवा, चमकणारा हिर्याचा प्रकाशामधे दृश्य दिसते. पण संतांच्या दर्शनाने जे अदृश्य आहे ते सुद्धा दिसते.॥ त्यांचा महिमा ब्रह्मादिकांना कळला नाहि व मग मी पामर तो कसा वर्णन करू शकेन ॥ चंदनाचा लेप केला तर ताप उतरतो , पण संतसंग त्रिगुणातीत करतो. ॥ आईवडील मायेने शरीराचे पोषण करतात. संत संगाने जन्ममरणातीत होणे घडते.॥ गोड जेवण भूक भागवते, पण संतवचनाने जन्मदू:खतून सुटका होते. ॥ तुका म्हणतो की संतांनी जरी जवळ बोलावले नसेल तरी पण संतचरणी भावाने शरण जावे ॥

**अभंग २ रा :-**

पाप ताप दैन्य जाय उठाउठी । जाहलिया भेटी हरिदासाची ॥१॥
ऐसें बळ नाही आणिकांचे अंगी । तप तीर्थ जगीं दान व्रत ॥२॥
चरणींचे रज रज वंदे शूळपाणी । नाचती कीर्तनीं त्याचे माथां ॥३॥
भव तरावया उत्तम हें नाव । भिजों नेदी पाव हात कांही ॥४॥
तुका म्हणें मन झालें समाधान । देखिल्यां चरण वैष्णवांचे ॥५॥

**अभंगाचा शब्दार्थ :-** जर हरीदासाची भेट झाली तर सर्व पाप ताप व दैन्याचे हरण होते. अशी शक्ती जगातल्या ईतर कोणत्याही साधनामधे जसे तप करणे, तीर्थयात्रा करणे, दान करणे किंवा व्रताचरण करणे ईत्यादिंमधे नाही. ॥ स्वत:

श्री शंकर सुद्धा हरिदासाच्या चरणधूळिला वंदनीय मानतात व कीर्तन करताना माथ्यावर घेतात. आपले हात पाय न भिजू देता भवसागर पार करणारी हरिदास हिच जणु एक नाव आहे. ॥तुका म्हणतो की अशा वैष्णवांचा चरणांचे दर्शन झाले व मनाला समाधान मिळाले ॥ २ ॥

**अभंगाच्या अर्थस्पष्टिकरणा साठी असलेली पार्श्वभूमी :-**

तुकाराम महाराजांच्या अभंगांचे एक वैशिष्ठ्य हे आहे की अभंगातल्या कांही चरणाचा अर्थ सरळ सोपा असतो. तर कांही चरण असे असतात की त्यांचा गूढार्थ आपल्याला भगवद्भेटिस जाण्याचा मार्ग सोपा करून देतो. ह्या अभंगांची रचना पण अशीच आहे.

संतांची लक्षणे कोणती ते वर्णन करणारे कांही अभंग आपण मागे पाहिले पाहिली आहेतच.

संत म्हणजे ब्रह्मज्ञानी पुरुष होत हे आपण जाणतोच. अशी संतमंडळी फक्त भवसागरातल्या तापांमुळे होरपळत असलेल्या लोकांचे कल्याण व्हावे म्हणूनच कार्यरत असतात.

**ब्रह्मज्ञान अर्थात आत्मज्ञान हे एकमेव असे ज्ञान आहे की जे मिळाले की नवे व आणखी कांही मिळवायचेच शिल्लक रहात नाही. अशा व्यक्तीला खरेतर सर्व विश्वाचे स्वामित्व मिळालेले असते. आत्मज्ञान होणॆ ह्यालात्र मोक्ष मिळणे असेही म्हणतात.**

फक्त मनुष्य जन्मामधेच हे ज्ञान मिळणे शक्य असते व म्हणूनच अनेक लोक ह्यासाठीच प्रयत्न करत असतात. ह्या प्रयत्नांचे स्वरूप जप ,तप, पूजा , कीर्तन, अर्चन, तीर्थयात्रा, व्रते , दान ईत्यादि कर्मे करणे असे असते. अर्थातच असे प्रयत्न खूप काळ व निष्काम भावनेने करणे जमले तरच फळ मिळण्याची शक्यता

असते. थोडक्यात म्हणायचे झाले तर हे असे वागणे सर्वसाधारण माणसासा कठीणच असते.

***पण मोक्षाची वाट दाखवणारा एक आणखी सोपा उपाय संतांनी सांगितला आहे. तो म्हणजे सत्संगतीत राहणे.***
***अशा सत्संगतीत जर आपण राहिलो तर काय फायदे होतात ते तुकाराम महाराजांनी ज्या दोन अभंगांमधे आपल्याला सांगितले आहेत तेच आता आपण येथे पाहणार आहोत.***

**अभंगांच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

**अभंग १ ला ( रवी दीप हिरा दाविती देखणें) चरण असलेला ) :-**

अभंगाच्या पहिल्याच चरणामधे तुकाराम महाराजांनी दृश्य व अव्यक्त भगवंत ह्यांच्या मधला फरक स्पष्ट केला आहे .

दृश्यातल्या वस्तूचे दर्शन ( वस्तू दिसणे ही क्रिया ) सहज घडते. त्यासाठी आपल्याला सूर्यप्रकाश, दिवा किंवा दिव्याचा प्रकाश पडून चमचमणारा पुरेसे आहेत.

भगवंत म्हणजेच ह्या सर्व विश्वाचा स्वामी (**जो सर्वज्ञ , सर्वशक्तीमान, सर्वव्यापी आहे व अव्यक्त राहून सर्व विश्वाचा कारभार तो चालवत असतो**) त्याचे दर्शन होण्यासाठी ***संतसंगतीचा प्रकाशच*** म्हणजेच संतसंगत हीच आवश्यक असते (कारण संतांनाच भगवंत कळलेला असतो, ) **हा प्रकाश म्हणजेच ज्ञानदृष्टीचा लाभ होणे होय. जो संताच्या उपदेशानुसार आपले वागणे ठेवतो त्याला योग्यवेळी हॊ ज्ञानदृष्टी संतकृपेमुळे ( सद्‌गुरुकृपा ) मिळते. ह्यासाठीच संतसंगतीत रहायला हवे.**

**संताची प्रत्यक्ष भेट होणे तसे दुर्मीळच पण संतांचे ग्रंथ हे त्यांचेच रूप होय व आपण नक्कीच अशा ग्रंथाची संगत ठेवू शकतो. असो.**

***संत संगतीचे महत्व खालील तीन उदाहरणे दृष्टांत  देऊन महाराजांनी स्पष्ट केले आहे.***

***दृष्टांत १)*** आईवडील आपल्याला ह्या जगामधे पोसतात , वाढवतात सांभाळतात. दु:खांपासून संरक्षण करतात .  पण ते आपल्या मुलाबाळाचे सर्व प्रकारच्या दु:खापासून नेहमीच रक्षण करू शकत नाहीत. आईवडीलाची माया खरेतर जन्मदु:खातच अडकवणारी असते कारण आपल्या मुलांनी भरपूर संपत्ती मिळवावी, लग्न करून सुखाचा संसार करावा ह्यासाठीच ते नेहमी प्रयनशील असतात. सर्व शिक्षणपण ह्याच उद्देशाने घेतले जाते.  व्यवहार दृष्ष्या ह्यात कांहिच चूक नाही. पण मग अर्थातच मनुष्य जन्माची अनमोल संधी व्यर्थ जाते व जीव जन्ममृत्यूचक्रामधे भटकत राहतो. अशा जीवाला खरे शाश्वत समाधान कधीच मिळत नाही.

ह्याउलट परिणाम संताच्या बाबतीत होते.

***संतमाऊली रूपाने ( आईच्या सारखेच)  भगवंतच आपल्यामधे आलेले असतात / येतात***  म्हणुनच व त्यांची संगत सहवास माणसाला  जन्ममृत्यूचक्रामधून नेहमीसाठी  सोडवते व खरे समाधान मिळवून देते.

***दृष्टांत*** २)  चंदनाचा लेप आपल्याला ज्वरातून आपल्याला बरे करतो. पण संतसंग आपल्याला त्रिगुणातीत करतो व भवतापाच्या ज्वरातून बाहेर काढतो. आधीच्या अभंगाच्यावरच्या विवरणामधे हा मुद्दा येऊन गेला आहे की वासना हे जन्ममृत्यूचक्रात अडकण्याचे व त्यामुळे सतत दु:खभोगांचे मुख्य कारण आहे.

प्रत्येक माणुस व प्राणीमात्र हे त्रिगुणांच्या आधिपत्याखाली वावरत असतात. तमोगुणामुळे   ईतरांना दु:ख देणारी कर्मे घडतात. रजोगुणामुळे विषयभोगांच्या वासना तृप्तीसाठी कर्म केले जाते . वासना तृप्ती झाली तरी त्यांचा अंश बीजरूपाने उरतो व हा अंश पुढच्या जन्माची तयारी करतो. सत्वगुण नक्कीच भगवद्भेटीस उपयोगी आहे. पण त्यामुळे सुद्धा मनामधे  सात्विक कर्माचा

अहंकार उत्पन्न होऊन अधोगती होऊ शकते. भगवंताची भेट होण्यासाठी अहंकार संपूर्ण लयाला जायला हवा ते होत नाही . म्हणुनच श्रीमद्‌भगवद्‌गीतेमधे पण भगवताने " अर्जूना तू त्रिगुणातीत हो " अस उपदेश केला आहे.

त्रिगुणातीत होण्यासाठी सर्व संतांनी थोडक्यात खालील उपदेश केलेला आहे.

अ) भगवंत सर्वांभूती आहे. म्हणून सर्व प्राणीमात्रांशी प्रेमानेच व्यवहार करावा. त्यांना सुख होईल ह्यासाठीच प्रयत्नशील असावे. अशी माणसे आजही आपल्याला आढळतात.

उदाहरण द्यायचे झाले तर **१) ज्याने पोलियोची लस शोधली तो महान शास्त्रज्ञ जोनास साल्क. त्याने ह्या लशीचे पेटंत घेतले नाही तर सर्वांसाठी आपला शोध खुला केला**

**२) डा. बाबा आमटे ज्यांनी आदिवासी जनांच्या साठी आपले जीवन वाहून घेतले आहे.**

**३) श्री.रामकृष्ण मिशनचे अनेक संन्यासी.**

ब) जे आहे त्याचा अधिपती , स्वामी भगवंत आहे हे समजून घ्यावे व नाशवंत वस्तूंची आसक्ती सोडावी.

क) कर्ता करविता पण भगवंतच आहे. तोच आपल्याला कार्य करण्याची बुद्धी देतो. म्हणुन जे काम आपल्याला मिळते ते त्याची पूजा म्हणूनच करावे. त्याचे जे कांहि फळ मिळेल ते आनंदाने स्विकारावे व समाधानी रहावे.

ड) सतत त्याचे स्मरण ठेवावे.( ह्यासाठी नामस्मरणाचे सोपे साधन संतांनी आपल्याला दिले आहे.

**ह्या रीतिने जर आपण व्यवहारात वागलो तर आपोआपच त्रिगुणातीत होऊ शकतो हा मुद्दा येथे स्पष्ट केलेला आहे.**

***दृष्टांत*** **३)** उत्तम सुग्रास गोड जेवणाने भूक भागून माणूस तृप्त होतो. पण कांहिवेळाने परत भूक लागते व झालेले समाधान नष्ट होते. ह्याउलट संतवचनाप्रमाणे वागले की असे समाधान मिळते की माणूस कायमचा समाधानी तृप्त होतो.

अभंगाच्या शेवटी म्हणूनच तुकाराम महाराज सांगतात की मी हे जे वर सांगितले आहे ते समजून घ्यावे व संतांनी जरी जवळ बोलावले नसले तरीपण त्यांना शरण जावे व नरदेहाचे सार्थ करून घ्यावे.

**अभंग २ चे स्पष्टीकरण (पाप ताप दैन्य जाय उठाउठी) चरणापासून सुरू झालेला :-**

संताना शरण गेल्यावर होणारे फायदे पुढच्या अभंगात जरा वेगळया पद्धतीने तुकाराम महाराजांनी सांगितले आहे.

**अभंगाच्या पहिल्याच चरणामधे** महाराज म्हणतात की जर हरीदासाची भेट झाली तर सर्व पाप ताप व दैन्याचे हरण होते. **येथे हरिदास हा शब्द संत ह्या शब्दाला पर्यायी म्हणुन तुकाराम महाराजांनी योजलेला आहे.** पापाची व्याख्या " भगवंताचे अर्थात स्वस्वरूपाचे विस्मरण होऊन केलेले वागणे “ अशी समर्थ रामदासांनी " केली आहे. असे विस्मरण झाल्यामुळेच माणूस विषयभोगांच्या मागे धावत असतो. भोग मिळाल्याने तात्पुरते समाधान मिळते पण तेच परत परत घ्यावेसे वाटते व शेवटी शरीराला रोग दु:खच मिळते. ह्याशिवाय वासनाबीजांच्या निर्मितीमुळे पुढच्या जन्माची तयारी होते. म्हणून विस्मरण हे पाप आहे. पण जेंव्हा संताची भेट होते किंवा संत साहित्याचे वाचन,मनन घडते तेंव्हा मोक्षाचा मार्ग स्पष्ट होतो व सर्व दु:खांचे निवारण होते.

**पुढच्या चरणामधे** महाराज म्हणताहेत की ही दु:खनिवारण करण्याची शक्ती जगातल्या ईतर कोणत्याही साधनामधे जसे तप करणे, तीर्थयात्रा करणे, दान करणे किंवा व्रताचरण करणे ईत्यादिंमधे नाही. कारण स्पष्टच आहे . ह्या

कार्यामुळे पुण्यपदरी पडेलही, अंगी सात्विकता  पण येईल. पण ह्यामुळे मोक्षाची शक्यता फार कमी असते.

श्रीमद् शंकराचार्य भजगोविंदम स्तोत्राच्या शेवटि हेच सांगतात की
***" कुरुते गंगासागर गमनं, व्रतपरिपालन अथवा दानं ,***
***ज्ञान विहीनं कर्म अनेन ,मुक्तिर्नभवती जन्मशतेन "***.
हाच मुद्दा अभंगात तुकाराम महाराजांनी सांगितलेला आहे.

संतसंगत किती महत्वाची आहे हे सांगण्यासाठी दुसरा दृष्टांत प्रत्यक्ष भगवान शंकरांचा महाराजांनी अभंगात लिहिलेला आहे. भगवान शंकर हे सतत "रामनाम स्मरण "करीत असतात. **येथे राम म्हणजे परब्रह्म व शंकर भगवानांचे रामनामस्मरण म्हणजेच स्वस्वरूपाचे स्मरण असणे होय.**
म्हणुनच मला असे वाटते की शंकर सुद्धा हरिदासाच्या ( म्हणजेच परब्रह्मरूप संताच्या ) चरण धूलीला मस्तकावर घेतात, अशा हरिदासांचे कीर्तन करतात  हेच तुकाराम महाराजांनी अभंगात म्हटले आहे.
व **अभंगाचे शेवटचे चरण** हेच म्हणतात की अशा हरीदासांची संगत तसेच त्यांचे चरण दर्शन ( त्यांच्या पायी  केलेली संपूर्ण शरणागती ) हीच जणू एक नाव आहे. ह्या नावेमुळे आपले हातपाय न भिजता ( संसारचे कष्ट सुसह्य होतात) भवसागर पार होतो. जन्मदु::खाचे निवारण होते ; अर्थात शाश्वत समाधानाचा धनी होणे घडते.

**अभंगाची शिकवण :-**

शिकवण हीच आहे की संत पुरुषांना शोधावे **अथवा** त्यांचा उपदेश समजून घ्यावा व त्याप्रमाणे वागणूक ठेवून आपल्याला मिळालेल्या मानव जन्माचे सार्थक करून घ्यावे.

ॐ

*********************

## *साधू- संतांची लक्षणे सांगणारे तीन अभंग :-*

**अभंग १ ला :-**

जे कां रंजले गांजले । त्यांसी म्हणें जो आपुले ॥१॥
तोची साधू ऒळखावां । देव तेथेंची जाणांवा ॥२॥
मृदू सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचे चित्त ॥३॥
ज्यासि आपंगिता नाही । त्यासि धरी जो हृदयी ॥४॥
दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥५॥
तुका म्हणें सांगू किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ ६॥

**अभंग २ रा :-**

पुण्यपापा ठाव नाहीं सुखदु:खा । हानि लाभ शंका नासलिया ॥१॥
जितां मरण आलें आपपर गेलें । मूळ छेदिलें संसाराचें ॥२॥
अधिकार जात वर्णधर्म जात । ठाव नाही सत्य असत्याशीं ॥३॥
जन वन भिन्न अचेत चळण । नांही दुजेपण ठावे यांसी ॥४॥
तुका म्हणें देह वाहिला विठ्ठलीं । तेंव्हाच घडली सर्व पूजा ॥ ५ ॥

**अभंग ३ रा :-**

संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचे काम नाही तेथें ॥ १॥
बहु दुधड जरी झाली म्हैस गाय । तरि होईल काय कामधेनू ॥२॥
तुका म्हणें अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥३॥

**अभंगांच्या अर्थाचे विवरण :-**

**संत कोणाला म्हणावे याबद्दल तुकाराम महाराजांचे जे अनेक अभंग आहेता त्यातील हे तीन अभंग आहेत. आपण जर श्री भगवद्गीतेतला १२ वा अध्याय वाचला तर तसेच दासबोधातील संतस्तवन समासात आपल्याला संतांचे वर्णन वाचायला मिळते. तुकाराम महाराजांचे हे अभंग असेच वर्णन करतात.**

**अभंग १ ला:-**

खरा साधू म्हणजेच संत जो असतो त्याच्या अंत:करणात रंजल्या गांजल्या लोकांबद्दल असीम करूणा असते . तुकाराम महाराजांनी अशा मृदू अंत:करणाचे वर्णन करण्यासाठी लोंण्य़ाची उपमा वापरलेली आहे. लोणी जसे अंतर्बाह्य मऊच असते तसेच संतांचे अंत:करण असते. म्हणूनच ज्यांचा कोणीही रक्षण करणारा नसतो त्यांचे रक्षण करण्यासाठी असा संतपुरुष नेहमीच तत्पर असतो. सर्वसाधारण माणसे फक्त स्वत:च्या मुलांवरच माया करतात. पण संत पुरूष आपल्या मुलाबाळांवर जेवढे प्रेम करतो तेवढेच आपल्या नोकर मंडळींवर सुद्धा करतो. तो दयेचा सागरच असतो.

एकनाथ महाराजांच्या चरित्रामधे असे प्रसंग आहेत. पूर्वी तीर्थ यात्रा करण्यासाठी लोक उत्तरेत काशीला जात व परत येतान गंगेचे पाणी आणत. हे पाणी दक्षीणेकडील रामेश्वरास जाऊन समुद्रात अर्पण करण्याची प्रथा होती व अजूनही आहे. एकनाथ महाराज काशीयात्रेहून येतांना गंगेचे पाणी घेऊन आले होते व अर्थातच रामेश्वरास जाणार होते. पण गावात आल्यावर गोदावरी नदीच्या काठावर वाळवंटामधे एक गाढव तहानेने तळमळत असल्याचे पाहिल्यावर त्यांनी स्वत:जवळचे गंगेचे जल त्या तहानेल्या गाढवाचच्या तोंडी घातले व अर्थातच मग ते रामेश्वरास गेले नाहीत. असेच प्रसंग आपल्याला स्वामी विवेकानंदांच्या चरित्रात आढळतात. महारोग्यांची सेवा करणार्या संत तेरेसा आपल्या सर्वांनाच माहीत आहेत.
थोडक्यात सांगायचे तर जे संत असतात ते दु:खाने व्याकूळ झालेल्या जनसामान्यांना आपलेच समजतात व अशा लोकांच्या कल्याणसाठी आपले जीवन खर्च करतात. तुकाराम महाराज म्हणतात की असा संतपुरुष म्हणजेच भगवंताची सगूण मूर्तीच होय.

**अभंग २ च्या अर्थाचे विवरण:-**

असे हे संतपण कसे अंगी येते? तसेच संतांमधे आणखी कोणती लक्षणे आढळतात? हे सांगण्यासाठी तुकाराम महाराजांनी स्वत:चेच उदाहरण दिले आहे.

जेंव्हा माणसाला ब्रह्मज्ञान होते तेंव्हा असे असा पुरुष संत म्हटला जातो. अशी व्यक्ती सर्वत्र आपणच आहोत ह्या भावातच सतत असते. त्यामुळे आपपरभाव उरलेलाच नसतो.

अशा पुरुषाला पापपुण्याची बाधा नसते. कारण अशा माणसाचे प्रत्येक कर्म हे निष्काम भावातच घडलेले असते. अर्थातच असे केले तर मला फायदा होईल व असे केले तर माझे नुकसान होईल ही भीती अशा पुरुषाच्या अंत:करणला स्पर्श करत नाही. तसेच आपणच सर्वत्र आहोत हा सतत असणारा अनुभवभाव असल्याने अशा पुरुषामधे आपपरभाव समूळ नष्ट झालेला असल्यामुळे वर्ण , जात, धर्म ह्या सर्वाचा पलिकडे असा पुरुष गेलेला असतो. फार काय त्याच्यासाठी जनामधे म्हणजे समाजामधे राहणे किंवा वनामधे राहण्यात पण कांही फरक उरत नाही . तो नेहमीच एकांतातच असतो ( येथे एकांत म्हणजे ब्रह्मभाव अशा अर्थाने हे म्हटले आहे. ) ब्रह्मभावात असल्यामुळे हा देह म्हणजे मी नाही ही वृत्तीच उरलेली नसते.

आपण सर्व देहभावामधे असल्याने आपल्यामधे जन्म मृत्यू ची भीती असते. पण देहबुद्धीच नसल्यामुळे असा संत जन्ममृत्यातीत अर्थात अमरत्व पावलेला असतो. ह्यालाच महाराजांनी जिवंत असूनही मेल्याप्रमाणे असणे म्हटले आहे.

वै. जोगमहाराजांनी अशा जीवनाला कुंभाराच्या चाकाची उपमा दिलेली आहे. मातीचे भांडे करण्यासाठी कुंभार चाकाला गती देतो व भांडे तयार केले की चाकापासून वेगळे ठेवतो. पण चाक फिरतच असते. ते हळूहळू थांबते. तद्वतच ब्र **ब्रह्मज्ञानी** पुरुषाचा देह शरीर सोडून जाईपर्यंत प्रारब्धानुसार जी विहित कर्मे कामे येतात ती करतच राहतो. पण त्या कर्मफळांची त्याला बाधा होत नाही.

हे कसे घडले ते वर्णन करतांना तुकाराम महाराज म्हणतात की मी माझा देहभाव विठ्ठलाच्या चरणी अर्पण केला , त्यावेळी मी त्याची पूजा केली. नंतर द्वैतच संपले.शरीर म्हणजे चल पदार्थ व बाकीचे अचल पदार्थ सर्व कांही मीच आहे हे अनुभवले. ह्यालाच सायोज्यमुक्ती म्हणतात. ईतर मुक्ती ह्या तात्पुरत्या पण सायोज्यामुक्ती ही अविनाशी असते. मोक्ष म्हणतात तो हाच.

**अभंग ३ च्या अर्थाचे विवरण:-**

**संत हे ब्रह्मज्ञानी असल्याने आपल्याला त्यांचे वर्णन शब्दांद्वारे करणे अशक्याच असते. साधी साखरेची गोडी तरी कोठे सांगता येते? शेवटी कांही गोष्टी अनुभवानेच कळतात. असो. म्हणुनच** तुकाराम महाराज संतामहिम्याचे वर्णन कसे करावे ह्याबद्दल बोलताना म्हणतात की खरेतर संतमहिम्याचे शब्दांद्वारे वर्णन करताच येत नाही.

हे कार्य अत्यंत दुर्गम आहे असे समजावे म्हणून एक दृष्टांत येथे महाराजांच्या अभंगात येतो. महाराज म्हणतात की कितीही दूध दिले तरी एखाद्या गाय वा म्हशीला कामधेनू म्हणता येत नाही. कामधेनू सर्व ईच्छा पूर्ण करते. भरपूर दुध देणारी गाय सर्व ईच्छा पूर्ण करू शकत नाही.

अर्थात ही शेवटी एक उपमाच / हा एक दृष्टांतच आहे व म्हणुनच अपूराच आहे. पण समजावे म्हणून संत असे व्यवहारातील दृष्टांत देतात. असो. म्हणूनच अभंगाच्या शेवटी महाराज स्पष्टच सांगताहेत की जर तुम्हाला संतमहिमा काय आहे हे समजून घ्यायचे असेल तर तुम्हालाही संत म्हणजे ब्रह्मज्ञानी व्हावे लागेल.

ॐ

***********************

**अभंग :- भगवंत म्हणजेच अव्यक्त परब्रह्म होय हा संतांचा भाव असतो**

अवघे ब्रह्मरूप रिता नाही ठाव । प्रतिमा तो देव कैसा आहे ॥ १॥

नाही भाव तया सांगावे तें किती । आपुल्याला मती पाषांडिया ॥ २॥

जया भावे संत बोलिले वचन । नाही अनुभव शाब्दिकांसी ॥ ३॥
तुका म्हणें संती भाव केला बळी । नकळता खळी दूषिला देव ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ**

सर्वकांही ब्रह्मच आहे व ब्रह्म नाही अशी कोणतीच जागा नाही.प्रतिमेचा देव कसा आहे॥ १।\

जर भाव नसेल तर अशा पाखंडी मतीच्या माणसाला काय सांगायचे॥२॥
संतांनी ज्या भावाने सर्व उपदेश केला आहे तो शब्दछल करणार्यांना अनुभव नसल्याने कळत नाही॥३॥
तुका म्हणतो की संतांनी भाव दृढ केला व ज्यांना कळत नाही त्यांनी देवाला दूषणे दिली॥४॥

**अभंगामागची भूमिका :-**

ह्या अभंगामधे तुकाराम महाराजांनी अद्वैत वेदांताचे मुख्य सांगणे जे आहे तेच खरे आहे हेच ठासून स्वानुभवाने सांगितले आहे. हाच अभंगाचा मुख्य विषय आहे.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

महाराज प्रथम हे स्पष्ट करताहेत की ब्रह्म सर्वव्यापी आहे. शास्त्रांमधे हया विचारावर बराच उहापोह केलेला आहे. जसे भागवतामधे भक्त प्रह्लादाला हिरण्यकश्यपू विचारतो की तुझा देव कोठे आहे?. प्रह्लाद काय उतार देतो ह्याचीच भगवंत वाट पहात होते. पण प्रहलादाने उत्तर दिले की तो सर्वव्यापी आहे. त्यामुळे कोठे प्रगट व्हायचे हा प्रश्न भगवंतापुढे उभा राहिला. शेवटी हिरण्यकश्यपूलाच प्रेरणा दिली व मग त्याने विचारले की तुझा देव ह्या खांबांत आहे कां? प्रहलादाने होय असे उत्तर दिले. ह्यानंतर भगवंताने नृसिंहरूपाने खांबातून प्रगट होऊन हिरण्यकश्यपूचा वध केला.

सृष्टीची उत्पत्ती ज्या एकमेवाद्वितीय देवापासून झाली तोच खरा देव म्हणजे परब्रह्म अथवा ब्रह्म म्हणजे भगवंत हा होय. तोच सर्वव्यापी आहे हे तर्काने सहजपणे समजू शकते.
उदाहरणार्थ आपल्या प्रत्येकाच्या स्वप्नामधील सर्व सृष्टीचे निर्माते आपण स्वत:च असतो. त्यातली माणसे, प्राणी , रस्ते, इमारती गाड्या घोडे सर्व कांही आपणच स्वत:मधून निर्माण करतो. स्वप्नामधली प्रत्येक अणुरेणू आपल्यामधूनच तयार होते. म्हणजेच सर्व कांही आपणच तेथे असतो.

भगवंताचे स्वप्न म्हणजेच ही सर्व सृष्टी आहे. म्हणून सर्वकांही तोच म्हणजे ब्रह्म आहे; अर्थात सर्व सृष्टी ब्रह्मरूपच आहे हेच ह्या तर्काने सिद्ध होते.
सर जगदीश चंद्र बोस ह्यांनी हेच तत्व एका यंत्राद्वारे दाखवले असे परमहंस योगनंदांच्या " Autobiography of a Yogi" ह्या पुस्तकांत नोंद आहे. असो.

**पण आपल्याला असा अनुभव नाही व संतांचा असा प्रत्यक्ष अनुभव असतो. ते ब्रह्मरूपच असतात.**

आपल्याला तो अनुभव नाही म्हणून संतांचे बोलणे ," ब्रह्म सर्वव्यापी आहे" हे म्हणणे खोटे आहे असे नव्हे. आपण ह्याच निर्गूण निराकाराची उपासना प्रतिमा करुन करत असतो. ब्रह्म हेच आपल्या पूज्य प्रतिमेमागचे अधिष्ठान आहे. तुकाराम महाराज व ईतर सर्व संतांचा हाच अनुभव आहे.

संस्कृत श्लोक :-

**आकाशात् पतितं तोयं यथा गच्छति सागरम् । सर्व देव नमस्कारान केशवं प्रति गच्छति ।"**

वरचा संस्कृत श्लोक हेच सांगतो की जसे आकाशातून पडलेले सर्व पाणी जसे शेवटी सागरालाच जाऊन मिळते तसेच कोणत्याही देवतेला केलेली पूजा शेवटी भगवंतालाच पोहोचते.

ह्या भगवंताचा प्रत्यक्ष अनुभव जेंव्हा एखाद्याला होतो तेंव्हा तो ब्रह्मरूपच होतो. पण संतांनी बल:पूर्वक म्हणजेच प्रयत्नपूर्वक द्वैतामधे येऊन आपल्यावर उपकारच केले आहेत. अनुभवाचा भाग हा द्वैतातला आहे. आपल्याला जर असा अनुभव आला की " मी तोच आहे " “अहं ब्रह्मास्मि " तर त्याक्षणी आपण नेहमीकरता जन्म-मृत्यु चक्रामधून मुक्त होऊ. ह्या सायुज्यमुक्तीसाठीच परमार्थसाधना ,भक्ती प्रत्येकाने करावी
असे अनुभव शब्दबद्ध करण्यामागे संतांची हीच कळकळ आहे. हा अभंग बहुतेक ह्याच करणामुळे तुकाराम महाराजांनी सांगितला आहे.

बरेच जणांना भगवंताने अत्यंत तलख बुद्धी दिलेली असते. पण अनंत जन्मांची पुण्याई नसल्याने अशी मंडळी देवच नाही हे सिद्ध करण्यातच धन्यता मानणारी असतात. देव आहे तर मग त्याने

एवढी दु:खे कां निर्माण केली ? तो निरनिरालळ्या आपत्ती जसे त्सुनामी, अतीवृष्टी, अशी संकटे कां आणतॊ? वाईट वर्तन करणारी माणसे संपत्तीवान दिसतात तर सात्वीक बुद्धीच्या माणसांना मत्र जगण्यासाथी खूप मेहनत करावी लागते म्हणजे भगवंत अन्यायच करीत नाही कां? ईत्यादी प्रश्न उपस्थित करून देव नाहीच असे ही मंडळी म्हणतात व सामन्यांचा बुद्धीभेद करतात. तुकाराम महाराज अशा लोकांना पाषांडी म्हणजेच पाखंडी असे अभंगाच्या दुसर्या चरणांत म्हणताहेत.

आपण अगदी थोडासा विचार केला तरी भगवंताचे कर्तृत्व ध्यानात येते. पण जर एखाद्याने झोपेचे सोंग घेतले असेल त्रर त्याला जागे कसे करायचे? अशा भावहीन लोकांना कांहीही उपदेश करणे व्यर्थच असते. हेच अभंगाच्या दुसर्या चरणात सांगितले आहे. तिसर्या चरणामधे लगेच **तुकाराम महाराज म्हणतात की संतांचा उपदेश अशा पाखंडी लोकांसाठी नाही . हा उपदेश ज्यांची देवाबद्दल "तो आहेच" अशी भावना आहे त्यांच्यासाठीच आहे.**

ह्या पद्धतीने आपल्याला हेच स्पष्ट होते की जर भगवंताबद्दल **" तो आहेच , तोच योग्य अयोग्य वगैरे सगळे कांही जाणणारा आहे, तो सर्वत्र सर्वव्यापी आहे व माझी आई, वडील सखा आहे"** ***अशी भावना असेल तर भगवंताची व आपली नक्कीच भेट होईल.***

असा भाव कांही एकदम मनामधे प्रगट होत नाही. त्यासाठी कायिक, वाचिक व मानसिक तप करून मनाला शुद्ध करावे लागते.सतत सारासार विचार करून असाराची ( नाशवंताची ) आसक्ती नष्ट व्हावी लागते. शुद्ध मनाच्या आरशामधेच प्रेमामुळे भगवंत प्रगट होतो. मग अशा भक्ताला तत्क्षणीच ब्रह्मरूपता येते.
सर्व संतांनी असेच वर्तन ठेवले . तुम्हीही करा व उगाच भगवंताला जगामधल्या व तुमच्या आयुष्यातल्या दु:खासाठी दोष देऊ नका ; असेच अभंगाचा शेवटचा चरण आपल्याला सांगतो.
**अभंगाची शिकवण** :-

तुकाराम महाराज सांगतात त्याप्रमाणे आपण आपला स्वत:चाच भगवंताबद्दल तो आहेच हा भाव आहे कां ? हे पाहावे व असा भाव नसला तरीही संतांच्या सांगण्याप्रमाने वागून मग काय ते ठरवावे.

जर आपला भाव भगवंताबद्दल " तो आहेच " असा असेल तर उत्तमच. दोन्ही ठिकाणी भगवंताची उपासना करून मुक्ति साधण्याचे प्रयत्नांना लागावे हीच शिकवण हा अभंग देतो आहे.

ॐ

**********

**अभंग :- सर्वांभूती भगवंत ह्या संतांचा अनुभवावरचा**

**वृक्षवल्ली आम्हां सोयरे वनचरें। पक्षीही सुस्वरें आळविती ॥ १ ॥**
**येणें सुखें रुचे एकांताचा वास । नाहीं गुण दोष अंगा येत ॥ २॥**
**आकाश मंडप पृथिवी आसन । रमे तेथें मन क्रीडा करू ॥ ३ ॥**
**कंथाकमंडलॊ देहौउपचारा । जाणवितो वारा अवसरू ॥ ४॥**
**हरिकथा भोजन परवडी विस्तार । करोनि प्रकार सेवूं रुची ॥ ५ ॥**
**तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणांसी ॥ ६॥**

**अभंगाचा शब्दार्थ :-**

ह्या वनामधले वृक्षवेली वनचर व सुस्वरामधे गाणारे (भगवंताची स्तुतीच जणू करणारे ) पक्षीच आमचे सोयरे संबंधी आहेत. त्यासुखामुळे आम्हाला हा एकांताचा वास आवडता झाला आहे ; येथे कोणताच गुणदोष आंगी लागत नाही॥ १+२॥

येथे आकाश हाच मंडप आहे व पृथ्वी हेच बसण्याचे साधन पण आहे. शिवाय येथे देहरक्षणासाठी गोधडी, कमंडलू आमच्याजवळ आहे. तसेच वेळ किती झाला हे समजावणारा वारा सुद्धा आहे.म्हणून आमचे मन रमेल तेथे आम्ही क्रीडा करू .॥ ३+४ ॥

तुका म्हणतो की येथे आम्ही हरिकथेच्या जेवणाची रुची निरनिराळया प्रकारांनी घेऊ. एकांतात स्वत:च्या मनाशीच संवाद (मनन करून) साधू ॥ ५+ ६ ॥

**अभंगाची पार्श्वभूमीका :-**

संत तुकाराम महाराज हे एक जीवन्मुक्त पुरुष होते. असा पुरुष दृश्य जगतामधे जरी वावरत असला तरी त्याची ब्रह्मावस्था ढळलेली नसते. पण असे पुरुष प्रयत्नपूर्वक स्वत:ला थोडे खालच्या पातळीवर आणत असतात. हीच तुर्यावस्था होय (शरीराच्या ह्या अवस्थेत दृश्याचे भान जागृत असते तसेच आपणच सर्वत्र आहोत ही ब्रह्मावस्थेची स्थिती पण असते) . उंबरठ्यावर ठेवलेल्या दिव्याचा दृष्टांत ह्या स्थितीचे वर्णन करताना देतात. उंबरठ्यावरच्या दिव्याचा प्रकाश घराच्या आत तसाच बाहेर पण पडलेला असतो. व त्यामुळे घरातील तसेच बाहेरील दृश्य आपण पाहू शकतो.

**अशा जीवन्मुक्ताचे बोल म्हणजे परमेश्वरी वाणीच होय. म्हणूनच ह्या अभंगाचे महत्व अनन्यसाधारण आहे. कारण ह्या अभंगामधे आपण जगाकडे कशा दृष्टीने पहावे हे आपल्याला समजते.**

श्रीमद् भगवद गीते मधील विश्वरूप दर्शनाचा प्रसंग हेच सांगतो की भगवंत सर्वकांही झालेला आहे.तोच सर्वव्यापी आहे व हाच मुद्दा ह्या अभंगात आलेला आहे.

आधी पाहिलेल्या तुकाराम महाराजांच्या " जे कां रंजले गांजले " ह्या चरणाने सुरू होणार्या अभंगामधे आपल्या आजूबाजूच्या सर्व जनताजनार्द्रामधील माणसांसाठी ; विशेषत: जे परिस्थितीने गांजले आहेत ( दारिद्र्यामुळे हतबल झाले आहेत ) त्यांचे भले करण्यासाठी झटावे हा उपदेश आहे.

प्रस्तूत अभंग आपल्याला फक्त माणसांचाच नव्हे तर संपूर्ण सृष्टीचा पण विचार करावा हे तर सांगतोच पण त्याबरोबरच एकांतात कां जावे हे पण सांगतो. एकांताचे महत्व जाणणे हे प्रत्येक

साधकालाच नव्हे तर ज्याला ज्याला प्रपंचात यश हवे आहे त्या त्या प्रत्येकासाठी आवश्यकच आहे.ह्या पार्श्वभूमिकेवरून ह्या अभंगाचा अर्थ पाहणे योग्य ठरते.

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

सुरवातीस म्हटल्याप्रमाणे स्वत:च ब्रह्मज्ञानी असल्यामुळे तुकाराम महाराजांना सर्व विश्वाला पांडुरंग व्यापून आहे हा स्वानुभव होता व म्हणुनच सर्व प्राणीमात्रच नव्हे तर ज्यांना त्यांच्याकाली सजीव समजत नसत असे वृक्षवेली ही सुद्धा आपलेच आहेत ही जाणीव होती.

सर जगदीशचंद्र बोस ह्यांनी आता १९ व्या शतकाच्या सुरवातीला विविध उपकरणे वापरून वृक्ष वेली यांना सुद्धा जीव आहे , भावना आहेत हे सिद्ध केले आहे. असो.

म्हणुनच अभंगाच्या पहिल्याच चरणामधे महाराज म्हणताहेत की आजूबाजूचे सर्व वृक्षवेली, पशू पक्षी ही आमचेच सगे सोयरे आहेत. पक्षांची किलबील सुद्धा आम्हाला संगीताप्रमाणेच आनंद देते आहे. **आपल्या भोवतीच्या पर्यावरणाकडे पाहण्याची आपली दृष्टी कशी असावी हेच येथे स्पष्ट केले आहे. असे पर्यावरण नसेल तर काय होते ह्याचा अनुभव पण आता आपल्या जगामधे येतोच आहे.**

*अभंगाचे पुढचा भाग ह्या पार्श्वभूमिकेवर सहज समजण्यासारखा आहे.*

सर्वत्र माझेच सहचर आहेत असे एकदा का समजले की मग माणसाला कोठेही आपण एकटे आहोत असे वाटत नाही. मग अर्थातच अशा सहचरांबरोबर राहणे आनंदाचेच होते.पण जर आजूबाजूची माणसे भिन्न विचारांची असली तर मात्र अशा लोकांचा सहवास नकोसा होतो हा पण आपल्या प्रत्येकाचाच अनुभव आहे. म्हणुनच " समानशीले व्यसनेशु सख्यम् " हि म्हण प्रसिद्ध आहे. तसेच आता हे पण सिद्ध झाले आहे की आपली मन:स्थिती हि आपल्या जवळपास वावरत असणार्या माणसांच्या मनस्थितीमुळे बदलू शकते. जर कोणी उद्विग्न दु:खी उदास असेल तर आपण पण त्याच भावनाच्या आहारी ागदी न कळत जातो. सात्विक मनोवृत्तीच्या

माणसांच्या बाबतीत हे जास्त प्रकर्षाने होते. वनामधे एकांतात आनंदी वातावरणामधे म्हणूनच मन आनंदी होते.असो.

सांगायचा मुद्दा हाच आहे की ज्याला भगवंताचे स्मरण असते व त्याच्याच भेटिची आस लागली असेल ; त्याला निसर्गाच्या सहवासात असणेच आवडते. कोणतेही निसर्गरम्यस्थान हे नेहमीच ध्यान, तप करण्यास चांगले असते. आपल्याकडे ह्यासाठीच लोक हिमालयात जातात. असा एकांत वास तुकाराम महाराजांना पण आवडतो. तुकाराम महाराज भंडारा डोंगरावर तपसाधनेसाठी जात असत . त्यासंदर्भातच अभंगाच्या ३ व ४ चरणात उल्लेख येतो की येथे आकाश हाच मंडप आहे व पृथ्वी हेच बसण्याचे साधन पण आहे. शिवाय येथे देहरक्षणासाठी गोधडी, कमंडलू आमच्याजवळ आहे .तसेच वेळ किती झाला हे समजावणारा वारा सुद्धा आहे.म्हणून आमचे मन रमेल तेथे आम्ही क्रीडा करू . येथे क्रीडा मह्णजे भगवंताच्या भजनाचा आनंद लुटणे असा घेता येईल.

**ह्यापुढचे चरण एकांताचे महत्व सांगणारे आहेत.**

एकांतात प्रत्येकाने जावे असे श्री.रामकृष्ण परमहंस पण सांगत . समर्थांचे पण हेच म्हणणे आहे. सर्वसाधारणत: साधू पुरुषाकडे लोक आपल्या भौतिक अडचणी , समस्याच घेऊन जातात. साधू त्यांचे निरसन पण करतात , पण भगवंताच्या भेटिसाठी येणारे लोक फारच थोडे असतात. जगावर प्रेम करणारा पुरुष म्हणुनच एकांतात जाण्यास उत्सुक असतो. तुकाराम महाराजांना असे एकांतात जाणे आवडले आहे व हाच विचार अभंगात आलेला आहे.

एकांतात जाण्याचे व्यावहारिक तसेच पारमार्थिक दोन्हीकडे फायदेच होतात.

**एकांताचे प्रापंचिक महत्व व फायदे:-**

ज्याला आपले कार्य यशस्वी व्हावे असे वाटत असते त्याला अशा एकांतात नीट पणे योजना आखता येते. योजनेप्रमाणे सर्व कार्य होते आहे की नाही हे पण पाहता येते. कांही गुप्त योजना एकांतातच आखता येतात.

१) शिवाजी महाराजांना अफजलखानाच्या भेटीच्या वेळी काय करावे हे त्यांनी एकांतातच ठरविले हे प्रसिद्धच आहे.
२) वैदिक गणितातातली सूत्रे पण शंकराचार्यांना अशा एकांतातल्या मननामुळेच लक्षांत आली

समर्थांच्या खालील ओवव्यांचे चरण ह्यादृष्टीने येथे पाहता येतात. ओव्यांचा अर्थ सोपा आहे म्हणून लिहिलेला नाही. फक्त ओव्यांचे चरणच लिहिले आहेत.

अखंड एकांत सेवावा। ग्रंथमात्र धांडोळावा।प्रचीत येईल तो घ्यावा। अर्थ मनी ॥
विवेक एकांती करावा। जगदीश धारणेने धरावा।
येकांती विवेक ठांई पडे । येकांती येत्न सापडे। येकांती तर्क वावडे।
येकांती स्मरण करावें।चुकले निधान पडे ठावें।
जयास येकांत साधला । अवघ्या आधी कळे त्याला । त्यावेगळे वडिलपणाला । ठावची नाही ॥ .

**एकांताचे पारमार्थिक महत्व व फायदे :-**

ध्यानाची प्रक्रिया ही नीट व्हावी ह्यासाठी एकांतच लागतो. ह्यावर बरेच लिखाण आपल्याला वाचायला मिळते.तसेच एकांतात भगवंताची उपासना जप ईत्यादी करणे सोपे होते. एकांतातच कोहं हाविचार आपण करू शकतो. ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांनी एकांतात जाणे म्हणजे भगवंताचे स्मरणात राहणे असाच अर्थ सांगितलेला आहे . निरनिराळ्या आध्यात्मिक ग्रंथातील सखोल अर्थ एकांतामधे मनन केल्यानंतरच अंत:करणामधे प्रगट होतो व हाच अर्थ तुकाराम महाराजांना अभंगाच्या शेवटचा चरणांमधे अभिप्रेत आहे

**अभंगाची शिकवण :-**

अभंगाची हीच शिकवण आहे की ज्याला आपली प्रगती करून घ्यायची आहे मग ती प्रपंचातली असो किंवा परमार्थातली असो, त्याने जरूर एकांतासेवन करावे व स्वत:चे ध्येय साध्य करून घ्यावे.

ॐ

***************

**अभंग :- ब्रह्मस्थिती झाल्यावर आलेल्या अनुभवाचे वर्णन-१.**

१) अणुरेणुया थोकडा । तुका आकाशाएवढा ॥१॥
गिळूनी सांडिलें कळिवर । भवभयाचा आहार ॥२॥
सांडिली त्रिपुटी । दीप उजळला घटी ॥३॥
तुका म्हणें आता । उरलो उपकारा पुरता ॥४॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

तुकाराम आता अणू रेणूंपेक्षाही सूक्ष्म व आकाशापेक्षाही विशाल झाला आहे ॥ १॥

आता तुकारामाने भवभयाचाच आहार केला आहे व सर्वकांही गिळून स्थूल शरीर टाकले आहे॥२॥

तसेच त्रिपुटीपण ( तुकारामाने) टाकली आहे व ज्ञानदीप ह्या शरीरामधे प्रकाशित झाला आहे.॥३॥

आता हा तुकाराम फक्त उपकारांपुरताच शिल्लक आहे ॥४॥

**अभंगाच्या मागची भूमिका :-**

(स्व. भीमसेन जोशी यांनी हा अभंग गायलेला आहे.)

**ह्या अभंगात तुकाराम महाराजांनी स्वत:च्याच ब्रह्मज्ञानावस्थेचे वर्णन केलेले आहे.** ब्रह्मज्ञान होणे हेच माणसाच्या मानव जन्म मिळाल्याचे सार्थक होय असे आपली शास्त्रे (धर्म ,अर्थ, काम व शेवटी मोक्ष हे चार पुरुषार्थ शास्त्रांनी सांगितले आहेत.) तसेच सर्व संत पण हेच सांगतात. ***ब्रह्मज्ञान,आत्मज्ञान , मी खरा कोण आहे व माझे खरे स्वरूप काय आहे हे ज्ञान , जन्ममृत्यूचक्रामधून सुटका, ,मोक्ष ही सर्व एकच स्थितीची निरनिराळी नांवे आहेत.***ही स्थिती खरेतर शब्दातीत , वर्णनातीत असते ही अनुभवायची असते.. (जशी साखरेची गोडी शब्दांत सांगता येत नाही तसेच कांहिसे म्हणता येईल )

**पण तरीही संत सोप्या शब्दांत ह्या स्थितीचे वर्णन आपल्या सारख्या बद्धांकरिता ह्यासाठी करतात** की आपणपण नरजन्माचे असे सार्थक करून घ्यावे अशी उर्मी यावी व आपण प्रयत्नांना लागावे हीच संतांची अपेक्षा असते.

**ह्या दृष्टीनेच ह्या अभंगाचा अर्थ लावणे योग्य ठरते. व तसा प्रयत्न मी येथे केलेला आहे.**

**अभंगाच्या भावार्थाचे स्पष्टीकरण :-**

भगवंत अर्थात परब्रह्म कसा आहे तर तो सुक्ष्माहून सूक्ष्म आहे.तो सर्वव्यापी आहे. त्याची ओळख होणे भेट होणे म्हणजेच ब्रह्मज्ञान होणे; त्याच्याशी एकरूपत्व येणे.
भगवंताचे वर्णन तीन शब्दांत करायचे झाले तर भगवंत सर्वज्ञ , सर्वशक्तीमान व सर्वव्यापी असा आहे असे ते वर्णन होते. हे वर्णन " कारें नाठविसि कृपाळू देवासी " ह्या अभंगाचा अर्थ पाहताना ) लिहिलेले आहे.
***जर आपण आपल्या भोवतीचे विश्व रात्री पाहीले तर आकाशामधे*** **अनंत** ***ग्रहतारे दिसतात.*** सध्या उपलब्ध असलेल्या खगोल शास्त्राची कांस आपण घेतली तर समजते की आपण पाहातो ते ब्रह्मांड अत्यंत विराट आहे. असे म्हणतात की प्रकाशाला ब्रह्मांडाच्या एका टोकापासून दुस़îrÉÉ टोकापर्यंत जायला कोट्यावधी प्रकाश वर्षे ( प्रकाशाची गती १ सेकंदामधे ३३००००Km / १८००००मैल आहे. म्हणजे एका वर्षामधे प्रकाश ३३३०००*६०*६०*२४*३६० खkm जातो) आहे. खरेतर अजूनही हा खगोलतज्ञांचा एक अंदाजच आहे!) पण ह्या साध्यागणिताने ब्रह्मांडाच्या विराटत्वाची कल्पना येऊ शकते. ईश्वराने हे सर्व ब्रह्मांड व्यापले आहे म्हणजे तो त्याहून विराट आहे. **हे ब्रह्मांड अवकाशामधे (Space) आहे. अवकाशालाच "तुकाराममहाराजांनी "आकाश " संबोधले आहे.**तसेच जर आपण पदार्थांची मूळ रचना पाहिली तरे असे दिसते की प्रत्येक पदार्थ अणू व रेणूंचा बनला आहे. अणूच्या आंत गेले तर असे आढळते की एका proton भोवती electron फिरत असतात. ब्रह्म हे त्यापेक्षापण सूक्ष्म आहे.
***ब्रह्म म्हणजेच भगवंत हे आपण जाणतोच . ब्रह्मज्ञान म्हणजे त्याच्याशी एकरूपता. ही एकरूपता तुकाराम महाराजांनी साधल्यामुळे अभंगाच्या पहिल्याच चरणामधे ते म्हणताहेत की " मी असा आकाशापेक्षाही विराट आहे व अणुरेणूंपेक्षाही सुक्ष्म आहे.***

***अभंगाच्या दुसऱ्या चरणामधे महाराज म्हणाताहेत की " मी हा भवभ्रमाचा पसारा गिळून टाकला आहे व ह्याचा अर्थ वरच्या संदर्भात स्पष्टचा आहे. " तुकाराम महाराज विदेही अवस्थेमधे आहेत. आत त्यांना ह्या मर्त्य शरीराची बंधने उरलेली नाहित. .***
आपल्या शात्रांप्रमाणे आपण हे जे दृश्य अनुभवत आहोत ते एक प्रकारचा भ्रम आहे. तुकाराम महाराजांचा व ईतर संतांचापण हाच अनुभव आहे. " यतो दृष्टं ततो नष्टम् "

अर्थात जे जे दिसते ते सर्व नाशवंतच असते " हा निसर्गनियम पण आहे. जसा शिंपल्यामधे रुप्याचा भास होतो तसेच आपल्याला हे जग भासते पण अज्ञानामुळे तच खरे वाटते. पण ब्रह्मज्ञानी पुरुषासाठी हे सर्व भ्रमच असते. मला हे कळले आहे हाच " मी भवभ्रम गिळून टाकला आहे "ह्या चरणाचा अर्थ येथे स्पष्ट होतो.

**अभंगाच्या तिसऱ्या चरणामधे** ही ब्रह्मरूपता कशी घडते ते वर्णन आहे. महाराज म्हणतात की "मी त्रिपुटी सांडली कारण माझा मनामधे ज्ञानदीप ( ब्रह्मज्ञान) उजळला आहे. त्रिपुटी म्हणजे परस्पर संबधित अश्या तीनांचा समुदाय. अध्यात्मामधे ज्ञाता-ज्ञान-ज्ञेय (ब्रम्हज्ञान अनुभवणारा- ब्रह्मज्ञान- ब्रह्म) ही त्रिपुटी प्रसिद्ध आहे. ही त्रिपुटी आपले द्वैतामधले कोणतेही ज्ञान होण्याची प्रक्रिया स्पष्ट करण्यासाठीच वापरतात. येथे ज्ञाता व ज्ञेय वेगळे असतात. पण ब्रह्मज्ञानाच्या बाबतीत हे वेगळेपण संपते. ह्यावेळी ज्ञाता-ज्ञेय-ज्ञान सर्व एकच होतात. तुकाराम महाराजांना ब्रह्मज्ञान झाल्यामुळे त्यांच्यापुरती तरी त्रिपुटी संपली आहे व महाराज हेच आपल्याला ह्या अभंगाच्या तिसर्या चरणामधे सांगताहेत.

पण महाराजांचे शरीर हे (अनुभवाचे बोल लिहिणारे) अजून पंचभूतांमधे विलिन झालेले नाही. ज्ञानानंतर ज्ञानी पुरुषाचे असेच होते. ज्यांना ज्ञान झालेले नाही अशा बाकिच्यां लोकांना पण असे ज्ञान होऊन त्यांची पण सर्वदु:खांतून सुटका व्हावी ह्याच एकमेव कारणाकरिता ज्ञानी जगामधे रहातो. हे ज्ञान कसे मिळेल हेच सांगण्याकरता ज्ञानी पुरुष उरलेले आयुष्य व्यतीत करतो. ह्यालाच उपकार करणे म्हणतात. ह्या उपकारामधे परतफेडिची अपेक्षा नाही. **तुकाराम महाराज अभंगाच्या शेवटच्या ४थ्या चरणामधे हेच स्पष्ट करत आहेत.**

**अभंगाची शिकवण :- ह्या अभंगावरून आपल्याला हीच शिकवण मिळते की संतांच्या वचनांवर श्रद्धा व विश्वास ठेवून त्यांनी सांगितलेला मर्ग चोखाळावा व जीवनाचे सार्थक करून घ्यावे.**

ॐ

**************

अभंग **:- ब्रह्मस्थिती झाल्यावर आलेल्या अनुभवाचे वर्णन -२**

आनंदाचे डोहीं आनंद तरंग । आनंदचि अंग आनंदाचे ॥१॥
काय सांगो झालें कांहिचिया बाही। पुढे चाली नाही आवर्जून ॥२॥
गर्भाचे आवडी मातेचा डोहाळा । तेथिचां जिव्हाळा तेथे बिंबे ॥३॥
तुका म्हणे तैसा ओतलासे ठसा । अनुभव सरिसा मुखा जाला ॥४॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

मी पूर्णपणे आनंदाने भर्लो आहे. जणू आनंदाच डोहच झालो आहे. ह्या माझ्रा आनंदाने भरलेल्या अंत:करणामधे उठ्णारे तरंग आनंदाचेच आहेत.. माझी स्थिती काय आहे हे सांगणे अशक्य आहे. आता कोणतीच ईच्छा अंत:करणांत उरलेली नाही. गर्भीणी मातेला तेच खावेसे वाटते जे पोटातल्य़ा गर्भाला हवे असते. कारण आई आणी मूल दोन्ही एकरूप झालेली असतात. तुका म्हणतो की मी माझ्या आनंदाचे वर्णन करतो आहे. शब्द पुरेसे नाहीत म्हणून दृष्टांत देतो आहे ..

**अभंगाचा अर्थ लागण्यासाठी आवश्यक कांही माहीती:**

**तुकाराम महाराजांनी जीवन्मुक्ति मिळाल्यावर त्या स्थितीत हा अभंग बहुतेक लिहीला असावा. जीवन्मुक्त साधू हे तुर्यावस्थेमधे नेहमी असतात. तुर्येमधे परब्रह्माची जाणीव असतेच व शिवाय दृश्याचीही जाणीव जागी असते असे तुर्यावस्थेचे वर्णन आहे. ह्या अवस्थेतले साधू जे कांही बोलतांत ती साक्षांत परमेश्वरी वाणी असते. ही वाणी आपल्यासारख्या बद्ध जीवांचा उद्धार व्हावा जन्ममृत्यूचक्रामधून बद्धांची सुटका व्हावी म्हणूनच प्रकट झालेली असते.**

तुकाराम माहाराजांनी ह्या शुद्ध आनंदमयी अनुभवाचे वर्णन ह्यासाठी केले आहे की आपल्यासारख्यांना योग्य प्रयत्न करून असा अनुभव घ्यायची ईच्छा व्हावी व मोक्ष मिळावा.

ह्या आनंदाचे स्वरूप काय व कसे आहे ? ह्या प्रश्नाचे उत्तर शोधायला लागल्यावर जे थोडेसे समजले तेच मी येथे पुढे लिहित आहे

आपण दृश्यामधे वावरतो आहोत. येथे आपल्याला ह्या दृश्याचे आपल्या पांच इंद्रियांद्वारे ज्ञान होते .ह्या अवस्थेला जागृतावस्था म्हणतात.

ह्या अवस्थेत पंचेंद्रियांमुळे आपल्याला पांच वेगवेगळे आनंद मिळतात. खरतर बाह्या सृष्टितली माहीती पंचेंद्रियांद्वारे आंत जाते . मन , अंत:करणाच्या कार्यामुळे आपल्याला विषयांचा आनंद अनुभवायला मिळतो.

डोळयांमुळे सौंदर्याचे ज्ञान व त्यामुळे आनंद मिळतो. नाकाद्वारे सुगंधाचे ज्ञान व आनंद मिळतो. त्वचेद्वारे स्पर्शाचा आनंद मिळतो. जीभेद्वारे ( रसना ) निरनिराळया रसांचा आनंद मिळतो. कानांद्वारे श्रवणीय संगीत भाषणे इत्यादीचा आनंद मिळतो.

कांही वस्तु अशा असतात की ज्या आपल्या एकापेक्षा जास्त इंद्रियांना आनंद देतात.उदाहरणार्थ : उत्तम पिवळे धमक सुगंधी श्रीखंड डोळे, नाक व रसनेला आनंद देते.अशा अनेक स्थूल वस्तुंपासून आपणाला आनंद मिळतो.

कांही वस्तु ह्या दृश्य म्हणजे स्थूल नसतात. त्या पण इंद्रियांना आनंद देतात. उदा:श्रवणीय गाणे, किंवा भजन सुद्धा कानांना आनंदच देते.

**पण एकच वस्तू सर्व पाचही इंद्रियांना आनंद देते ती म्हणजे ब्रह्मानंद**. बाकी कोणत्याही कडुन पाचही इंद्रियांना आनंद मिळू शकत नाही. हे ब्रह्मानंदाचे वैशिष्ठ्य आहे. असो.

हा आनंद कोणाला मिळतो **?** कोण भोगतो**?**

ह्या प्रश्नाचे उत्तर म्हणजे आपल्या अंतर्गत असलेला अंतरात्माच हा आनंद भोगणारा आहे**. तो** सत् चित् व आनंद स्वरूप आहे**.**

आपला नेहमीचा अनुभव आहे की एखाद्या वस्तुपासून एकाला आनंदाच लाभ होतो तर त्याच वस्तुपासून दुसरा आनंद घेऊ शकत नाही .कारण आनंद हा खरेतर आंतच असतो व वस्तुच्या निमित्ताने तो बाहेर प्रगट होतो एवढेच

म्हणूनच आलापकारी हिंदुस्थानी संगीत एखाद्याला खूप आनंद देते पण ज्याला संगीतात रस नाही त्याला तेच संगीत आवडत नाही. **आनंद प्रगटला तर आवडते अन्यथा नाही.** असेच इतर भावनांबद्दल म्हणता येते. प्रेम, आनंद, वात्सल्याची भावना ईत्यादी सर्व आत्म्याच्या आनंदाचीच अनेक रूपे आहेत.

**अभंगाची शिकवण :**

तुकाराम महाराज हे ब्रह्मज्ञानी होते व अभंगात वर्णन केलेला आनंद हा ब्रह्मानंदच आहे यात काहीच संशय नाही. ब्रह्मज्ञानी हा जीवन-मुक्त असतो. मृत्युभय त्याला ठावूक नसते. तो जन्ममृत्यूच्या चक्रातून सुटलेला असतो. त्याला सर्वत्र भगवंतच आहे हा अनुभव सातत्याने येत असतो. ह्यामुळे तो सर्व विश्वावर प्रेमच करतो. हे प्रेम निष्काम असते.

**ह्या प्रेमापोटीच तुकाराम महाराजांनी ह्या निखळ आनंदाचे वर्णन करुन तुम्ही पण प्रयत्न करा , ब्रह्मज्ञानी व्हा व असा आनंद अनुभवा हे सुचविण्यासाठी हा अभंग केला आहे**

ॐ

*******************

**अभंग : ब्रह्मस्थिती प्राप्त झाल्यावर आलेल्या अनुभवाचे वर्णन-३**

आतां कोठे धावे मन । तुझे चरण देखेलिया ॥ १॥
भाग गेला शीण गेला । अवघा झाला आनंद ।। २॥
प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाठी मुखासी ॥ ३॥
तुका म्हणे आम्हां जोगे घोगें खरें माप ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

हे भगवंता, मी तुझ्या चरणाचे दर्शन घेतले आहेत; तर मग आतां माझे मने कोठल्याठिकाणी धांव घेईल? अर्थात माझ्या मनास आत ईतर कांहीच सुचत नाही आहे. ॥ १॥

ह्यामुळे माझा सर्व शीण नष्ट झाला आहे व मी आनंदाचाच अनुभव घेतो आहे. ॥ २॥

तुझ्याविषयी प्रेमातच मनाने बुडी मारली आहे, व नाम घेण्याची माझ्या जिभेला गोडी लागली आहे ॥३॥

तुका म्हणतो की सर्व सुखाची मोजणि करायची तर विठ्ठल हेच सर्वांत मोठे माप आहे व तेच आमच्यासाठी योग्य, खरे आहे ॥ ४॥

**अभंगा मागची भूमिका:-**

मागच्या अभंगात जसा तुकाराम महाराजांच्या ब्रह्मरुपतेच्या नंतरचा अनुभव शब्दांकित होता तसाच ह्या अभंगात महाराजांचा स्वानुभव वेगळया शब्दांमधे महाराजांच्या प्रासादिक वाणीतून पुन: प्रगट झालेला आहे.

महाराज जरी ब्रह्मरूप झाले आहेत तरी ते आपल्यासारख्यांसाठी पुन: द्वैतामधे आलेले आहेत. ( ह्या अवस्थेलाच तुर्यावस्था असे नांव आहे. ह्या अवस्थेमधे बाह्य सृष्टीचे ज्ञान असते तसेच परब्रह्माशी एकरूपत्व पण असते. आपण जेंव्हा ॐ चा उच्चार करतो तेंव्हा अत्यंत थोडाकाळ ह्या अवस्थे मधे जातो. ध्यान करण्यच्या क्रियेमधे हा काळ अभ्यासाने लांबत जातो. मांडुक्य उपनिषदामधे ह्यावर सविस्तर चर्चा आहे.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

तुकाराम महाराज जरी द्वैताकडे आलेले आहेत तरी त्यांचे मन मात्र त्या आनंदातच रंगलेले व म्हणून महाराज **पहिल्या चरणामधे** म्हणतात की हे देवा पांडुरंगा तुच्या चरणांचे दर्शन झाल्यावर आता माझे मन सतत त्याठिकाणीच रमलेले आहे. माझ्या मनाची इकडे तिकडे फिरण्याची सवय पूर्णपणे सुटली आहे. आता मला फक्त तुमचेच चरण दिसत आहेत.

ह्या आनंदाची कल्पना करायची, आनंदाचे स्वरूप कसे असते ते समजायचे तर आपला गाढ झोपेचा अनुभव आहे त्याचा उपयोग दृष्टांत ( **हा दृष्टांतपण खरेतर अपूराच आहे** ) म्हणून करता येतो. आपण गाढ झोपेतून जागे झालो की थोडावेळ आपली अशीच स्थिती असते. कारण झोपेमधे आपण सुषुप्ति अवस्थेत जातो व त्यावेळी आपण आनंदाचाच अनुभव घेतो. त्याची आठवण जागे झालो तेंव्हा येते.पण जागे झाल्यावर मन परत व्यवहार करू लागते व विचलित होते. असो. संतांचे तसे नसते. ते ब्रह्मानंदातच असतात. तुकाराम महाराजांचे मन फक्त एका विठ्ठलाच्या चरणाचेच स्मरण करते आहे.

**अभंगाच्या दुसर्या चरणामधे अशा स्थितिच्यामुळे काय घडले/घडते त्याचे वर्णन आहे.**

पूर्वी जेंव्हा मन ़विचलित असते. टोकाचे विचार काळजी केली की मनाला थकवा येत असे ज्याला शीण येणे असे म्हणतात. मनाच्या ह्या शीण आलेल्या स्थितिमुळे अनेक आजार होतात हे आता सिद्ध झालेले आहे. माणसाच्या मनाला शीणभाग म्हणजे थकावा असा येतो. कांही झोप येणारी औषधे देऊन मानसोपचार तज्ञ ह्या विचलित स्थितीवर उपचार करतात.

पण **भगवंताच्या चरणाठायी मन एकदा गुंतले की मग असा किंचितही थकवा येत नाही उलट असला तर तो दूर होतो. तुकाराम महाराजांनी हेच अभंगाच्या २ र्या चरणामधे म्हटले आहे.**

**अभंगाचा तिसरा चरण आपल्या रसनेची स्थिती वर्णन करणारा आहे.**
भगवंताचे निस्सिम प्रेम मनामधे उत्पन्न झाले आहे. त्यामुळे जिभेला त्याचेच नाम घेण्याचा चाळा लागला आहे. दुसरे कांहीच तिला गॉड लागत नाहीये.

**येथे पण एक व्यवहारातला म्हणुनच अपूरा दॄष्टांत घेता येतो.** जर आपण फार गॉड वस्तू खाल्ली तर त्या गोडीचा अनुभव मना मधे अत्यंत घट्ट जागा धरून बसतो. ह्या संस्कारामुळे मनास तीच वस्तू सतत खावी असेच वाटत राहते.

(पण एक वेळ अशी येते की त्या वस्तूची आंस संपते. मग तीच वस्तु निदान तात्पुरती नकोशी वाटते.

ह्यालाच Law of Diminishging return असे नांव आहे.)

तुकाराम महाराज म्हणतात की माझा जिभेला विठ्ठलनामच्या गोडीचा अनुभव आला आहे. आता माझ्या रसनेला नामाशिवाय दुसरे कांही नको आहे. ( ***येथे पारमार्थिक अनुभव नेहमीपेक्षा वेगळा कसा हे पण स्पष्ट झाले! विठ्ठलनामस्मरणाला किंवा कोणत्याही नामास्मरणाला Law of diminishing Return लागू होत नाही*** )

**अभंगाच्या शेवटच्या चरणामधे हा मुद्दाच स्पष्ट होतो.** महाराज म्हणताहेत की विठ्ठल नामाचे स्मरण केल्याने जे सुख मोजायचे तर त्यासाठी दुसरे कोणतेही माप उपयोगी नाही. स्वस्वरूपाचे ज्ञान झाले व ब्रह्मानंदाचा अनुभव आला. परब्रह्माशी एकरूपता आली. हा आनंद अखिल ब्रह्मांडाला व्यापणारा आहे. त्यासाठी विठ्ठल म्हणजे परब्रह्माएवढेच मोठे माप आहे. थोडक्यांत म्हणायचे तर हा आनंद अवर्णनीय आहे. त्याची मोजणि करणे अशक्यातली गोष्ट आहे. ही मोजणि करायची तर अशा भक्तालापण ब्रह्मरूपच व्हावे लागेल.

**अभंगाची शिकवण:-** शिकवण हीच की नामस्मरण करून आपणही अशा आनंदाचा अनुभव घेण्यास प्रयत्नशील व्हावे.

ॐ

**अभंग : ब्रह्मस्थिती प्राप्त झाल्यावर आलेला अनुभव -४**

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव। आपणचि देव होय गुरू ॥ १॥
पडिये देहभाव पुरवी वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावें ॥ २॥
मागे पुढें उभा राहे सांभाळित । आलिया आघात निवरावे ॥ ३॥
योगक्षेम त्याचें जाणे जडभारी । वाट दावी करी धरूनियां ॥ ४॥
तुका म्हणे नाही विश्वास ज्या मनीं । पाहावें पुराणी विचारूनी ॥ ५॥

**अभंगाचा शब्दार्थ:-**

माझ्या विठ्ठ्लाचे माझ्यावर एवढे प्रेम आहे की तो स्वत:च माझे सद्गुरु झाला. मी शेवटी त्याच्यापाशी यावे म्हणून माझ्या सर्व वासनांची पूर्ती त्याने केली. तो सतत माझ्या मगेपुढे उभा असतो व माझ्यावर आलेल्या संकटांचे निवारण करतो,मला सांभाळतो.माझा योगक्षेम चालवतो.माझे बोट धरून मला योग्य मार्गावर चालवतो.

तुका म्हणतो की ज्यांचा ह्यावर विश्वास नाही त्यांनी पुराणांत काय सांगितले ते पहावे व स्वत:ची खात्री करून घ्यावी.

**अभंगामागची भूमिका :-**

श्रीमद् भगवद्गीतेमधे खालील प्रसिद्ध श्लोक आपल्याला माहीत आहे.

**अनन्याश्चिंतयंतो मां ये जना: पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥**

ह्या श्लोकामधे भगवंतांनी हेच सांगितले आहे की त्यांना शरणागत अनन्य भक्तांचा योगक्षेम तेच पाहातात कारण अशा भक्ताला फक्त भगवंताशिवाय दिसरे कांही दिसत नाही, दुसरे कांहीच सुचत नाही. म्हणून अशा भक्ताच योगक्षेम भगवंत स्वत:च भक्तावरच्या अतीव प्रेमामुळे चालवतो.

तुकाराम महाराज असेच पांडुरंगाचे अनन्य भक्त आहेत. ह्या अभंगामधे त्यांनी स्वत:चाच अनुभव वर्णन केलेला आहे.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

तुकाराम महाराज पहिल्याच चरणामधे म्हणतात की माझा विठोबा माझ्यावर किती प्रेम करतो हे सांगताच येणार नाही. मी सदगुरू शोधीत होतो तर स्वत:च माझा सदगुरू झाला.

अध्यात्मामधे सदगुरुंचे महत्व अनन्यसाधारण आहे. समर्थ रामदास स्वामी पण म्हणतात

**न जाणतां कोटीवरी । साधने केली परोपरीं । तरी मोक्षासी अधिकारी । होणार नाही ॥**

**असो जयासि मोक्ष व्हावा । तेणें सदगुरू करावा । सदगुरुविण मोक्ष पावावा। हे कल्पांती न घडें ॥**

म्हणजेच कितीही प्रयत्न केले, कितीही साधना जसे उपासतापास, व्रते, तीर्थयात्रा, पूजा इत्यादी केली तरी ब्रह्मज्ञान होत नाही. खरे ज्ञान व्हावे ह्यासाठी सदगुरू भेटणे अत्यंत आवश्यकच असते.

संत नामदेव महाराजांचे चरीत्र पाहिले की हा भाग कळतो. नामदेव विठोबाशी बोलायचे. देव त्यांच्या हातचे जेवण जेवायचा पण शेवटी नामदेवांनासुद्धा विसोबाखेचरांकडे ब्रह्मज्ञानासाठी जावे लागले.

सदगुरु शक्तिपात करून आपल्या शिष्याला ब्रह्मज्ञान करून देतात. असे ज्ञान झाले की भक्त व भगवंताचचे ऐक्य होते. जन्ममृत्यूचक्र संपते. शाश्वत आनंद व समाधान मिळते. ह्यालाच सायोज्यमुक्ति म्हणतात. तुकाराम महाराजांच्यासाठी " त्यांच्यावरील प्रेमामुळे स्वत: भगवंतच त्यांचे सदगुरू झाले थेत व म्हणून ते जीवन्मुक्त झाले" हे येथे महाराज सांगताहेत.
पुढच्या सर्व चरणामधे महाराज भगवंत त्याचा योगक्षेम कसा चालवतो आहे ते वर्णन करताहेत. महाराज म्हणतात की माझ्या सर्व ईच्छा भगवंत ह्यासाठी पुरवतो. की माझी कोणतीही वासना मृत्यूसमयी शिल्लक राहू नये. **(वासनाक्षय झाल्याने परत जन्म नाही हा पण अध्यात्मातला एक मुख्य सिद्धांत आहे.)** महाराज पुढे हे पण म्हणतात की भगवंत त्यांना सांभाळतो, त्यांच्यावर येणारी संकटे दूर करतो व एवढेच नाही तर योग्य मार्ग दर्शन पण करतो आहे.

प्रभूशरणागत प्रत्येकालाच असा अनुभव येत असतो. हा भाग विश्वासाचा आहे. महाराज म्हणतात की लोकहो तुमचा विश्वास बसत नसेल तर पुराणांतली उदाहरणे पाहा. म्हणजे मी सांगतो त्यावर तुमचा विश्वास बसेल.

**अभंगाची शिकवण :-**
ह्या अभंगातून हेच स्पष्ट होते की खरे ज्ञान होण्यासाठी ( मी कोण आहे ? ) आपण आपले सर्व प्रयत्न निष्ठापूर्वक केले पाहिजेत. योग्य वेळी सदगुरुंची भेट होईलच. तो पर्यंत साईबाबा सांगतात त्याप्रमाणे श्रद्धा व सबूरीने प्रयत्न करत रहायचे.

ॐ

**********

**अभंग : ब्रह्मस्थिती प्राप्त झाल्यावर आलेल्या अनुभवाचे वर्णन-५ ( दोन अभंग)**

**अभंग १ ला:**

कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ १॥
कृष्ण माझा गुरू कृष्ण माझा तारूं । उतरी पैल पारू भवनदीचा ॥ २॥
कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सोईरा सज्जन कृष्ण माझा ॥ ३॥
तुका म्हणें माझा श्रीकृष्ण विसांवा । वाटे न करावा परता जीवा ॥ ४॥

**अभंग २ रा:-**

आम्हांसाठी अवतार । मत्स्य कुर्मादी सूकर ।\ !॥
मोहें धांव घाली पान्हा । नांव घेता पंढरीराणा ॥ २२॥
कोठे न दिसे पांहतां । उदी घाली अवचिता ॥ २॥
सुख ठेवी आम्हासाठी । दु:ख आपणची घोटी ॥ ४॥
आम्हां घाली पाठीकडे । आपण कळिकाळाशी भिडे ॥ ५॥
तुका म्हणे कृपानिधी । आम्हा उतरी नावेंमधी ॥ ६॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

**अभंग १ ला:-**

श्रीकृष्णच माझी आई, बाप, बहीणी, भाऊ, चुलता ,गुरू, सर्वकांही आहे. तोच मला भवसागरामधून पार नेणारे जहाज आहे.तोच माझे मन,तोच सर्व लोक, सोयरे. सज्जन, मित्र आहे.मला त्याच्याच चरणी खरी विश्रांती मिळतेआहे.त्यामुळे आता मला जीवपण पुन: मिळणार नाही..

**अभंग २ रा:-**

भगवंताने आमच्या सारख्या बद्धजनांसाठी मत्स्य ,कूर्मासारखे नीच योनीतले अवतार घेतले.त्याचे प्रेमाने नांव घेतल्याबरोबर तो आमच्या मोहामुळे गाय जशी वासरासाठी पान्हासोडण्यास धावत येते तसा येतो.तो आमच्या दु:खांचा नाश करतो व आमच्यासाठी सुख ठेवतो.आम्हाला मृत्युपासून वाचविण्यासाठी यमराजाबरोबर युद्ध करतो.तुका म्हणतो की असा हा कृपानिधी बगवंत आम्हाला नावेमधून भवसागराच्य पलिकडे नेतो.

**अभंगामागची भूमिका :-**

**ह्यातल्या पहिल्या अभंगांमध्ये** आपल्याला तुकाराम महाराजांनी स्वत:चे अर्थात अनन्य भक्ताचे अंतरंग कसे असते हे स्वानुभवावरून सांगितले आहे. महाराजांचे दैवत पांडुरंग म्हणजेच भगवान श्रीकृष्ण हेच आहे.  जन्माष्टमीच्या निमिताने ही अभंगांची जोडी घेतली आहे.

अशा **अनन्यशरण भक्तासाठी भगवंत कायकाय करत्तात ह्याचे वर्णन दुसर्या अभंगात** आहे, महाराजांचे हे स्वानुभवाचे बोल आहेत. म्हणून त्याचे महत्व अनन्यसाधारण तसेच मुमुक्षु भक्तांसाठी मार्गदर्शकच आहे.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

अभंग ४६ वा **:-**

ह्या पहिल्या अभंगामधे माणसाचे जे आत्मीय असे नातेवाईक असतात त्यांची नावे घेऊन ( जसे आई, वडील , भाऊ , बहीण इत्यादी ) तुकाराम महाराज म्हणताहेत की माझ्यासाठी श्रीकृष्ण हाच माझा खरा नातेवाईक आहे.

आपले अनेक जन्म पूर्वी होऊन गेले आहेत व प्रत्येक जन्मात वेगवेगळे सगे-संबम्धी होते.नदीमधे जशी लाकडे वहात असतात तसे सर्वांचेच जीवन आहे. कांही लाकडे थोडावेळ एकत्र येतात. मग पुन: वेगवेगळी होतात व वाहून जातात. ऋणानुबंधाप्रमाणे प्रत्येक जन्मात आपल्याला वेगवेगळे आई, वडील व ईतर नातेवाईक व मित्र यांचा सहवास लाभत असतो.

**पण प्रत्यक्षांत फक्त भगवंतच हाच आपला जन्मोजन्मीचा खरा नातेवाईक आहे.** तो आपल्या बाहेरच्या सर्व विश्वास व्यापून आहेच व तोच आपल्या अंतर्यामी आत्मा म्हणुन पण उपस्थित आहे . त्यानेच निरनिराळ्या जन्मांमधे वेगवेगली शरीरे धारण केली. तुकाराम महाराज त्याला ह्या अभंगात श्रीकृष्ण ह्या नावाने संबोधत आहेत. महाराजांच्या दृष्टीने श्रीकृष्णच त्यांचे सर्वस्व आहे.

भगवंतच सृष्टीचे पालन पोषण आई वडिलांप्रमाणे करत आहे. फार काय तो आपली सर्व कांही काळजी घेतच असतो हे तर स्पष्टच आहे. मागे एका अभंगात हा भाग येऊन गेला आहे

असा आपल्यातील अंतरात्मा म्हणजेच तोच आहे व आपल्याला नेहमीच तो योग्य तो सल्ला मार्गदर्शन खरेतर देत असतो. आजकाल त्यालाच "आंतील आवाज Inner Voice " म्हणतात. अभंगाच्या दुसर्या
चरणांत तुकाराम महाराजांनी त्याला "गुरु "म्हणजे सद्गुरू म्हटले आहे. सद्गुरूच त्यांच्यापाशी अनन्यभावे शरण आलेल्या शिष्याला योग्य मार्गदर्शन करून स्वस्वरूपाचे ज्ञान करून देतात. मोक्षप्राप्तीसाठी सदगुरुकृपेचे अनन्य महत्व आहे.

पण बरेच वेळा आपण आपल्या अहंकाराच्या प्रभावाखाली येऊन त्याचे सांगणे ऐकत नाही. मग करवे तसे भरावे , म्हणजेच कर्म तसे फळ ह्या त्याच्या ह्या सृष्टीतल्या न्यायाप्रमाणे आपल्याला केलेल्या कर्मांची बरी वाईट फळे भोगावी लागतात. मनुष्यजन्मातच आपण भगवंताची भेट घेऊ शकतो. ह्यालाच साक्षात्कार होणे म्हणतात. असा आत्मसाक्षात्कार झाला की जीवाची जन्म-मृत्यू चक्रामधून कायमची सुटका होते.

ह्याप्रमाणे सदगुरुकृपेमुळे महाराजांना आत्मसाक्षात्कार झाला व कृतज्ञतेपोटी तुकाराम महाराज अभंगाच्या शेवटी म्हणतात की असे **सद्गुरु भगवान श्रीकृष्ण हेच माझे विश्रांतीचे स्थान आहे.येथे विश्रांती म्हणजे मोक्ष अर्थात भगवंताशी ऐक्य हाच अर्थ आहे कारण ह्यानंतर परत जन्म नाही व त्यामुळे सुखदु:खेही नाहीत**.
अभंगाच्या सुरवातीच्या चरणांमधे अनन्य शरण भक्ताचा हाच भाव भगवंताविषयी असतो हे दिसून येते. त्यामुळे भगवंताचे पण अशा भक्तावर अपार प्रेम असते. मग अशा भक्तांचा योगक्षेम भगवंत कसा वाहातो ते वर्णन पुढच्या अभंगात येते.

अभंग २ रा :-

भागवत पुराणामधे वर्णन आहे त्याप्रमाणे भगवंताने मत्स्य, कूर्म, वराह ईत्यादि अवतार घेऊन अनेकवेळा भक्तांचे संरक्षण केले आहे . हे सर्व त्याने भक्तांच्या प्रेमा पोटी केले आहे.
असा हा भगवंत जडदृष्टीने दिसत नाही; पण त्याला शरणगेलेल्या भक्ताचे साठी तो अगदी अचानक पणे धाव घेतो व भक्ताला संकटांतुन सोडवतो . श्री रामकृष्ण परमहंस म्हणतात की

मांजरीच्या नवजात पिल्लाला आईशिवाय दुसरे कांही माहित नसते. ते फक्त तिचा धावा म्यांवम्यांव करून करते. मग त्याची आई मांजरी त्याच्या साठी सर्व कांही करते. वेळ पडल्यास ईतर भक्षक प्राण्यांबरोबर लढाई करते . सर्व अर्थाने आई ह्या पिल्लांची पाठराखण करत असते . अशाच रितीने भगवंत आपल्या अनन्यशरण भक्तांची पाठराखण करत असतात. ही अनन्यताच शेवटि महत्वाची असते.
तुकाराम महाराज शेवटी म्हणतात की माझ्या कृपाळू भगवंताने तर प्रत्यक्ष मूत्यूवर मला विजय मिळवून दिला आहे. ह्या भवसागरातून त्यानेच मला पलिकडच्या मोक्षाच्या किनार्यावर मला आणले आहे.

**अभंगाची शिकवण :-**
शिकवण हीच आहे की आपल्याला जन्मोजन्मी संभाळणारा खरा नातेवाईक फक्त भगवंतच आहे हे समजून त्याला अनन्यभावे शरण जावे. त्याची भक्ती साधून नरजन्माचे सार्थ करून घ्यावे.

ॐ

***********

# भाग ४ था



ह्या भागामधे खरा देव कोण? , तो सगूण आहे व निर्गूण पण आहे हे स्पष्ट करणारे अभंग घेतले आहेत.

तसेच भगवंताचे कांही मुख्य गुण कोणते ( जसे तो सर्वांची माऊली आहे इत्यादि) हे वर्णन करणारे अभंग पण आहेत.

भगवंताचे वर्णन करता येत नाही कारण तो सगूण आहे तसाच निर्गूण पण आहे

**अभंग १ला:-**

तुज वर्णी ऐसा तुजविण नाही। दुजा कोणी तीही त्रिभुवनिं॥ १॥
सहस्रमुखे शेष सिणला बापुडा । चिरलिया धडा जिव्हा त्याच्या॥ २॥
अव्यक्ता अल्क्षा अपारा आनंदा । निर्गुणा सच्चिदानंदा नारायणा ॥ ३॥
रूप नाम घेसी आपुल्या स्वईच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें॥४॥
तुका म्हणें जरी दाविसी आपणा। तरीच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

**अभंगाचा शब्दार्थ:-**

हे अव्यक्त, अलक्ष अपार आनंदमय निर्गुण सच्चिदानंदस्वरूप नारायणा, तुझे अचूक वर्णन करणे तुझ्याशिवाय दुसर्या कोणालाही शक्य नाही .एवढा हजार मुखे असलेला शेषनाग , तोही तुझे वर्णन करू शकत नाही. त्याने प्रयत्न केला तेव्हा त्याच्या सर्व जिव्हा दुभंगल्या. तूच तुझ्या ईच्छेनुसार नामरूपे धारण करतोस व त्या प्रमाणे स्वभाव दाखवतोस. तुका म्हणतो की हे नारायण तुझा मनांत असले तरच तू कसा आहेस ते तुझ्या भक्ताला कळते .

**अभंगा मागची भूमिका :-**

भगवंताचे दर्शन झाले तर तो कसा दिसेल असा जो प्रश्न मनांत येतो त्या प्रश्नाचे उत्तर ह्या अभंगात येते व भगवंताचे कांही विषेश गुण आपल्याला त्यासाठि येथील भगवंताच्या वर्णनात तुकाराम महाराजांनी लिहिले आहेत. तसेच भगवंत केंव्हा व कोणाला दर्शन देतो त्यावर पण येथे प्रकाश टाकलेला आहे.

**हेच ह्या अभंगाचे वैशिष्ठ्य आहे.**

**अभंगाचे अर्थ स्पष्टीकरण:-**

“कांरे नाठविसी कृपाळू देवासी...” ह्या अभंगात भगवंताचे वर्णन सर्वव्यापी, सर्वशक्तीमान, सर्वज्ञ ह्या शब्दांद्वारे करता येते हे वाचलेच आहे. सृष्टीचे विराट स्वरूप कसे ते पण आपण पाहिले आहे. असा हा भगवंत आपल्याला आहे

हे कळते पण तो दिसत नाही . त्याला पहायला ज्ञान चक्षुच हवेत. तरचे त्याचे दर्शन होते. ( जसे अर्जुनाला झाले तसे). म्हणुन भगवंत हा अव्यक्त म्हटले आहे. ध्यानाने त्याचे दर्शन होत नाही म्हणुन अलक्ष्य म्हटले आहे. त्याने सर्व सृष्टी व्यापली आहे. सृष्टीचाच थांग लागत नाही तर त्याचा कसा लागणार, म्हणून त्याला अपार हे विशेषण दिले आहे.
अश्या भगवंताचे गुणवर्णन त्याच्या अनंत नामरूपांप्रमाणे आहे म्हणून तो निर्गूण आहे.किंवा तो त्रिगुणांचा निर्माता म्हणून गूणातीत अर्थात निर्गूण आहे असे म्हणतात.आपली शास्त्रे भगवंताचे वर्णन करायचे झाल्यास तो सच्चिदानंदस्वरूप आहे असेच सांगतात.तोच फक्त खरा शाश्वत आहे म्हणून सतम्हणजे आहेच ह्या अर्थाने, चित म्हणजे शाश्वत खरे व आनंद हि अवस्था असणारा असा सच्चिदानंद भगवंत आहे. अर्थात वर जे जे कांही लिहिले ते म्हणजे शब्दच होत. वेद सुद्धा शब्दमयच आहेत. अनेक शास्त्रे, भजने, स्तोत्रे पण भगवंताचे वर्णन करतात. पण कितीही शब्द योजून लिहिलेले आपण वाचले तरी त्याचे खरे स्वरूप कळत नाही. तुकाराम महाराजांनी ह्या भगवंतालाच नारायण म्हणून अभंगात संबोधिले आहे.
आपल्या शास्त्रांमधे भगवंताची म्हणजेच परब्रह्माची १४ नांवे दिलेली आहेत. श्रीमद्‌दासबोधामधे ह्याबद्दल एक समासच समर्थांनी लिहून हेच सांगितले आहे की ब्रह्माचे वर्णन करण्यास शब्द अपुरेच असतात. तुकाराम महाराजांनी १०० फण्यांच्या शेषनागाचे उदाहरण दिले आहे. ते म्हणतात की १०० फण्या असलेला शेषनाग जो सतत भगवंताच्या सहवासांत असतो , तो सुद्धा भगवंताचे वर्णन करू शकत नाही.
आणखी एक उदाहरण द्यायचे झाले तर साखरेची गोडी कशी हे आपल्याला सांगता येत नाही असे देता येते. साखरेची गोडी अनुभवानेच कळते. वर्णनास शब्द येथेही अपुरेच पडतात. असो.

पण हाच नारायण जेंव्हा योग्य वेळ येते तेंव्हा स्वत:हून भक्ताला दर्शन देतो. अर्जूनास त्याने कुरुक्षेत्रावर स्वता:चे दर्शन अर्जुनावरच्या प्रेमामुळे दिले. म्हणुन महाराज अभंगाच्या शेवटच्या चरणांत म्हणतात की हे नारायणा तुझ्या मनांत असेल तेंव्हाच तू तुझ्या भक्ताला दर्शन देतोस.

**अभंगाची शिकवण:-**

तुकाराम महाराज हेच येथे सांगत आहेत की सबूरी बाळगा व भगवंताची अनन्यभावे भक्ती करा. योग्य वेळी तो तुम्हाला दर्शन देईल अशी खात्री बाळगा

ॐ

************

**अभंग २ रा:- देव सगूण कसा झाला.**

विश्वाचा जनिता । म्हणे यशोदेसी माता ॥ १ ॥
ऐसा भक्ताचा अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥ २॥
निष्काम निराळा । गोपी लावियेल्या चाळा ॥ ३॥
तुका म्हणे आलें । रूप अव्यक्त चांगलें ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

भगवंत हा ह्या विश्वाचा निर्माता आहे, पण तो यशोदेला आई म्हणतो ॥ १ ॥
भक्ताने लावलेल्या प्रेमामुळे तो भक्ताचा अंकित होतो ॥ २॥
गोपींना त्याच्या प्रेमामुळे वेड लागले. पण तो स्वत: निष्काम व अलिप्तच आहे.॥ ३॥
तुका म्हणतो की त्या अव्यक्त भगवंतानेच सर्वांना आवडणारे रूप धारण केले आहे ॥ ४॥

**अभंगाच्या मागची भूमिका** :-

तुकारामांचे दैवत म्हणजे पांडुरंग हे आहे. पांडुरंग व श्रीकृष्ण हे वेगळे नाहीत. कृष्ण हा एक असा अवतार आहे ज्याला तो स्वत: कोण आहे हे जन्मापासूनच माहीत आहे. सर्व सृष्टीचा निर्माता म्हणजे भगवंत हा खरेतर अव्यक्तच आहे हे आपण पाहिलेच आहे.

गीता ध्यानस्तोत्रामधला एक श्लोक कृष्णाचे समर्पक वर्णन करतो. तो खालील प्रमाणे आहे.
**वसुदेवसुतं देवं कंस चाणूर मर्दनम् । देवकी परमानंदम् कृष्णं वंदे जगद्गुरुम् ॥**

अर्थ:- वसुदेवांचा पुत्र, ज्याने कंस , चाणूराचा वध केला, ज्याच्या मुळे देवकीला परमानंदाची प्राप्ती झाली ; अशा जगद्गुरु श्रीकृष्णांना मी वंदन करतो,.

वेद हे आपले सर्वात पुरातन धर्मग्रंथ आहेत. त्यांचे सार वेदांतात येते. श्रीभगवद्गीतेमधे सर्व उपनिषदांचे सार येते. अर्थात मानवी जन्माचे सार्थक कसे करून घ्यावे हे गीता आपल्याला शिकवते. म्हणुन म्हणूनच श्रीकृष्णांना जगद्गुरू म्हणतात. अर्जुनाद्वारे आपल्याला गीता सांगणारे भगवंत हे स्व ईच्छेने मानवी रूपामधे आले आहेत .त्यांचे चरीत्र अद्भूत आहे. भगवान श्रीकृष्ण हे पूर्णावतार आहेत.

***अशा भगवंताची स्तुती करणारा हा अभंग आहे.***

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण** :-

तुकाराम महाराज हे ज्ञानी भक्त होते. आपण ह्या जगामधे कां आलो आहोत ते सांगणारा त्यांचा एक अभंग मागे येऊन गेला. **ज्ञानी भक्ताला हे माहीत असते की अव्यक्त परब्रह्मच खरा देव आहे**. तो कसा आहे हे मोठ्मोठ्यांनाही कळत नाही. वेदांनीही " नेति नेति म्हणजे असा नाही असा नाही " असे म्हणुनच भगवंताचे वर्णन केले आहे.

ह्या अशा भगवंताचे एक वैशिष्ठ्य म्हणजे तो भक्तांच्या प्रेमाचा भुकेला असतो. भगवतानी यशोदेला आई म्हटले आहे. ह्याचे कारण म्हणजे तिची तशीच भक्ती होतो. यशोदा भगवंताला आपले मूल म्हणूनच पहात होती. आईची थोरवी आपण सर्व जाणतोच. खरेतर भगवंताच्या सर्व निर्मितीत यशोदेचे मानवी शरीर पण येते. ते त्याला ठाऊक पण आहे. तरीही भगवंत यशोदेला आई म्हणतो ह्यातच त्याचे भगवंतपण दिसून येते.

गोपींना हाच भगवंत सखा वाटत होता. त्याच्या रुपाचे दर्शन व्हावे म्हणून त्या तळमळत होत्या. उद्धवाला भगवंतावर प्रेम कसे करावे ते गोपीकडून शिकावे लागले. उद्धव हे ज्ञानी होते. पण त्यांना ही प्रेमभक्तीचे स्वरूप गोपींच्या भक्तीमुळे कळले. भगवंत निष्काम व अलिप्त

असल्याने गोकुळ सोडल्यानंतर तेथे परत गेले नाहीत. परीक्षिताला जीवन देताना भगवंताने जी प्रतिज्ञा केली आहे त्यावरूनच त्याचे अद्वितियत्व सहज कळते. असो. भगवद्‌गीते मधे १२वा अध्याय भक्तीचे महत्व सांगतो.

भक्तीचे महत्व हेच आहे की असा हा निष्काम, अलिप्त देव ; त्याच्या अनन्य भक्तासाठी कांहीही करायला नेहमी आतुरलेला असतो.

**तुकाराम महाराज म्हणतात की त्याने हे कृष्णाचे रूप भक्तांच्या प्रेमापोटीच धारण केले आहे.**

**अभंगाची शिकवण** :-

भक्तीचे महत्व असाधारण आहे माणसाने त्यासाठी भगवंताचे चरीत्र प्रथम, समजून घ्यावे. चरीत्र समजले की भक्ती आपोआपच निर्माण होते. सगुण भगवंताची भक्ती पण शेवटी आपल्याला निर्गूण भगवंताचा साक्षात्कार करून देते.

ॐ

************

अभंग :- भगवंताचे रूप कसे आहे ते सांगणारे तीन अभंग

**अभंग १ ला**

जयापासोन सकळे । महिमंडळ हे जाले ॥१-१ ॥

तो एक पंढरीचा राणा । न ये अनुमाना अंतरी ॥१-२॥

विवादती जयासाठीं । जगजेठी तो विठ्ठल ॥ १-३॥

तुका म्हणें तो आकळ । आहे सकळ व्यापक ॥ १-४॥

**अभंग २ रा**

नाहीं रूप नाहीं नांव। नाहीं ठाव धराया ॥२-१॥

जेथें जावे तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥२-२॥

नाहीं आकार विकार । चराचर भरलेंसे ॥ २-३ ॥

नव्हे निर्गूण सगुण । जाणें कोण तयासी ॥ २-४॥

तुका म्हणें भावाविण । त्याचें मन वोळेना ॥२-५॥

**अभंग ३ रा**

आहें सकळां वेगळा । खेळें कळा चोरोनि ॥ ३-१॥

खांब सूत्राचिये परी । देव दोरी हालवितो ॥ ३-२॥

आपण राहोनी निराळा । कैसी कळा नाचवी ॥३-३॥

जेंव्हा आसुडतो दोरी । भूमिवरी पडे तेंव्हा ॥ ४-४ ॥

तुका म्हणें तो जाणावा । सखा करावा आपुला ॥३-५॥

**तीनही अभंगाच्या अर्थाचे एकत्रित स्पष्टीकरण :-**

ईश्वर म्हणजेच भगवंत कसा आहे? त्याचे कार्य कसे चालते? ह्या सर्व प्रश्नांची उत्तरे असणारे हे तीन अभंग ह्यावेळी एकत्र घेतले आहेत. त्यांचा अर्थच येथे स्पष्ट करण्याचा प्रय्त्न आहे.

**पहिल्या अभंगामधे महाराज म्हणतात की** :-

" ज्याच्यापासून हे सर्व पृथ्वीमडळ म्हणजेच ब्रह्मांड निर्माण झाले आहे तोच पंढरीचा राजा आहे . तो कसा आहे ह्याची कल्पना व अनुमान श्रुतींना वेदांना सुद्धा करतां येत नाही. त्या परमात्म्याला रूपही नाही व नांवही नाही. असा हा विठ्ठल सर्व सृष्टीला व्यापणारा व्यापक आहे".

आपल्याला दिसणारी ही सृष्टी अत्यंत विराट आहे ती म्हणजेच अनेक ग्रह तारे आकाशगंगा असणारे  संपूर्ण ब्रह्मांड आहे दृष्याचे नियम जर आपण पाहिले तर प्रत्येक वस्तूचा कोणितरी निर्माता असतो. जसे मातीचा घडा कुंभार निर्माण करतो. हा घडा आकाराने तसा लहानच म्हणुन ह्या निर्मात्याला आपण डोळयांनी पाहू शकतो. पण सृष्टी अत्यंत विराट आहे. तिचा निर्माता हा अर्थातच तीहून मोठा विराट हे तर्कानेच समजू शकते.
साधे प्रकाशाचे उदाहरण घेतले तर प्रकाश म्हणजे कणांचा बनलेला आहे असे कोणी म्हणतात पण प्रकाश म्हणजे एक शक्ती आहे व ती लाटांच्या प्रमाणे आहे असे पण म्हणतात. सध्याच्या

भौतिक शास्त्रामधे दोन्ही कल्पना बरोबरच आहेत असे धरले जाते. अर्थात प्रकाशाचे खरे स्वरूप कसे आहे ते खात्रीने कोणालाचे सांगता आलेले नाही. असो.
अशा ह्या परमात्म्याबद्दल अनेक मतमतांतरे आहेत. प्रत्येकाला आपलेच मत योग्य वाटल्यामुळे अनेक वादविवादपण चालूच आहेत. एकूणच पहायचे झाले तर भगवंत कसा आहे ह्याबद्दल कल्पनाच करणे शक्य नाही हेच स्पष्ट होते. तसेच भगवंत सर्वव्यापी आहे असे पण पहिल्या अभंगात शेवटी म्हटले आहे.

**दुसऱ्या अभंगामधे त्याच्या रूपाविषयी वर्णन आहे.**

भगवंत हा आहेच पण भगवंतला आकाराही नाही म्हणुन रूप नाही, नांव नाही व विकार पण नाहीत.तो सर्वव्यापी आहे म्हणुनच तो नाही अशी कोठे जागाच नाही कोणतीहि सगूण वस्तू लांबी, रुंदी व खोली ह्या त्रिमितीच्या मध्ये सींमित असते. सगूण कांही काळच टिकते व नंतर नष्ट होते. भगवंत असा त्रिमिती व काळाने मर्यादित नाही म्हणुन भगवंत सगूण नाही असे म्हणता येते.

भगवंत ईंद्रियांना तो गोचर नाही कारण तो अव्यक्त आहे म्हणुनच तो निर्गूण आहे असे म्हटले आहे.

तसेच भगवंतानेच आपल्याला निर्माण केले आहे व आपल्या सर्वांचे लालन पालन त्याच्या सत्तेखाली होतच आहे अर्थात तोच आपली आई आहे. असे पण महाराज म्हणताहेत. .

**पुढच्या ३ऱ्या *अभंगात अशा भगवंताला कसे ओळखायचे ते तुकाराम महाराज सांगताहेत.***

ह्या भगवंताचे स्वरूप कसे आहे हे कोणालाच कळत नाही मग ह्या भगवंताला ओळखायचे कसे? ह्या प्रश्नाचे उत्तर म्हणजे त्याच्या विषयी जर योग्य असा भाव असेल तरच तो ओळखता येईल असे तुकाराम महाराजांनी अभंगाच्या दिले आहे.

अलिकडल्या काळांत झालेले संत तुकडोजी महाराजांचे एक भजन ( मनी नाही भाव , म्हणे देवा मला पाव ; देव अशाने भेटायचा नाहीरे , देव बाजारचा भाजीपाला नाहीरे ) विदर्भांत अत्यंत लोकमान्य व आवडते आहे. ह्या भजनामधे पण हेच मत व्यक्त होते. सर्व संतांचे सांगणे एकच आहे हेच खरे!

असा हा विठ्ठल सगळया विश्वामधे सर्वांत बलाढ्य आहे. तो सर्वांना न कळणारा आहे. सर्व उपाधींपासून तो वेगळा राहतो आहे व कोणलाही कळू न देता सर्व सृष्टीचे कार्य चालवित आहे. सर्व प्राण्यांना कळसूत्री बाहुल्याप्रमाणे हा देव प्रारब्धाची दोरी करून नाचवित असतो व जेंव्हा ही दोरी तो ओढतो त्याक्षणी देहबाहुली गतप्राण होते. हे पण येथे स्पष्ट केले आहे

श्रीमद् भगवद्गीतेमधे भगवान म्हणतात की "
***ईश्वर: सर्व भूतानां हृद्देशे अर्जुन निष्ठति। भ्रामयनसर्वभूतानि यंत्रारूढानि मायया । १८-६१.***
***अर्थ:- हे अर्जुना , ईश्वर सर्व प्राणिमात्रांच्या हृदयांत राहून यंत्रात घातल्याप्रमाणे सर्व प्राण्यांना आपल्या मायेने फिरवित असतो.***

*"तुका म्हणतो की अशा ह्या देवाला त्याचेविषयी मनामधे दृढभाव असल्याखेरीज जाणता येत नाही."* ***ही दुसऱ्या अभंगाची शेवटची ओळ आहे.***

हा दृढभाव म्हणजे त्यालाच सर्वभावे शरण जाणे अर्जुनाप्रमाणे भगवंताशी सख्य जोडणे .
***" तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत " गीत अ १८-श्लोक ६२वा."***
भगवंताचे कर्तृत्व वर आलेल्या अभंगांप्रमाणे जाणावे. त्याच्याशी सख्यत्व करावे म्हणजेच कांहितरी नाते जोडावे व अर्जूनाप्रमाणे त्यालाच शरण जावे.
आपल्यावाट्याला आलेले प्रत्येक कर्म त्याचीच पूजा म्हणुन करावे. तो जे देईल ते फळ आनंदाने स्विकारावे हेच भगवंतास शरण जाणे होय.

**अभंगाची शिकवण :-**

हे तीन अभंग महाराजांनी आपल्यासारख्यांना भगवंताचे स्वरूप समजावे. खरादेव कसा अहे ह्याची समज यावी म्हणून स्वानुभवावरून लिहिले असावेत. तिसर्या अभंगात उपदेशाचा भाग येतो. भगवंतास अनन्य भावे शरण जावे हाच उपदेश तुकाराम महाराजांनी केलेला आहे.

ॐ

**************

**अभंग :- सगूण भगवंताची पूजा पण त्या खऱ्या निर्गूण भगवंतालाच पोहोचते.**

**केला मातीचा पशुपती। परि मातीसी काय महती ।शिवपूजा शिवासी पावे । माती मातीमाजी जाये॥ १॥**
**तैसे पूजिती आम्हां संत। पूजा घेतो भगवंत। आम्ही किंकर संतांचे दास। संत पदवी नको आम्हास ॥२॥**
**केला पाषाणाचा विष्णू। परी पाषाण नव्हे। विष्णू विष्णूपूजा विष्णूसि अर्पे।पाषाण राहे पाषाण रूपे ॥ ३॥**
**केलीं कांशाची जगदंबा । परि कांसे नव्हे अंबा । पूजा अंबेची अंबेला घेणे । कांसें राहे कांसेपणें ॥ ४॥**
**ब्रह्मानंद पूर्णामाजी। तुका म्हणे केली कांजी । ज्याची पूजा तणेंचि घेणें। आम्हा पाषाणरूप राहणें ॥ ५॥**

**अभंगाचा शब्दार्थ :-**

मातीचे शिवलिंगकरून त्याची पूजा जेंव्हा करतात तेंव्हा पुजा शिवाला पावते व माती मातीच रहाते. ॥१ ॥

तसेच आमची पूजा संत करतात ती भगवंतालाच पोचते. आम्ही खरेंतर संतांचे दास आहोत आम्हाला संतपदवी मुळिच नको आहे ॥ २॥

दगडाची विष्णुमुर्ती केली तरी विष्णू म्हणजे दगड नव्हे. दगडाच्या विष्णूमूर्तीचि केलेली पूजा विष्णुलाच पोहोचते. दगड हा दगडच राहतो. ॥ ३॥

कांश्याची जगदंबेची मुर्ती केली व तिची पूज केलि तरि पूजा अंबेलाच पोहोचते. कासे कांसेच रहाते.॥ ४॥

आनंदमय परब्रह्म सर्वत्र पूर्ण भरलेले आहे. तुका म्हणतो की जशी कांजीमधे चव असते तशी. ज्याची पूजा त्यालाच पावते व आम्ही जे पाषाणरूप(जड) आहोत ते आम्ही (जडच) पाषाणच राहतो.॥ ५ ॥

**अभंगाच अर्थ समजण्यासाठी लागणारी माहिती , अभंगामागची भूमिका;-**

आधीच्या अनेक अभंगात आपण पाहिलेच आहे की भगवंतानेच हे संपूर्ण विश्व निर्माण केले आहे.

.

ह्याबद्दल आपल्याकडे एक अत्यंत प्राचीन सूक्त आहे. त्याचे नांव नासदीय सूक्त. त्याच्या कर्त्याने सृष्टी कशी व केंव्हा निर्माण झाली ह्यावर आत्यंत खोलवर विचार केला आहे. सुक्तकार म्हणतो की सृष्टी निर्माण होण्यापूर्वी कांहीच नव्हते. सत् नव्हते व असत् पण नव्हते. होते ते फक्त निर्गूण निर्विकार परब्रह्म.

आपली शास्त्रे पण हाच धागा पुढे नेतात व अद्वैत मताप्रमाणे ह्या अद्वितीय एकट्या परब्रह्मास स्फुरण झाले तोच आदिसंकल्प " एकोहं बहुस्याम". मग ईश्वरच सृष्टीनिर्मिती साठी लागणारी सामग्री झाला व त्याने स्वत:निर्मित पंचभूतांचे सामान घेऊन सृष्टी निर्माण केली . त्यातल्या प्राण्यांच्या शरीरांमधे स्वत:चाच अंश घातला व अशापद्धतीने जड ( अचेतन ) व चल (चेतन) सृष्टी निर्माण केली.

ह्या साठी कोळयाच्या जाळयाचा दृष्टांत देतात. जसा कोळी स्वत:च स्वत:पासून निर्माण केलेल्या तंतूंचे जाळे विणतो तसेच परमेश्वराने आपल्यापासूनच हें विश्व निर्माण केले. तोच या जगाचे मूलद्रव्य व तोच कर्ताही आहे. अर्थात संपूर्णजग परमेश्वरानेच व्यापलेले आहे. तोच सर्व जगाचे अधिष्टान आहे.

**ह्या भूमिकेवर आता आपल्याला अभंगाचा अर्थ पाहता येतो.**

**अभंगाचे अर्थ स्पष्टीकरण :-**

**वर पाहिल्याप्रमाणे भगवंत हेच सर्व जगाचे अधिष्टान आहे हे स्पष्ट झाले की आपल्याला तुकाराम महाराज आपण करतो त्या सगूणपूजे मागचे शास्त्रीय कारण म्हणजेच रहस्यच ह्या अभंगाद्वारे सांगताहेत हे स्पष्ट होते.**

आपल्या जड इंद्रियांना परमेश्वर हा अगोचरच आहे. म्हणून त्याची उपासना करणे सर्वसामन्यांना कठीणच होते. म्हणुन साकार, सगूण परमेश्वराची आराधना करणेच योग्य ठरते. हाच विचार श्री. भगवदगीतेमधे १२व्या अध्यायांत भगवंतांनी सांगितला आहे.

भगवंत म्हणतात की

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम्। अव्यक्ता हि गतिर्दु:खं देहमद्भिरवप्यते॥अ१२-श्लो५वा॥**

भगवंताच्या अनेक वस्तूच्या मूर्ती आपल्याकडे आढळतात. पाषाण, रत्ने, पितळ, कांसे, स्फटिक ह्याच्या मूर्तीआपल्याकडे सर्वसाधारणत: पूजेमधे असतात हे पाहतोच. या शिवाय गणेश पूजा मातीच्या गणेश मूर्तीची पण करतो. कधीकधी मातीचे शिवलिंग पण पूजेस घेतात तुकाराम महाराजांनी अभंगामधे मातीचे शिवलिंग, कांशाची देवीची प्रतिमा, पाषाणाची विष्णूमूर्ती ह्याची उदाहरणे दिली आहेत. ह्याशिवाय त्यांनी कांजीचे पण उदाहरण दिले आहे. कांजी म्हणजे तांदुळांच्या पिठाचे पेय. चवीसाठी त्यांत थोडेसे मीठ घालतात. आपल्याकडे आजारी माणसाला लवकर ताकद यावी म्हणून पण कांजी वापरतात. अर्थात कांजीमधे ताकद वाढवणारे कांहीतरी अव्यक्त तत्व असते. ते कोठे आहे हे पाहता येणार नाही.

तसेच परब्रह्म परमेश्वर हा आहेच. तो सर्वत्र आहेच पण आपल्याला अनुभव आलेला नाही. देवतांमधेही तोच आहे. व म्हणुनच कोणत्याही मूर्तीची पुजा जरी केली तरी शेवटी ती त्यालाच पोहोचते. हे महाराज ह्या अभंगाच्या द्वारे सांगताहेत. अर्थांत जे जे सगूण साकार आहे ते कधीनाकधी नष्टच होते. पण त्यामागचे तत्व म्हणजेच भगवंत हा शाश्वतच आहे हे समजावे म्हणुन महाराज म्हणतात की " माती मातीच राहते, कांसे कासेच राह्ते व पाशाण पाशणच राहतो. “आपण जीवन्मुक्त आहोत हे तुकाराम महाराज स्वत: जाणताहेत व म्हणुनच अभंगाच्या दुसऱ्या चरणांत महाराजांनी भगवंताला भजा आम्हाला नको असे म्हटले आहे. असो.

**अभंगाची शिकवण:-**

सगूण भगवंताच्या मूर्तीची पूजा करणेच आपल्यासारख्या सर्वसाधारण माणसांना योग्य आहे. कारण प्रत्येक मूर्ती मागे भगवंताचेच अधिष्टान आहे. हे लक्षांत घेऊनच प्रेमाने भगवंताची पूजा करावी. जेंव्हा आरसा मलीन असतो तेंव्हा त्यांत प्रतिबिंब स्पष्ट दिसत नाही. पण तोच आरसा स्वच्छ केला की मग प्रतिबिंब स्पष्ट दिसते. तसेच प्रेमभावनेने भगवंताच्या अधिष्ठानाची जाणीव ठेवूनच पूजा चित्त शुद्ध करते. मग तेथे भगवंताचे प्रगट होण्यास वेळ लागत नाही.

ॐ

***********

अभंग :- भगवंताचे कर्तृत्व सांगणारा – १

चाले हे शरीर कोणाचिया सत्ते । कोण बोलविता हरिविण ॥ १॥
देखवी ऐकवी एक नारायण । तयाचे भजन चुको नयें ॥ २॥
माणसाची देव चालवी अहंता । मीचि येक कर्ता म्हणूनिया ॥ ३॥
वृक्षाचेही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठे ॥ ४॥
तुका म्हणे विठो भरला सबाह्य । उणें काय आहे चराचरीं ॥ ५॥

शब्दार्थ ;-

ह्या शरीराचे सर्व व्यवहार कोण चालवितो?.कोणाच्या सत्तेमुळे आपण बोलतो?पहातो?एक नारायनच हे सर्व करत असतो. त्याचे भजन करणे चुकवू नये.तो देवच माणसामधे अहंता निर्माण करून “मीच कर्ता “हा भाव निर्माण करतो.खरेतर  कोणत्याही वृक्षाचे पान सुद्ध त्याच्य ईच्छेविना हालत नाही. मग अहंतेला कोणते स्थान आहे? तुका म्हणतो की विठ्ठल सर्वत्र अंतरबाह्य भरलेला आहे. तो नाही अशी कोणती जागा आहे?

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी माहिती :-**

***सर्वप्रथम येथे हे सांगावेसे वाटते की ह्या अभंगामधे जो विषय आहे तोच हजारो वर्षांपूर्वी केनोपनिषदामधे ॠषींनी चर्चिलेला आहे. ह्यावरून हेच आपण खात्रीपूर्वक म्हणू शकतो की***

***तुकाराम महाराज सुद्धा असेच एक अर्वाचीन ऋषीच आहेत. त्यांच्या एका अभंगामधे त्यांनी हे स्पष्टपणे सांगितले पण आहे असो.***

ह्या आधिच्या कांही अभंगामधे अध्यात्मशास्त्रामधला एक महत्वाचा मुद्दा येऊन गेला अहे. हा मुद्दा म्हणजे आपण आपल्या विचारांवर ताबा ठेवणे आवश्यक आहे. **आपले सर्व विचार मनामधे येतात ते आपल्या अहंभावामुळेच येतात. आपल्यातला अहंभाव अथवा "मीपणा" आपल्याकडून अनेक कार्ये करवून घेतो. शिवाय आपल्याला अशी पण जाणीव देतो की आपल्यामुळेच सर्व कार्ये घडत असतात. तसेच आपण केलेल्या कर्माचे फळ आपल्याला मिळावे म्हणूनच आपण बहुधा सर्व कर्मे करत असतो. थोडक्यांत म्हणायचे झाले तर प्रत्येक केलेल्या कर्माचे कर्तृत्व व तसेच भोक्तृत्व ह्या "मीपणा"च्या जाणीवेमुळेच आपण स्वत:कडे घेतो.**

मनाप्रमाणे फळ आले तर आपण म्हणतो "मी केले" “माझ्यामुळे सर्व कार्य नीट पार पडले "” मी केले नसते तर हे काम झाले नसते. पण जेंव्हा फळ मनाप्रमाणे मिळत नाही तेंव्हामात्र आपण देवाने फळ दिले नाही म्हणुन भगवंताला दोष देंण्यास मागेपुढे पहात नाही. असो.

प्रत्येक केलेल्या कर्माचे कर्तृत्व व तसेच भोक्तृत्व आपण स्वत:कडे घेतो व ह्यामुळेच जी फळे कर्म केल्यानंतर त्ताबडतोब मिळत नाहीत ती भोगण्यासाठी पुन:पुन: जन्म पण जीवाला घ्यावे लागतात. जन्म हेच दु:खाचे मूळ आहे हे समर्थ रामदासांनी अनेक वेळा दासबोधामधे स्पष्ट केले आहे. तुकाराम महाराजांनी पण अनेक अभंगामधे हेच सांगितले आहे.
तुकाराम महाराज तसेच सर्व संतांनी म्हणूनच हे सांगितले आहे की जोपर्यंत हा "मीपणा" जागा आहे तोपर्यंत मुक्ती कधीच मिळणार नाही.
**ह्या माहितीवरून अभंगाचा भावार्थ लिहिण्याचा प्रयत्न मी येथे केलेला आहे.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

अभंगाच्या पहिल्या दोन चरणांमधे तुकाराम महाराजांनी एक प्रश्न विचारलेला आहे. महाराज म्हणतात की कोणामुळे आपले हे शरीराचे सर्व व्यवहार नीट सुरळीतरीत्या चालले आहेत? कोणाच्या कृपेमुळे आपल्याला सृष्टीचे ज्ञान ( पाहणे) होते? आपल्याला बोलविणारा कोण आहे? ह्याव रापण विचार करावा हीच महार्जांची येथे अपेक्षा आहे. प्रश्नाचे उत्तर अर्थात आपल्याला माहीत आहे ते म्हणजे "आपल्यातला अंतरात्माच ह्या ऐकणे , बोलणे पाहणे थोडक्यांत म्हणजे पंचेंद्रियांद्वारे सृष्टीचे ज्ञान घेण्याच्या क्रियांचे मूळ आहे."

केनोपनिषदामधे विचारलेला प्रश्न खालीलप्रमाणे आहे.
" केनेषितां वाचमिमां वदन्ति, चक्षु:श्रोत्रं क देवौ उनक्ति ?"
गोळाबेरीज अर्थ :- कोणामुळे माणूस बोलतो? कोणामुळे दोळयांना पाहण्याची शक्ती येते? कोणामुळे कानांना ऐकण्याची शक्ती येते? हा कोण?

तुकाराम महाराजांनी अभंगातच उत्तर दिले आहे . ह्या सर्व शक्ती ,क्षमता (capabilities) देणारा एकुलता एक म्हणजेच एकमेव नारायण हाच आहे. ( महाराजांनी त्यालाच विठ्ठल, देव भगवंत ईत्यादी नावांनी पण संबोधिले आहे )

अभंगाच्या तिसऱ्या चरणामधे महाराजांनी हे पण स्पष्ट केले आहे की नारायणच प्रत्येकाच्या “मी” द्वारे सर्व कांही करवून घेत असतो. पण त्याच्याच मायेच्या प्रभावामुळे माणसाला वाटते की तोच कर्ता , भोक्ता आहे.

ह्यासर्व विवेचनावरून हे तर नक्की स्पष्ट होतेच की "मी कर्ता / भोक्ता " अशी विचारसरणिच अयोग्य आहे. हा मुद्दाच स्पष्ट करण्यासाठी तुकाराम महाराज चौथ्या चरणामधे म्हणतात की " साधे वृक्षाचे पान सुद्धा भगवंताच्या ईच्छेविना हालत नाही.; मग ( विचार करा की ) तुमच्यामधील " मी पणास कोठे थारा आहे." अर्थातच ह्या "मीपणाला अहंभावाला " कधीच कर्ता वा भोक्ता म्हणता येते नाही . तेंव्हा मी पणा सोडावा."
अभंगाच्या १ल्या चरणात म्हणूनच महाराजांनी सांगितले की तुमचा अंतरात्म्याच्या ईच्छेनुसारच तुम्हाला ऐकणे, बोलणे ईत्यादी क्षमता मिळाली आहे. तोच भगवंत सर्वव्यापी

आहे. जसा तो तुमच्या अंतरी आहे तसाच तो सर्व विश्वामधेपण आहे. तो नाही अशी कोणतीही जागाच अस्तित्वात नाही.

भगवंताचे कर्तृत्व असे सांगून मग महाराजांनी आपल्याला पुढीलप्रमाणे उपदेश केला आहे. हा उपदेश अभंगाच्या " तयाचे भजन चुको नयें" ह्या चरणामधे आहे.समर्थ रामदासस्वामींनी दासबोधामधे "आत्मनिवेदन भक्ती म्हणजे काय ह्यावर अनेक ठिकाणी लिहिले आहे. तुकाराम महाराज म्हणतात ते भगवंताचे भजन करणे म्हणजेच " आत्मनिवेदन भक्ती होय.

**अभंगाची शिकवण:-**

शिकवण हीच आहे की

१) भगवंत सर्वांभूती आहे हे समजूनच सृष्टीतील सर्वांशी व्यवहार आदराने करावे.

२) भगवंत "चल व अचल " दोन्ही मधे आहे. म्हणून अचल पदार्थाचा सुद्धा आदर करावा. ह्यामधे आपल्या भोवतीचे सर्व पर्यावरण पण येते.

३) जे जे घडते त्याचा कर्ता भोक्ता भगवंतच आहे हे लक्षांत ठेवावे म्हणजे मी पणाला जागाच रहात नाही.

**थोडक्यांत म्हणजे भगवंताचे स्मरण सदा सर्वदा असावे.**

ॐ

************

**अभंग जोडी :- भगवंताची कृपा झाली की काय घडते.**

**अभंग१)** देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥ १॥
ऐसा असोनी अनुभव । कासाविस होती जीव ॥ २।\
देवाची जतन । तया बाधूं न शके अग्न ॥ ३॥
तुका म्हणें हरी । प्रल्हादासी यत्न करीं ॥ ४॥

**अभंग २)** प्रेम सूत्र दोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥ १ ॥
मनेंसहित वाचा काया । अवघें दिले पंढरीराया ॥ २॥
सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुळती ॥ ३॥
तुका म्हणें ठेवी तैसें । आम्ही राहों त्याचे ईच्छे ॥ ४॥

संपूर्ण शरणागती म्हणजे काय ते स्पष्ट करणारे २ अभंग मी ह्यावेळी निवडले आहेत.

**अभंगाचा शब्दार्थ :-**

**अभंग १ ला:-** अभंग २ रा:-
जेंव्हा देवच तुमचा सखा आहे हे जगाला कळते तेंव्हा जग तुमच्यावर कृपा करते ॥१॥
जरी हा अनुभव लोकांना अहे तरीही लोक काळजी करत असतात ॥ २॥
जेंव्हा देवच रक्षण करणारा असतो , तेव्हा अग्नीसुद्धा (अशा भक्ताला) जाळू शकत नाही ॥ ३॥
प्रल्हादाच्या जीवनचरित्रावरून हे स्पष्ट झाले आहे ॥ ४॥

**अभंग २ :-**

मला हरीने प्रेमसूत्ररूपी दोरीने बांधले आहे व तो जेथे मला ओढतो तेथे मी जातो. ॥ १॥

मी माझे मन, वाचा व सर्व शरीर पंढरीनाथाला (हरीला) अर्पण केले आहे.॥ २॥

त्याच्या हातीच सर्व सत्ता आहे व काकुळतीला आलेल्या माझी त्याला कींव आली आहे. ॥ ३॥

तुका म्हणतो की तो जसे ठेवतो त्याची जशी ईच्छा असेल तसेच जीवन मी जगतो आहे. ॥ ४॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी भूमिका :-**

ह्या आधीच्या अनेक अभंगांमधे तुकाराम महाराजांचा व ईतर संतांचा उपदेश आपण वाचला आहे. भगवद्गीतेमधे श्रीकृष्णांनी सांगितलेला कर्मयोग म्हणजे काय व तसेच नामस्मरण भक्तीमधे आपल्याकडून कर्मयोगाचे व ज्ञानयोगाचे आचरण कसे घडते ते पण आपण पाहिले आहे.

ह्या दोनही ठिकाणी आवश्यक असते ती " संपूर्ण शरणागती ". ह्या दोन अभंगांमधे अशी संपूर्ण शरणागती कशी पत्करायची याचेच मार्गदर्शन आहे.

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

पहिल्या अभंगात भक्त प्रह्लादाचा उल्लेख आहे. ही भागवत पुराणामधली कथा आहे. हिरण्यकश्यपु हा दैत्य राज होता. त्याने कठीण तप करून असा वर मिळवला की त्याला दिवसा, रात्री, घराच्या आंत वा बाहेर, देव, दानव, मानव तसेच कोणत्याही पशु पक्षी यांच्याकडून , कोणत्याही शस्त्राने मृत्यू येणार नाही.

तसे पाहीले तर हे अमरत्त्वाचेच वरदान त्याने मिळवले. मग उन्मत्त झाला व कोणत्याही देवाची अर्थात भगवंताची पूजाच काय पण नांव सुद्धा घेण्याची त्याने बंदी घातली. पण त्याचा पुत्र प्रल्हाद ह्याच्या अगदी विरुद्ध वागत होता. प्रल्हादाला ठार मारण्यासाठी अनेक प्रयत्न केले गेले. पण प्रल्हाद सतत नामस्मरणातच दंग होता. होलिका ही प्रल्हादाची आत्या. तिला अग्नी जाळू शकणार नाही हा वर मिळाला होता. प्रल्हादाला ठार मारण्यासाठी. होळीमधे प्रल्हाद व होलिका बसवले गेले. पण होलिका जळाली व प्रल्हाद वाचला. शेवटी भगवंताने नृसिंहाचा अवतार घेऊन हिरण्यकश्यपुचा वध केला.प्रल्हादाची अनन्य भक्ती व त्यामुळे भगवंताची त्याच्यावरची प्रीती ह्यामुळे प्रल्हादाचे कल्याण झाले.

**म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात की "जर भगवंत तुमचा मित्र असेल व सर्वस्व असेल तर सर्व जग तुमच्यासाठी झटते. मग तुम्हाला कशापासूनच कसलेच भय उरत नाही. पुढच्याच चरणांमधे तुकाराम महाराज ( जणू आश्चर्याने) म्हणतात की हे सर्व माहीत असूनही लोक सारखे कसली ना कसली काळजी करत असतात.**

ह्या पार्श्वभूमीकेवरुन पुढच्या अभंगात महाराजांनी स्वत:चेच उदाहरण देऊन हे कसे शक्य आहे ते स्पष्ट केले आहे..

महाराज पांडुरंगाचे भक्त आहेत.पांडुरंगावर त्यांचे अनन्य प्रेम व भक्ती आहे. अर्थात पांडुरंग पण त्यांच्यावर प्रेम करतात. भगवदगीतेमधला खालील श्लोक हेच सांगतो.

**अनन्या श्चिंतयंतोमाम् ये जना: पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानाम योगक्षेमं वहाम्यहम् ।**

अभंगात महाराज पुढे म्हणतात की पांडुरंगाच सर्व विश्वाचा मालक , राजा आहे. तुकाराम महाराजांनी आपले सर्वस्व त्याला अर्पण केले आहे.त्यांचे मन, शरीर, वाचा सर्वकांही पांडुरंगाचे

आहे. त्यामुळे पांडुरंगाने त्याना प्रेमरज्जूने बांधले आहे. पांडुरंग नेईल तिकडे ते जातात. तो ठेवेल त्यात ते समाधानाने राहातात.

**येथे असा प्रश्न पडतो की असे जगणे शक्य आहे कां? उत्तर अर्थतच "होय"शक्य आहे " हेच आहे. कसे ते आता पुढे आपण पाहूया.**

सर्वप्रथम हे ध्यानात घ्यायला हवे की सर्वांचा निर्माता म्हणजे आई बाप तोच आहे. मग आई जशी आपल्या लेकरांची काळजी घेते तसे तो करणार नाही कां? जेंव्हा आपण त्याला अनन्यभावे शरण जातो तेंव्हा तो खरच आपली सर्व काळजी घेत असतो. स्वत:च्या आयुष्यातल्या घटनांकडे पाहिले तर हे सहज लक्षांत येते. असो.

म्हणुन त्याने ठेवले तसे राहाणे, त्यांत समाधान मानणे हे करता येणे नक्कीच शक्य आहे.आपण प्रयत्न करून मग आपल्या प्रयत्नांचे फळ त्याच्यावर सोडावे एवढेच. **हे मनानेच करायचे आहे.**आपण सर्वांचे आयुष्य साधारणत: ७०-८०- जास्तितजास्त १०० वर्षांचे आहे. जेंव्हा आपण जन्माला आलो तेंव्हा हातात कांहिही नव्हते. मृत्युनंतरपण आपण येथील कांहीच बरोबर नेत नसतो. हे जग ज्याने निर्माण केले त्याचीच येथील सर्व संपत्ती , मालमत्ता आहे. हेच ध्यानांत ठेवायचे व ह्या सर्व नश्वराची आसक्ती ठेवायची नाही. रशियन क्रांतीमधे अनेकांची संपत्ति एका दिवसांत हातची गेली. डॉक्टर झिवागो या चित्रपटामधे हे सुंदररीत्या दाखवले आहे. असो. थोडक्यांत म्हणजे जे जे आहे ते त्याचे आहे हे लक्षांत ठेवले की झाले.

ह्यावर थोडेसे मनन केले की आपल्याला तुकाराम महाराज मी देवाशी प्रेमरज्जुने बांधला गेलो आहे व तो नेईल तिकडे जातो असे कां म्हणतात हे समजते.

ह्यात हे स्पष्ट झाले की जसे लहान मूल आपल्या आईलाच फक्त हांक मारते तशीच आपण पण भगवंतमाऊलीला हांक मारायची. सर्व कर्ताकरविता भगवंतच आहे हे सतत ध्यानांत ठेवायचे आहे.त्यासाठी सतत नामस्मरण करणे सोपे आहे हे ओघाओघाने आलेच

**अभंगाची शिकवण :-**

**शिकवण हीच आहे की भगवंताला अनन्य भावे शरण जावे. तोच सर्व कर्ताकरविता आहे हे लक्षांत ठेवावे.जे जे आहे ते त्याचेच आहे म्हणुन समाधानने जीवन नामस्मरण करत जगावे.**

**आजवर आपण असे जगत आलेलो नाही पण आतातरी सुरुवात करायला हरकत नाही. मला वाटते की हे अभंग हीच शिकवण देतात..**

**ॐ**

*******************

भगवंताचे कर्तृत्व वर्णन करणारा अभंग. भगवंतास कां स्मरावे हे पण सांगतो :-

का रे नाठविसी कृपाळू देवासी । पोसितो जगासी एकला तो ॥ १॥
बाळा दुध कोण करिते उत्पत्ती । वाढवी श्रीपती सवे दोन्ही ॥ २॥
फुटती तरूवर ऊष्णमासकाळी । जीवन तयांसी कोण घाली ॥ ३॥
तेणें काय केली नाही तुझी चिंता । राहे त्या अनंता आठवूनी ॥ ४॥
तुका म्हणे ज्याचें नांव विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करी ॥ ५॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

अरे सज्जन माणसा तू कृपाळू देवाला कांआठवित नाहीस? तोच सर्व जगाला पोसतो आहे॥ १॥
मला सांगा की नवजात बाळासाठी आईकडे दुधाची उत्पत्ती कोणबरे करते? श्रीश्रीपतीच आई व बाळ दोघांनाही वाढ्विवत आसतो॥ २॥
प्रखर उन्हाळा असताना तरुवरांना पालवी फुटते. त्यांना पाणी कोण बरे घालते? ॥ ३॥
त्याला ( भगवंताला ) काय तुझी चिंतावाटत नाही? त्या अनंताला आठ्वून जीवन जगावे॥ ४॥
तुका म्हणतो की त्यचे नांव विश्वंभर आहे . त्याचे नेहमी ध्यान करावे ॥ ५॥

अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी कांही माहिती :-

**अ) हा अभंग कोणासाठी लिहिला आहे?**

जर आपण लोकांची जीवन जगण्याची पद्धती पाहिली तर असे आढळते की बहुतेक सर्वच जण जेवण ( भोजन) झोप (निद्रा) भीती (भय) व प्रजोत्पत्तीचे साधन विषय व त्याचा आनंद घेणे ; ह्यातच आपले सर्व जीवन व्यतीत करत असतात. ह्या सर्वांचा मुख्य वासना असतात. या शिवाय संपत्ति मिळावी, जगातली सर्व सुखे भोगण्यास मिळावी हीच सर्वांना असणारी वासना

असते. सर्वच जण स्वत:चे कुटुंब , शरीराला भोग देणे , ह्या सर्वासाथी पैसा मिळवणे ह्यातच गुंग असतो. म्हणजेच मुख्य गरजा ह्या भौतिक संपत्तीसाठी अथाक प्रयत्न करणे , शरीराला ज्याद्वारे आनंद मिळेल ते करणे, फक्त स्वत:वर व स्वत:च्या कुटुंबावर प्रेम असणे ह्या असतात व त्यामुळे इतर कसल्याचबाबींचे महत्व नसते( इतर बाबींवर फारसा विचारच केला जात नाही ).
ह्याचा परीणाम म्हणजे जन्मभर माणसे ह्या सर्वांचीच चिंता करत जगतात. सतत निर्माण होत असलेल्या वासनापूर्तीसाठीच जन्म वाया घालवतात,.
अशा लोकांपैकी कांहींना देवाची कल्पना असते. साधारण पणे देव हा आपल्या सर्व ईच्छा पुर्ण करणारा, आपल्याला संकटसमय़ी मदत करणारा , आपली सर्व दु:खे दूर करू शकणारा असा आहे हीच कल्पना देवाबद्दल असते. ह्यासाठीच देवाची पूजाअर्चा , होमहवन ईत्यादि अनेक कर्मे लोक करताना दिसतात..

अशा वासनापुर्तीसाठीच जगणारे जे असतात त्यांना आपल्या शास्त्रांमधे "बद्ध" असे म्हटलेले आहे. बद्ध म्हणजे बंधनात असलेला. हे बंधन जन्म-मृत्यु-जन्म -मृत्यु ह्या चक्रामधे अडकल्याले आलेले असते. ज्या वासना व ईच्छा ह्या जन्मामधे पूर्ण होत नाहीत त्या पूर्ण व्हाव्या म्हणून जीवाला पुन:पुन: जन्म घ्यावे लागतात. नव्या जन्मामधे नव्या वासना निर्मान होतात व चक्र सुरू राहते.
तुकाराम महाराजांचा हा अभंग अशा बद्धांसाठीच लिहिलेला आहे.

**ब) देव म्हणजे कोण? देव ह्या कल्पनेचा अर्थ काय आहे?**
वरील प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी आपल्याला आपल्या आजूबाजूला दिसणार्या , अनुभवास येत आहे त्या जगाचाच विचार करता येतो. तसा आता करूया.
प्रथम आपण रोज वेळ मोजण्यासाठी वापरतो त्या घड्याळाचेच उदाहरण येथे घेऊया.
हे घड्याळ कोणितरी निर्माण केले आहे. त्या घड्याळाच्या निर्मात्याला हे ठाऊक असते की १) घड्याळ कसे चालेल? २) घड्याळ किती काळापर्यंत टिकेल? ३) घड्याळ निर्मितिसाठी कोणती सामग्री, यंत्रे वापरावी लागतील? ४) घड्याळ तयार झाले की कसे दिसेल? ईत्यादी घड्याळाच्या बद्दलची पूर्ण व सर्व माहीती घड्याळाच्या निर्मात्याला असते.

थोडक्यांत म्हणायचे झाले तर असा घड्याळाचा निर्माता हा घड्याळाबद्दल " सर्वज्ञ" असतो.

ह्याच दृष्टांताचा उपयोग करून आपण हेच प्रश्न ह्या जगाबद्दल पण करू शकतो.
आपण ह्या जगाचा अनुभव आपली पंचेंद्रीये व मेंदू, बुद्धी, मन यांच्याद्वारे सतत घेत असतो. जर आकाशाकडे नजर टाकली तर आपल्याला हे आढळते की आकाशांत अनेक ग्रह, तारे आहेत. आता आपल्याला विज्ञानामुळे हे पण कळले आहे की आपला सूर्य हा असाच एक अगदी छोटासा तारा आहे. खगोल शात्रज्ञांनी "हबल " दुर्बीणीद्वारे आकाशाचा वेध घेतला तेंव्हा हे पण समजले की आपली पृथ्वी ही ह्या पसाऱ्यात एखाद्या मोहरीएवढी लहान आहे. शास्त्रज्ञाना हे पण कळले आहे की आपल्याला विश्वाच्या आकाराबद्दल कल्पनाच करता येणार नाही.
**हे विश्व ज्याने निर्माण केले आहे त्यालाच आपण " देव" असे संबोधत असतो. देव हा ह्या विश्वापेक्षा आणखी मोठा आहे हे ओघाओघाने आलेच.** त्याच्या ह्या दृश्य स्वरूपालाच " विराट " ही संज्ञा शास्त्रे वापरतात असे ढोबळपणे म्हणता येते.
तसेच हे पण लक्षांत घ्यायला हवे की विश्वाचे सर्वच व्यवहार कांही नियमांप्रमाणेच चालत असतात. सुर्य नियमितपणे एकाच वेळी उगवतो. ग्रहतारे त्यांच्या आखलेल्या कख्शांतच फिरत असतात व एकमेकांवर आदळत नाहीत.
हे नियम देवानेच केले आहेत व त्याला म्हणुनच " सर्वज्ञ " म्हणतात.

आपल्याला त्सुनामी , वादळे यांच्या मुळे होणारे नुकसान केवढे मोठे असते ते नेहमीच पहायला मिळते. निसगाच्या ह्या शक्तीचा ठावच लागत नाही . त्यांच्या निर्मात्या देवास म्हणुनच " सर्वशक्तिमान " असे पण विशेषण आहे.

असा हा देव , भगवंत सर्वत्र आहे. तो खरेतर अव्यक्तस्वरूपात आहे व आपल्याला आपल्या पाचही इंद्रियांद्वारे त्याला पाहाता / जा्णता येत नाही. आपण साधे अतीनील ( Ultraviolet Rays) किरण डोळयांनी पाहू शकत नाही. ह्या वैशिष्ठ्यामुळे आपण त्याला निराकार पण संबोधत असतो.

भगवंत अव्यक्त आहे म्हणजेच आकार,विकार रहित आहे.म्हणून त्याला “ निर्गूण” म्हणतात व हेच विशेषण तुकाराम महाराजांनी त्यांच्या अनेक अभंगात वापरले आहे.

सध्यापुरते एवढेच म्हणणे पुरेसे आहे की खरा देव हा अव्यक्तच आहे. त्याचे वर्णन मुख्यत: तीन विशेषणांद्वारे ( सर्वज्ञ, स४वशक्तिमान, सर्वव्यापी ) करता येते. त्याला आपण आपल्या सोयी साठी सगुण रूपामधे पाहातो.त्याची सगुणरुपातली अनंत नावे आहेत. भगवंताचे कोणतेही नांव आपल्याला त्याच्याशी जोडते.

ह्या अनेक नांवांमधलेच एक नांव " विश्वंभर " हे आहे. हे नांव भगवंतच सर्वत्र आहे हे दर्शवणारे आहे .त्याचे सर्वव्यापित्व पण हेच नांव दाखवते.. तुकाराम महाराजांनी म्हणुनच अभंगामधे त्याला विश्वंभर व अनंत ह्या नामांनी संबोधले आहे.
ह्या विवरणावरून आपल्याला आता आपल्याला अभंगाचा गूढार्थ अर्थ सहज लक्षांत येतो. तसेच शिकवण पाहाता येते.

**अभंगाची शिकवण :-**
तुकाराम महाराज आपल्याला हेच सांगत आहेत की आपन भगवंताला कधीही विसरू नये. त्याचेच विश्वंभर हे रुप धरून त्याचे ध्यान व स्मरण नित्य करावे.

**हे करण्याची सोपी पद्धत खालील प्रमाणे आहे असे म्हणता येते.**
१) त्याचे कोणतेही नांव घेऊन त्यचे स्मरण करावे. जसे "ॐ नम: शिवाय" , श्रीराम जय राम जय जय राम " किंवा आपल्याला आवडते ते कोणतेही नाम चालेल.
२) सर्वांभूति तोच नटला आहे हे समजून सर्वांशीच प्रेमाने वागावे.आजूबाजूच्या पर्यावरणाला नष्ट करू नये.

३) भगवंतच आपल्याला कोणतेही कार्य करण्याची प्रेरणा व शक्ती देत असतो. आपल्या अंतर्मनाद्वारे तो नेहमीच आपल्याला योग्य ती दिशा दाखवत असतो. म्हणुन अंतमनाचा आवाज ऐकावा.

४) प्रत्येक काम हे त्याची पूजाच आहे ह्या भावनेने करावे. तो सर्वज्ञ आहे त्याला तुमची अशी पूजा आवडते. आपले भले कशांत आहे हे तोच जाणतो म्हणुन जे मिळेल ते फळ आनंदाने स्विकारावे.

अभंगावर आलेले मतप्रदर्शन :

१) तिनही अभंगामधे तुकारामाने reciting म्हणजे "ॐ नम: शिवाय" , श्रीराम जय राम जय राम किंवा Sharavana( श्रवण) Manan( मनन ) Nididhyaasa ( निदिध्यास) perform the worship in the form of namasmarana (नामस्मरण ) सांगितले आहे. कुठेही पूजापाठ करण्याचा उल्लेख नाही (ज्याच्यात बराच वेळ जातो ). पूजापाठ करणे आवश्य आहे कां?

२) आपल्याकडे मोक्षा चे फार महत्व आहे जणु बाकी सर्व क्रिया करणे चूकच आहे असा समज असल्यासारखे एका गुरुजींनी मला सांगितले दाखवून दिले की हिंदु धर्माच्या तत्वज्ञाना प्रमाणे धर्म , अर्थ, काम हे पुरुषार्थ केल्यानंतर चौथ्या पुरुषार्थाची म्हणजे मोक्षाची पाळी येते. पहिले तीन जीवनाचा पाया भक्कम करतात. त्यातील पहिला क्रमांक धर्माचा. धर्म नीती न्यायाने जगणे शिकवतो. धर्म हाच स्वस्थ समाजाचा मुख्य आधार होय. ह्यानंतर अर्थाच क्रमांक लागतो. जीवन समृध्द होण्यासाठी अर्थाचा पाया भक्कम हवा. शरीर पण तंदुरुस्त हवे त्यासाठी पण अर्थ साथ देतो. काम भावना ही सहज भावना आहे. कामापासून पाठ फिरवणे कठीण कार्य असते. जसे एखादा म्हणेल की मी दारू पीत नाही पण मनामधे मात्र पिण्याची इच्छा असते तसेच कामाचे आहे. स्वामी विवेकानंद म्हणतात की थोडेसे ह्यांच्या आहारी गेले तर हरकत नाही पण त्यांच्यावर ताबा असायलाच हवा. असे करणे जमले तरच माणसाला मोक्षाचा विचार करून

त्यासाठी प्रयत्न करता येतात. मोक्षाच्यामागे लागून बाकीच्याकडे दुर्लक्ष करणे अयोग्यच आहे.
मतप्रदर्शन करणाऱ्याने हे स्पष्ट केले आहे की तो संत-महात्म्यांच्या वचनांवर टिका करीत नाहियेे. त्या सर्वांचे जीवनचरीत्र आपल्याला हेच शिकवते की माणसाने खरे जागे व्हावे, पहिल्या तीन पुरुषार्थांकडे पाठ फिरवू नये तसेच मोक्षालाही विसरू नये.

वर लिहिलेल्या मतांवरचा खुलासा खाली देतो आहे :-
१) मलापण असे वाटत होते की आपन पूजा पाठामधे उगाचच व्यर्थ वेळ वाया घालवतो. पण कोणतीही साधना ही नियमितपणेच करायला हवी हे पण खरे महत्वाचे आहे. त्यासाठी विशिष्ठ वेळ रोजच द्यायला हवा. सकाळची वेळ ही साधने साठी सर्वोत्तम असते. तसेच आपण कोणाची पूजा करतो आहोत हे समजणेपण तितकेच महत्वाचे असते. आपण पुजा करतो ती एखाद्यामूर्तीची, एखाद्या चिन्हाची करतो. ( जसे ॐ) . पुजेमधे काय किंवा ध्यानात काय आपले मन भगवंतावर स्थिर झाले पाहीजे. स्मरणभक्तीत असे सातत्याने भगवंतावर मन ठेवणे सोपे जाते. पण मनास इकडे तिकडे धावण्याची खोड असते. त्यावर ताबा मिळवणे तसे कठीणच असते. ह्यासाठीच पुजा पाठ करा असे आपले पूर्वज व शास्त्रे सांगतात.

खरेतर येथे मला समर्थ रामदास स्वामींनी सांगितले आहे की सतत नामस्मरण करावे.कारण हे करण्यात आपले कोणतेही कार्यक्रम , नियन ईत्यादी आडवे येत नाहीत.नामस्मरणामुळे अभंगातल्या शिकवणीचे पालन सहज होईल असे म्हणता येते.

३) हे म्हणणे पण पटते की "जागे व्हा" ही हांक, ज्यांनी धर्म , अर्थ, काम ह्यांना जीवनांत योग्य स्थान दिले आहे त्यांच्यासाठीच आहे. भगवान श्रीकृष्ण गीतेत म्हणुनच अर्जूनाला सांगतात की युद्ध कर . तेच तुझे कर्तव्य आहे.
पण ही भुमिका बरच जण विसरतात. कदाचित् त्याची जीवनशैली हे त्याचे कारण असेल. आपल्या देशावर मोगलांनी मोठ्या क्रौर्याने राज्य केले. शंकराचार्य, ज्ञानेश्वर महाराज होऊन गेल्यावर मोगल आले. जवळजवळ १६०० सालापर्यंत ५ शाह्या ( मोगल, बिदरचि

शाही, कुतुबशाही, अदिलशाही, निजामशाही ) देशावरती राज्य करीत होत्या. लोकांना धर्मपालन करणे कठीण होऊन गेले होते. त्यामुळेच कदाचित मोक्षाच्या कल्पनेला महत्व आले असावे. नंतर तीच मनोवृत्ती झाली. मोक्ष मिळाला तरच ह्या जुलमी राज्यातून सुटका होईल अशी कल्पना असेल. अजूनही म्हणुनच सर्वांना मोक्षाचेच आकर्षण वाटते.

वैदिक धर्माप्रमाणे पहिले तीन पुरुषार्थ केल्यानंतरच माणसाला वानप्रस्थाश्रमात जायची परवानगी आहे हे विसरता येत नाही.

**सध्याच्या दिवसांत वनांत जाण्याची आवश्यकता नाही. म्हातारपण आले की स्वत:ला अलिप्त ठेवले की झाले. विवेकानंदांप्रमाणेच महाराष्ट्रात समर्थ रामदास होऊन गेले. ते म्हणतात की माणसाने प्रथम स्वत:च्या प्रपंचातली सर्व कर्तव्ये नीटपणे करावी ( ह्यांत कुटुंब व देशासाठीचि कर्तव्ये येतात) तसेच simulteneously परमार्थाकडे पण माणसाने लक्ष द्यावे. तरच जन्माचे सार्थक होईल.**

**हे कसे करायचे ते आपण अभंगाच्या शिकवणीत पाहिलेच आहे.**

ॐ

**************

# भाग ५ वा




**अज्ञानी , दांभिक माणसे कशी असतात, त्यांची भक्ती कशी असते , दांभिक माणसाला कसे ओळखाय़चे  ते सांगणारे अभंग ह्या भागामधे येथे घेतले आहेत.**

**अभंग : स्वत:ला दांभिक म्हणवणार्या गुरु बद्दल.**

मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन आणि मान ॥ १ ॥
ऐशियाची करिंतां सेवा । काय सुख होये जीवा ॥
पोटासाठी संत । झाले कलींत बहुत ॥ ३ ॥
विरळा ऐसा कोणी । तुका त्यासि लोटांगणी ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ** :-

( स्वत:ला गुरू म्हणवणारा) दांभिक गुरु तोंडाने ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी करतो पण मनामधे धन व मानाची ईच्छा धरून असतो.॥१॥

अशा गुरूंची सेवा करून कोणाला काय मिळएल? सेवा करणार्याच्या जीवालाकाय सुख मिळेल? ॥२॥

अध्यात्माचा धंदा पोटासाठी करणारे असे लोक ह्या कलीयुगात बरेच झाले आहेत ॥ ३॥
खरा ब्रह्मज्ञानी साधू विरळच असतो. अशा साधूला मी लोटांगण घालेन असे तुका म्हणतो॥ ४॥

**अभंगाचा अर्थ :-**

ह्या अभंगामधे तुकाराम महाराजांनी दांभिक गुरु कसे असतात ते सांगितले आहे व आपल्याला गुरुंची निवड करताना काळजी घ्यावी हेच सुचविले आहे.

पहिल्याच ओळींत महाराज म्हणताहेत की ब्रह्मज्ञानाच्या गप्प करणारी अनेक मंडळी आपल्याला आढळतात. अशा लोकांची स्थिती म्हणजे " लोकांसांगे ब्रह्मज्ञान व आपण कोरडा पाषाण " अशीच असते. अशी दांभिक माणसे पैसा, संपत्ती व कीर्ती मिळावी म्हणून हा खटाटोप करत असतात. सध्याच्या कलीयुगामधे असे बरेच लोक झाले आहेत.असल्या दांभिक गुरुकडुन तुम्हाला कांहीही मिळत नाही हे लक्षांत घ्यावे.

अभंगाच्या शेवटी महाराज म्हणतात की जर असा खरा ब्रह्मज्ञानी कोणी असेल तर महारज त्याच्या पायी लोटांगण घालतील.

**अभंगाची शिकवण :**

तुकाराम महाराजांच्या कालांत जसे दांभिक लोक होते तसेच आजच्या काळांतही आहेत. परिस्थिति कांही फार वेगळी नाही. **आपला गुरु निवडताना तो खरेच ब्रह्मज्ञानी आहे की नाही याची खात्री करून घ्यावी व नंतरच अशा सद्‌गुरुंना शरण जावे.ही शिकवण येथे आहे.**

असा गुरू ओळखणे पण कठीणच असते.**पण** ब्रह्मज्ञानी संताचे वाङ्मय म्हणजेच संतांचे रूप होय. असे वांङ्मय वाचणे, मनन करून त्या मधील उपदेशाचाचा खरा गूढार्थ उकलून काढणे व त्या उपदेशाप्रमाणे आचरण ठेवणे हे करणे मात्र आपल्याला सोपे व साधण्यासारखे आहे. असे आचरण होऊ लागले की योग्य वेळी सद्‌गुरूची भेट सहजपणे घडते.
टीप:- “ एका योग्याची आत्मकथा ( Autobiography of a Yogi) ह्या स्वामी परमहंस योगानंद ह्यांच्या पुस्तकामधे अशा प्रसंगाचे वर्णन आहे.”

*************

अभंग२ :- दांभिकाचे वर्णन

**बळें बाह्यात्कारें संपादिलें सोंग। नाहीं जाला त्याग अंतरींचा॥ १ ॥**
ऐसें येतें नित्य माझ्या अनुभवा । मनासी हा ठावा समाचार ॥ २ ॥
जागृतीचा नाहीं अनुभव स्वप्नीं । जातो विसरूनि सकळही ॥ ३॥
प्रपंचाबाहेरी नाहीं आलें चित्त । केले करी नित्य वेवसाव ॥ ४ ॥
तुका म्हणे मज बहुरुप्याचि परी । जालें सोंग वरी आंत तैसे ॥ ५ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

मला हा रोजच अनुभव येतो आहे की अनेक जण बाह्यत: वैराग्याचा आव बळजबरीने आणतात. पण खरेतर त्यांनी मनाने कसलाच त्याग केलेला नसतो. ॥ १॥

हा अनुभव येत आहे हे मला सतत जाणवत असते . मला माझे मन कसे आहे तेही ठाऊक आहे ॥ २॥

जेंव्हा मी झोपी जातो व स्वप्नावस्थेत जातो तेंव्हा जागृत अवस्थेमधे जाणवलेल्या सृष्टीचा मागमूसही उरत नाही. सर्व कांही विसरले जाते. ॥ ३॥

माझे चित्त अजूनही प्रपंचामधून निवृत्त होत नाही आहे व मी त्यामुळे नित्य व्यवहार करतोआहे ॥ ४॥

तुका म्हणतो की माझे वागणे बहुरुप्याप्रमाणे आहे. जसा मी दिसतो तसाच अंतर्यामी पण आहे ॥ ५॥

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :**

ह्या अभंगामधे तुकाराम महाराजांनी ढोंगी साधूचे वर्णन केलेले आहे.( असे लोक स्वत:च्या फायद्याकरीता बाह्यत: आपण मोठे निर्लोभी असल्याचे दाखवतात व त्यामुळे लोकांची फसगत होते.)

अभंगाच्या दुसऱ्या व शेवटच्या चरणांमधे महाराजांनी स्वता:ची खरी स्थिती काय आहे तेही

निर्भीडपणे माडले आहे.

**अभंगाच्या पहिल्याच कडव्यामधे** महाराज म्हणतात की कांही लोक असे असतात जे जगाला आपण अगदी नि:स्पृह, निर्लोभी असल्याचे सोग करतात. पण प्रत्यक्षांत त्यांच्या मनामधील वासना, ईच्छा मुळीच कंमी झालेल्या नसतात.

**अभंगाच्या दुसऱ्या कडव्यांत** महाराज म्हणतात माझे मात्र असे नाही. माझ्या चितामधे काय चालले आहे ते मी जाणुन आहे.

माणसांमधे तीन प्रकारच्या वासना ( ईषणा) साधारणत: असतात. १) उदो उदो व्हावा, नांव व्हावे , कीर्ती मिळावी अशी ईषणा . हिलाच लोकेषणा म्हणतात. २) वित्तेषणा म्हणजे भरपूर पैसा, संपत्ती मिळावी ही ईषणा ३) दारेषणा म्हणजे स्त्रीबद्दल आसक्ती.

**महाराज आपल्याला ह्या तीन ईषणां असणार्या ढोंगी साधूंपासून दुरच रहा हेच ह्या अभंगामधे सुचवीत आहेत.**

**तसेच तुम्ही पण ह्या ईषणांपासून दूर रहा हे पण सांगत आहेत.**

पण **प्रश्न असा पडतो की हे कसे करायचे** ? अभंगाच्या तिसऱ्या कडव्यांत ह्यावर थोडासा उलगडा केलेला आहे.

**तिसऱ्या कडव्यांत** ते म्हणताहेत की त्यांना स्वत:च्या मन:स्थितीची पूर्ण कल्पना आहे. म्हणजेच **आपल्या मनाला आपण कोठे आहोत ते कळते.म्हणून ज्याला भगवंताचा साक्षात्कार हवा असेल त्याने प्रथम स्वत:च्या मनाची पूर्ण तपासणी करावी व पहावे की आपल्याला अजूनही बाह्य सृष्टीतल्या नाशवंत वस्तूंबद्दल आसक्ती, प्रेम आहे कां ?जर उत्तर हो असे असेल तर आपल्याला स्वता:चे मन शुद्ध करून घेणे जरूरीचे आहे.**

अभंगच्या ह्या भागांत वेदांताचा ह्या दृश्याबद्दलचा (मांडुक्य उपनिषदातला) विचार प्रगट होतो.

ह्या विचारावर मनन केले तर माणसाच्या मनांमधे वैराग्य उत्पन्न होऊ शकते. वैराग्याचा अर्थ हाच की दृश्यांतल्या सर्वच वस्तुमात्रांचे नाशवंतच खरे आहे हे लक्षांत आल्याने त्याची आसक्ती सुटणे हा घेता येतो. वैराग्यामुळे वासना क्षीण होतात.

तुकाराम महाराज म्हणतात की आपण झोपी गेलो की जागृत अवस्थेमधे अनुभवास येते त्या सर्वाचाच **पूर्ण** विसर पडतो. शरीर स्वप्नावस्थेत गेलेले असते त्यामुळे हे घडते. ह्या विचाराचे थोडक्यांत विवरण पुढे केलेले आहे.

आपल्या स्वप्नावस्थेत आपणच स्वत:ची एक वेगळी सृष्टी निर्माण करतो. ह्या स्वप्नातल्या जगामधे माणसे असतात, पशू, पक्षी, घरे , ईमारती , झाडे वगैरे सर्व कांही असते व आपल्याला ते त्या वेळी खरे आहे असेच वाटत असते. जागृतावस्थेव मधे जे जे व्यवहार आपंण करतो तेच ह्या स्वप्नामधेपण घडतात. ह्या शिवाय आपल्या जागृतीत मनामधे आलेल्या कांही ईच्छा सुद्धा पूर्ण होतात. उदाहरणार्थ आपल्य़ाल लोटरी लागून पैसे पण मिळतात व आपण खूप आनंदी होतो.

पण नंतर आपण जागे होतो. आपल्याला कळते की अरे हे तर एक स्वप्न होते. पण म्हणून आपण कांही पैसे गेले ह्याचे दु:ख करत बसत नाही. स्वप्नामधले पैसे गेल्याचा आपण शोक करत नाही.

**कारण काय तर ते फक्त एक स्वप्नच होते म्हणून**. !

वेदांत म्हणतो की ह्या स्वप्नाप्रमाणेच हे जागृतीत अनुभवास येते ते सर्व जग पण स्वप्नच आहे. जशी आपण स्वप्नामधे सृष्टी निर्माण केली तशीच परमेश्वरानॆ आपण

आहोत ती सृष्टी निर्माण केली. म्हणजे आपण सर्वजण परमेश्वराच्या स्वप्नामधे वावरत आहोत. वस्तुत: आपण व परमेश्वर एकच आहोत. म्हणुन ह्या स्वप्नामधील सर्वकांही नाशवंतच आहे. अर्थात म्हणूनच ह्या स्वप्नामधल्या वस्तूंची आसक्ती धरून राहाण्यात कांहीही अर्थ नाही. पैसा, अडका हा सुद्धा त्यातच येतो. पैशाचीच नव्हे तर स्वत:च्या देहाची सुद्धा आसक्ती ठेवणे अयोग्यच आहे. आसक्ती ठेवली की जन्ममृत्युचे बंधन आलेच .

**हे विश्व स्वप्नवत आहे ह्याचा अर्थ हा पण आहे की येथील सर्व कांही होते ते परमेश्वराच्या मनाप्रमाणे होते. आपला देह , पैसा हे त्याचे कार्य करण्यासाठीच आपल्याला मिळालेला आहे. ( भगवंत कर्ता -मी नाही !.मी त्याच्या इच्छेप्रमाणे चालणारे एक यंत्र आहे)**

**जागृत व स्वप्नावस्थमधे जे अनुभवले जाते ते अनुभवणारा मात्र एकच आहे. तो म्हणजे आपल्यातील अंतरात्मा. तेच आपले खरे स्वरूप आहे.**

**अभंगाच्या ४ थ्या चरणांत म्हटल्याप्रमाणे** , वर लिहिलेल्या मुख्य तत्वास आपण नजरेआड करत असतो. ह्याचा परिणाम म्हणजे आपले शरीर व जगच खरे आणी शाश्वत आहे असा आपला समज होतो. मग आपण पंचेंद्रियांच्या द्वारे मिळणार्या तात्पुरत्या भोगानंदामागे धावत राहातो. मृत्युचे विस्मरण होते .

**परंतु जर आपण वर वेदांतात जे दिले आहे ते सांगणे समजून घेतले व स्वत:च्या जीवनातल्या घटनांकडे पाहीले तर आपल्या अंगी वैराग्य सहजपणे बाणू शकेल. मग कोणत्याही घटन्न बद्दल सुख दु:ख फारसे होणार नाही. मन उद्विग्न हॊणार नाही.**

अभंगाचा शेवटचा चरण तुकाराम महाराजांची स्थिति कशी ते सांगतो. त्यांची ही स्थिति अंतर्बाह्य एकसारखीच आहे. (वैराग्याची स्थिती) . हीच खरा संत ओळखण्याची खूण आहे.

**अभंगाची शिकवण :**

**विचार करून अशाश्वतची आसक्ती सोडावी, हीच शिकवण येथे आहे.दांभिक मानसांपासून दूर रहावे.**

ॐ

********************

**अभंग :- अज्ञानी लोकांची भक्ती कशी असते ते सांगणारा**

अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचियें चित्तिं बोध कैचा ॥ १॥
अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचियें ध्यानां देव कैंचा ॥ २ ॥
अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी ध्यान । निष्काम साधन तया कैंचें ॥ ३ ॥
अज्ञानाचें ज्ञान विषयांवरी ठेवी ध्यान । ब्रह्म सनतन तया कैंचें ॥ ४ ॥
तुका म्हणे जळो ऐशियाचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥ ५॥

**शब्दार्थ :-**

अज्ञानी माणसांची भक्ती संपत्ती साठी असते मग त्यांना भगवंत कसा भेटेल**?**॥ १॥

अज्ञानी जनांची पूजा सकाम असते मग त्यांना देवाचे ध्यान कसे करता येईल**?**॥ २॥

अज्ञानी माणसाने केलेले कर्म फळाची आशा टेवून केलेले असते**,** अशांना नि:ष्काम साधनाचे महत्व कसे कळेल**?**॥ ३॥

अज्ञानी जनांचे ज्ञानाची व्याख्या विषयांचे ज्ञान अशी असते मग सनातन ब्रह्माचे ज्ञान

त्यांना कसे कळणार?॥ ४॥

तुका म्हणतो की जे लोक अशा विषयांवर आधारित ज्ञानाचे बंड वाढवतात,अशांचे तोंड जळो! ॥ ५॥

**अभंगाचा गर्भित अर्थ समजण्यासाठी लागणारी भूमिका :-**

नुकतीच गणेश चतुर्थी सर्व देशभर साजरी केली गेली. श्री.गणेशाचे रूप दोन प्रकारचे आहे. पहिले खरे अव्यक्त रूप अर्थात अध्यात्मिक रूप व दुसरे आपल्याला माहीत असलेले सगूण रूप. आपण ह्या सगुणाचीच पूजा करत असतो..

पण खरेतर गणेश म्हणजेच परब्रह्म .ॐ कार हे त्याचे प्रतीक आहे. ॐ चे पाच भाग आहेत.

१) अ अक्षर जागृत अवस्था( शरीराची ) दर्शविते. २) उ अक्षर स्वप्नावथा दर्शविते ३) म अक्षर सुषुप्तिचे दर्शक आहे, ४) अर्धमात्रा तुर्येचे दर्शक आहे व बिंदू उन्मनी अवथा दर्शवितो. गणेश हा ह्या सर्वापलीकडचा आहे . तोच सर्व ब्रह्मांडाचा जनक होय. म्हणजे तोच सृष्टीमधल्या प्रत्येक प्राणिमात्रांचा , आपला खरा आईबाप दोन्ही आहे. म्हणून त्याला "गणनायक" असे पण संबोधतात.

आपण म्हणूनच कोठलेही कार्य सुरू करण्याआधी त्याचे स्मरण करून कार्यसिद्धीसाठी त्याची प्रार्थना करतो.

आपण जे सगूण रुप नेहमी पहातो ; ते ॐ कारावर आधरित आहे व त्याचा उगम गणपतीअथर्वशीर्षा मधे आहे. ह्या सगूण रुपाचा अर्थ आपल्याला ज्ञानेश्वरी मधे तसेच अनंतराम रामदासी ह्यांच्या दासबोध प्रवेश ह्या पुस्तकांमधे वाचावयास मिळतो. ॐकार सगूण व अव्यक्ताला जोडणारा तसेच भगवंताचे नाम पण आपल्याला अव्यक्ताशी

जोडते. भगवंताचे अव्यक्त रूप हेच सगुणामगचे अधिष्ठान आहे हे लक्षांत घेणे महत्वाचे आहे.

***अशा ह्या भगवंताचे दर्शन घ्यायचे झाले तर आपल्याला अध्यात्माकडेच वळावे लागते हे देवदर्शन झाले की माणसाच्या सर्व दु:खाचे नेहमीकरता निरसन होते. .हाच मोक्ष होय. कसे ते आता थोडक्यांत पाहूया.***

सर्वसाधारणत: ईश्वराच्याकडे माणसे कां वळतात हे जर पहायचे झाले तर असे आढळते की दु:खनिवृत्ती हवी म्हणुन ईश्वराची आराधना केली जाते.

**आपल्याला अनेक प्रकारची दु:खे , ताप भोगायला लागतात. उदाहरणार्थ :-**

१) कठीण लवकर बरे न होणारे आजार . त्यातून लवकर बरे व्हावे म्हणुन लोक भक्ति कडे वळतात.

२) जेंव्हा एखादी घटना मनाप्रमाणे होत नाही तेंव्हा.

३) जवळची व्यक्ती मृत्यू पावते तेंव्हा .

४) कोणी आपला अपमान केला, रागावले तर.

५) ईतरांना होणारा ताप पाहिल्यावर होणारी चिंता की आपल्यावर तर अशी वेळ येणार नाही नां?

६) जुने गेलेले चांगले दिवस व त्यावेळच्या आठवणी आल्या की दु:ख होते.

जर यादीच करायचे ठरवले तर ही यादी कधीही न संपणारी होईल. ह्यातली कांही दु:खे शरीराला व कांही मनास होतात. मनामुळे शरीराला होणाऱ्या दुखा:ची जाणीव होते.

**ह्या व असल्या सर्व दुखा:तून आपल्यातल्या प्रत्येकाला मुक्ती म्हणजे निवृत्ती हवी**

**असते**. कांहीपासून आपल्याला तात्पुरती दुख:निवृत्ती मिळते. उदाहरणार्थ :- जर योग्य औषध घेतले तर आजार बरे होतात. पेनकिलर घेतले तर शरीरास होणारे दुख: जाणवत नाही. **मूळ कारण जोपर्यंत नष्ट होत नाही तोवर ही असली दुख:निवॄत्ती तात्पुरती असते**. पुढे कधीतरी पुन: आजार होतातच. हा आपला सर्वांचाच अनुभव आहे.

कारणाचा समूळ नाश करणे शक्य आहे कां ? ह्या प्रश्नावरचे उत्तर होय असेच आहे. ते म्हणजे " अज्ञानाचा नाश होणे " हे आहे. जेंव्हा अज्ञानाचा नाश होतो तेंव्हा ज्ञानोदय होतो. ह्यालाच आत्मज्ञान अशी संज्ञा अध्यात्मात आहे. असे आत्मज्ञान झाले की उरतो तो फक्त निखळ आनंद . ह्या स्थितीलाच मोक्ष हे पण नांव आहे. ह्या स्थितीपर्यंत जाणे हाच सर्व अध्यात्माचे ध्येय आहे.

तुकाराम महाराजांच्या ह्या अभंगामधे आपल्याला अज्ञानाची म्हणजेच दुख: होण्याची ची मूळ मुख्य लक्षणे ( कारणे ) महाराजांनी सांगितली आहेत. त्यावरून आपण काय करायचे ते सहजच समजते. व जो असे समजल्यावर योग्य ते आचरन करतो त्याचे मन शुद्ध होते व तो आत्मज्ञानासाठी पात्र होतो.

येथे हे पण लक्षांत घ्यायचे आहे की जोपर्यंत आपल्याला जन्म आहे तोवर दु:ख हे सोसावे लागणारच. म्हणुन जन्ममृत्यू चक्रामधून सुटका होणे महत्वाचे ठरते. जन्म घ्यावे लागतात ह्यचे कारण अज्ञान हेच आहे. व म्हणूनच महाराजांचा हा अभंग महत्वाचे मार्गदर्शन करणारा आहे.

जन्म येंण्याचे कारण म्हणजे आपल्या मनाची बाह्य सृष्टीतल्या वस्तूंची आसक्ती हेच आहे. आसक्तीचेच दुसरे नांव वासना. वासना अंत:करणात बीजरूपाने साठविल्या जातत

व त्यांची पूर्ती व्हावी म्हणून जीवाला शरीरधारणा करावी लागते. अर्थात जन्म झाल्याक्षणीच आपण अज्ञानाच्या वेढ्यात अडकतो.
ह्यातून सुटण्याचे दोन महत्वाचे मार्ग आहेत. १) ज्ञानमार्ग २) भक्तिमार्ग.

खालील प्रसिद्ध श्लोकामधे एक महत्वाचा मुद्द सांगितलेला आहे.
"आकाशात् पतितं तोयं , यथा गच्छति सागरं ; सर्वदेव नमस्कारान् केशवं प्रति गच्छति ""
श्लोकाच अर्थ हाच आहे की जसे आकाशातून पडलेले पाणी शेवटी सागरालाच जाऊन मिळते तसेच कोणत्याही देवाला केलेला नमस्कार शेवटी केशवालाच पोहोचतो.म्हणजेच कोणत्याही मार्गाने गेले तरी शेवटी भगवंताची भेट म्हणजे आत्मज्ञान होते.

भगवद्गीतेमधे भगवान श्रीकृष्ण हेच सांगतात की आत्मज्ञान झाल्याविना मुक्ती नाही.
श्रीमद् शंकराचार्य प्रसिद्ध "भजगोविंदम् स्तोत्राच्या शेवटच्या श्लोकान म्हणतात

**कुरुते गंगा सागरगमनम् । व्रतपरिपालन अथवा दानम् ।**
**ज्ञानविहिनं कर्ममनेन । मुक्तिर्नभवति जन्म शतेन ॥**

अर्थ:- माणसाने गंगेमधे स्नान केले , किंवा समुद्रस्नान केले, अथवा अनेक वेगवेगळी व्रते केली, दानधर्म केला तरी जर ज्ञान झाले नाही तर हे सर्व व्यर्थ आहे. शंभर किंवा जास्त जन्मभर जरी हे सर्व केले तरी आत्मज्ञानविना मुक्ती मिळणार नाही.आत्मज्ञान अर्थात ज्ञान होणे म्हणजे अज्ञानाचा समूळ नाश हॊणे होय.
म्हणुनच असे म्हणतात येते की ज्ञानमार्ग असो वा भक्तीमार्ग , मुख्यत: अज्ञानाचा नाश होणे महत्वाचे आहे.

अज्ञान म्हणजे काय ह्या प्रश्नाचे उत्तर समजणे आवश्यक आहे. त्यासाठी अज्ञानाची लक्षणे

समजणे हेच उत्तम. तसेच अज्ञानचा उगम कशामधे आहे तेही समजणे महत्वाचे ठरते. सर्व शास्त्रे, स्वनुभवी संत, वेदांत हेच सांगतो की " मीपणा , अहंकारामधे अज्ञानाचे मूळ आहे. मीपण जन्म होतक्षणीच प्रगट होतो व जीव स्वत:लाच कर्ता, भोक्ता समजू लागतो. तसेच त्याला हे दृश्य जगत व ह्या जगामधले सर्वकांही आपल्याला खरे सुख देणारे आहे असे वाटू लागते व त्यामुळे दृश्यावर जीवात्मा आसक्त होतो. असो.

***तुकाराम महाराजांचा हा अभंग ह्याच अज्ञानाच्या निरनिराळ्या रूपांचे स्पष्टीकरण करणारा आहे. एकदा कां आपल्याला हे समजले की मग पुढची कारवाई करणे सोपे जाते.***

ह्या पार्श्र्वभूमीवरून आता अभंगाचा अर्थ काय आहे ते पाहता येते व तोच भाग पुढे दिलेला आहे.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

**अभंगाच्या पहिल्या पंक्तीमधे** महाराज म्हणतात की

अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचियें चित्तिं बोध कैचा ॥ १॥

अज्ञानी माणसाला असे वाटते की पैसा, संपत्ती जवळ असेल तर सर्व सुखे मिळतील. परंतू खरेतर प्रत्येकाचा अनुभव ह्याच्या उलट असतो. भरपूर संपत्ति असल्यास माणूस आळशी होतो. मग स्वत:ला जी साधी कामे करता येतात ती सुद्धा नोकरचाकरांकडून करून घेतली जातात. ह्यामुळे सरतेशेवटी रोगांना आमंत्रण मिळते , दु:खच पदरात पडते.तसेच पैसा वापरून पंचेंद्रीयांच्या आनंद भोगाकडे प्रवृत्ती वाढतेव. पण प्रत्येकाचा हाच अनुभव आहे की कोणत्याही बाह्य वस्तूकडून शरीराला मिळालेले सुख क्षणीकच असते. असे सुख भोगल्यावर त्याची आठवण चित्तमधे साठविली जाते. नंतर कांही तरी निमित्तने ती उसळते व तेच सुख परत परत मिळावे असे वाटते. पण जसेजसे वय वाढते तशीतशी

शरीराची सुख भोगण्याची क्षमता कमीच होते. पण वासना उरतेच व अशा स्थितीत मृत्यू आला तर पुन: ती वासनापूर्ती व्हावी म्हणून जन्म घ्यावा लागतो. असे हे चक्र सतत चालूच रहाते. म्हणून महाराज म्हणताहेत की जर असे विचार असतील त्याला ज्ञान कसे मिळेल **?** अर्थातच मिळणार नाही

एकंदरीत असे म्हणता येते की जन्म होंणे हेच दु:खमय आहे. पुन:जन्म टाळंण्यासाठीच प्रयत्न करायला हवेत.

**अभंगाच्या दुसऱ्या व तिसऱ्या पंक्तीमधे** महाराज म्हणतात की

अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचियें ध्यानां देव कैंचा ॥ २ ॥
अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी ध्यान । निष्काम साधन तया कैंचें ॥ ३ ॥

येथे बरेच लोक पूजा पाठ कां करतात ह्यावर महाराजांची टिप्पणि आहे.अनेक अज्ञानी लोक आपल्याला पूजा पाठ होम हवन करताना आढळतात. कशासाठी**?** तर मला देवाने आयुष्य**,** आरोग्य**,** धनसंपत्ती ईत्यादी सर्व द्यावे म्हणुन. पूजेचा संकल्प हाच असतो. ह्यालाच कामिक भावनेने केलेली पूजा म्हटले आहे. तसेच अशी अज्ञानी मंडळी जे कांही कर्म करत असतात ते कर्म पण केलेल्या कर्माचे मनाप्रमाणे फळ मिळावे ह्याच उद्देशाने केले जाते. जर तसे फळ मिळाले तर आनंद होतो नाही मिळाले तर दु:ख होते.
**खरेतर पूजा ही भगवंतावरील प्रेमाने व्हायला हवी पण असा भाव असणारा एकादाच असतो**. सुरवातीला म्हटल्याप्रमाणे भगवंत सुद्धा पूजापाठाचे हवे ते फळ देतोच. पण असे फळ ईच्छिणे म्हणजे कल्पवृक्षाकडे कवड्या मागण्यासारखेच आहे. मग अशा माणसाला मुक्ती कशी मिळेल !अर्थातच मिळणार नाही.

पाँडेचरीच्या माताजींचे एक वचन आहे . माताजी म्हणतात की " प्रत्येक कर्म हे भगवंताची पूजा करतो आहे ह्या भावनेने करावे . मग साधे झाडण्याचे काम सुद्धा भगवंताची पूजाच होते व ते कर्म भगवंताजवळच नेणारे होते.”

हाच मुख्य मुद्दा वरच्या पंक्तिंमधे तुकाराम महाराजांनी सांगितला आहे.

**अभंगाच्या ४ थ्या पंक्तींमधे** महाराज म्हणताहेत की

अज्ञानाचें ज्ञान विषयांवरी ठेवी ध्यान । ब्रह्म सनतन तया कैंचें ॥ ४ ॥

अज्ञानी जन जगामधे कसे जगतात ते ह्या पंक्तिंमधे तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. अज्ञानी माणसाचे मन नेहमीच बाह्य सृष्टिमधून मिळणार्या ( पंचेंद्रियांच्या विषयांकडून मिळणार्या ) सुखाकडे लागलेले असते. डोळे दृष्टिसुख ( सुंदर दिसणारी वस्तू पाहिली की मिळणारे) मागतात, कान गोॅड गाणी व बोलणे मागतात, नाकाला सुगंध हव असतो, त्वचेला स्पर्शसुख हवे असते, रसनेला चवीचे खाणे पिणे हवे असते. ह्या सर्वांपासुन आनंद घेते ते मन. मन हे आपल्या " मीपणा" चाच एक भाग आहे पूर्वी मिळालेल्या आनंदाची आठवण आपल्या चित्तामधे असते ती कांही कारणाने उफाळून वर आली की मनाला तोच आनंद परत हवासा वाटतो.

सर्व हवे-नकोपण मनाचेच असते. हवीशी घटना घडली नाही, हवीशी वस्तू , भोग मिळाला नाही, मनासारखे झाले नाही की मग दु:ख होते. फार काय जुन्या आठवणिमुळे सुद्धा मन दु:खी, क्षुब्ध होते.

मृत्यूची भीती, असाध्य आजारांची भीती मनामुळेच आपण जाणतो. असो. लिहावे तेवढे कमीच असेल.

जर आपण जनावरे कशी जगतात हे पाहिले तर असे आढळते की त्यांना पण अन्न, झोप, भय व मैथून हेच व एवढेच समजते.

म्हणुनच एका सुभाषितकाराने म्हटले आहे की जर माणुस पण फक्त आहार, निद्रा, भय व मैथुन ह्याच्यासाठीच जगत असेल तर तो शिंगे नसलेला पशूच होय.

**थोडक्यांत असे म्हणता येईल की अज्ञानी व पशू यांच्यामधे फारसा फरक नसतो.**

म्हणुनच तुकाराम महाराज हेच सांगताहेत की अशारीतीने जगणार्या माणसाला कधीच मोक्ष

मिळणार नाही. ह्याचाच अर्थ हा की तो जन्म-मृत्यूच्या चक्रामधेच भटकत राहील.

**अभंगाचा शेवटचाचरण खालील प्रमाणे आहे.**

तुका म्हणे जळो ऐशियाचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥ ५॥

पण बरीच मंडळी हे सर्व थोतांड आहे वगैरे सांगून लोकांचा बुद्धीभेद करतात. अशा रीतीनेव अज्ञानाचे महत्व वाढवणार्या अशा लोकांचे तोंड जळॊ असे उद्गार अभंगाच्या शेवटी महाराजांनी काढले आहेत. ह्याचे कारन हेच आहे की संतांना असेच वाटते की प्रत्येकाने आपल्या नरजन्माचे सार्थक मोक्षासाठी योग्य ते प्रयत्न करून घ्यावे. मोक्षानेच सर्व दु:खातून सुटका आहे.

**अभंगाची शिकवण:-**

आतापर्यंतच्या विवरणावरून हे स्पष्टच आहे की बाह्यसृष्टिमधील कोणतीही वस्तू आपल्याला न संपणारा आनंद देऊ शकत नाही. प्रत्येक वस्तू नाशवंतच आह म्हणुन अशा वस्तूपासून मिळनारा आनंद पण क्षणीक म्हणजे नाशवंतच असतो.

तसेच मनाच्या हवे-नकोपणा च्या स्वभावामुळे आपण अज्ञानाच्या अंमलाखाली येतो व हे अत्यंत न-कळत घडत असते. अर्थात आपण मनाच्या आधिपत्याखाली असल्याने हे सर्व घडते. म्हणून ह्यातून बाहेर यायचा उपायच करणे आवश्यक आहे.

सर्व संतांनी एक उपाय सांगितला आहे तो खालील प्रमाणे.

उपाय म्हणजे भगवंताची भक्ती करणे . त्यासाठी खाली लिहिल्याप्रमाणे आचरण ठेवावे लागेल.

१) हे समजून घ्यायचे की फक्त भगवंतच शाश्वत खरा आहे. बाकी सर्व( धन, संपत्ती, बयको,मुलेबाळे , मित्र घरदार ईत्यादी ) अशाश्वत आहे. म्हणुन ह्या अशाश्वताची आसक्ती ठेवायची नाही.

**आसक्ती मधे अपेक्षा असतात. प्रेमामधे अपेक्षा नसतात. म्हणून सर्वांवर निरपेक्ष प्रेम**

**असावे, आसक्ती नसावी.**

२) करीत असलेली प्रत्येक क्रिया ही भगवंताची पूजा आहे ह्या भावनेने करावी.

३) नेहमी लक्षांत ठेवावे की कर्ता व करविता, तसेच भोक्ता पण मी नव्हेतर भगवंतच आहे.

हे सर्व एकदम जमणारे नाही पण प्रयत्न करणे आपल्याच हाती नक्कीच आहे.
मला वाटते की हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.

ॐ

*******************

# भाग ६-१ ला

## उपदेशपर अभंग



अज्ञानी माणसाला ( अशा माणसाला नरजन्माचे महत्व व उद्देश माहीत नसते.) त्याने जागे व्हाव (उपदेश ऐकल्याने माणसाचे मुमुक्षूत्व जागे व्हावे) म्हणुन केलेले उपदेशपर अभंग ह्या भागामधे घेतलेले आहेत.

**अभंग १ ला :- अनुतापाचा अभंग**

आयुष्य गेले वायांविण । थोर झाली नागवण ॥ १॥
आंता धावाधाव करी । काय पाहातोसी हरी ॥ २॥
माझे तुझीं याचि गती । दिवस गेले तोंड माती ॥ ३॥
मन वाव घेऊं नेदी । बुडवुं पाह्व भवनदी ॥ ४ ॥
पडिला विषयाचा घाला । तेणें नागविले मला ॥ ५॥
शरण आलों आतांधावें । तुका म्हणें मज पावें ॥ ६॥

**अभंगाच शब्दार्थ :-**

( तुझे) आतापर्यंतचे सर्व आयुष्य वाया गेले व त्यामुळे फार मोठे नुकसान झाले ॥१।

आता धावाधाव कर्ण्याचा व हरीला पाहण्याची ईच्छा होऊन काय उपयोग आहे?॥२॥

तुझे-माझे करण्यात असे सर्व दिवस गेले. तोंडात मातीच आली॥३॥

मनाला विचारच करता आला नाही कारण भवनदी ( तुला) बुडवण्याचा प्रयत्न करते आहे}}४॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी माहिती वा भूमिका :-**

*ह्या अभंगाचा अर्थ समजण्या साठी इतर कांहीच माहिती ईत्यादी आवश्यक नाही.*

*अभंगाचा अर्थ :-*

मुख्यत: तीन प्रकारचे ताप झाले की मनुष्य निराश होतो घाबरून जातो. अशावेळी ह्या अभंगामधे मांडलेले विचार अशा माणसाच्या मनामधे सतत येतात. तसेच पश्चातापाची भावना पुर्वपुण्याई असेल तर मनामधे उदय पावते.

१) जेंव्हा जीवनामधे कठीण प्रसंग जसे असाध्य वा भयानक आजारपण येणे, कुत्रा चावणे ,

२) कोणाकडून फसवणूक होणे इत्यादी येतात तेंव्हा माणुस निराश होतो.घाबरतो.
३) जेंव्हा म्हातारपण येते व आता फार वेळ उरलेला नाही ही जाणीव होते. इंद्रिये विकल
होत आहेत हे लक्षांत येते तेंव्हा.
४) जेंव्हा हे लक्षांत येते की भगवंतच आपल्याला वाचवू शकतो ईतर कोणाचाही उपयोग नाही.

ह्या साठी हा अभंग काय सांगतो ते पाहूया.

अभंगामधे म्हटल्याप्रमाणे :-

**१ला चरण हा विचार सांगतो की :- आपण आपण आपले सर्व आयुष्य व्यर्थ घालवलेले आहे.**

**३रे चरणामधे अशा माणसाला समजलेला विचार येतो.** :- हा विचार म्हणजे " आपले सर्व आयुष्य मी-माझे तुझे ह्यात, फक्त पंचेंद्रियांच्या मागण्या पूर्ण करण्यांत ( असे समजून की त्यातूनच आनंद मिळतो आहे) घालवले. पण हा आनंद तात्पुरताच होता. आपण स्वत:च्या स्वार्थापुढे दुसर्याला होणार्या दु:खाविषयी बेपर्वाच होतो. म्हणुनच आता जेंव्हा मदतीची गरज आहे तेंव्हा कोणीही मदतीला धावत नाहीये."

**४थ्या व ५ व्या चरणामधे मनात आलेल्या पश्चातापाचे वर्णन आहे :-** आपण सर्व आयुष्य इंद्रियांच्या द्वारे मिळणार्या क्षणभंगूर सुखासाठीच वेचले. आपल्या सध्याच्या वाईट स्थितिला आपण स्वत:च कारणी भूत आहोत. ईतर कोणालाच ह्यासाठी दोषी धरता येत नाही . ही भवनदी मला बुडवते आहे.

**२ रा व ६व्या चरणांधे तुकाराम महाराजांनी अशा पश्चातापाने होरपळलेल्या जीवाची भूमिला घेतली आहे व भगवंताची प्रार्थना केलेली आहे.**

महाराज म्हणतात की हे भगवंता आता मी तुला शरण आलेलो आहे. फक्त तूच मला जन्ममरणाच्या दुष्टचक्रामधून वाचवी शकतोस. कृपा कर व मला तार.

**अभंगाची शिकवण :-**

शिकवण अगदी सरळ व सोपी आहे ती म्हणजे हा अभंग आपण स्वत:च्या जीवनशैलीची तपासणी करण्यास उद्युक्त करणारा आहे.

***सर्व संतांनी सांगितल्याप्रमाणे आपल्या नरजन्माचे मुख्य ध्येय म्हणजे भगवंताची भेट घेणे अर्थात मोक्ष हेच आहे. हे आपण विसरलों कां ? हे तपासून मग योग्य ती उपाय योजना करा . हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.***

ॐ

*************

**अभंग १ ला :-जागे व्हा व नरजन्माची संधी व्यर्थ घालवू नका**

बहुतां जन्मां अंती जन्मलासी नरा । देव तूं सोयरा करीं आतां ॥ १ ॥
करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ सांडीं आतां ॥ २॥
सांडीं आतां कुडी कल्पनेचि वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥ ३॥
पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पहावें विटेवरी ॥ ४॥
विटेवरी नीट आनंदाचा कंद । तुका नाचें छंदे नामघोषे ॥ ५ ॥

**अभंग २ रा :- अजून मृत्यू आला नाही तरी वेळ वाया घालवू नये**

बरे झाले आजिवरी । नाही पडलो मृत्यूचे आहारी ।

वांचोन आलो एथवरी । उरले ते हरी तुम्हां समर्पण ॥ १ ॥
दिला या काळे अवकाश । नाही पावलॊ आयुष्यनाश ।
कार्याकारण उरले शेष । गेलें भूस जावो परतें ॥ २॥
बुडणे कोठे पावता थडी । स्वप्नामाजी ओढाओढी ।
नासली जागृतिची घडी । साच जोडी शेवटी गोड घास ॥ ३ ॥
तुम्हासी पावविली हांक । तेणे निरसला धाक ।
तुमचे भाते हे कवतुक । जे शरणागत लोक रक्षावे ॥ ४ ॥
रवीच्या नांवे निशीचा नाश । उदय होतांची प्रकाश ।
आतां कैचा आम्हा दोष । तू जगदीश कैवारी ।\ ५ ॥
आतां जळो देह सुख दंभ मान । न करी तयाचें साधन ।
तूं जगदीश नारायण । आलो शरण तुका म्हणें ॥ ६ ॥

**अभंगांचा शब्दार्थ :-**

**अभंग १ ला:-**

**अनेक जन्मांनंतर आता तुला माणसाचा जन्म मिळाला आहे.आता देवाशीच नाते जोड॥१॥**
**बाबारे आता स्वत:च्या खरा स्वार्थ साधव जो अनर्थ घडविलास त्यातून बाहेर ये ॥२॥**
**सर्व वाईट कल्पना करणे सोडा व पंढरीचा माग नीट धरा ॥ ३॥**
**पंढरीला माणसाने जावे व विटेवर उभे असलेले पांडुरंगाचे रूप पाहण्याचे सुख घ्यावे॥४॥**
**विटेवर आनंदाचा साठा उभा आहे , त्याचे नामस्मरण करत तुका आनंदाने नाचतो आहे ॥५॥**

**अभंग २ रा:-**

**हे हरी., हे बरे झालेकी आज्ग्न पर्यंत मी मृत्यूच्या हाती सापडलेलो नाही. आता उरलेले आयुष्य़ तुम्हाला समर्पण. काळाने मला वेळ दिल्यामुळे आजपर्यंतचे आयुष्य व्यर्थ गेले ते जावॊ. पन आत उरलेले जे आहे ते नीट वापरून मी माझे ध्येय साधून घेईन.कोणी एखादा पाण्यात पडल्यावर सुखरूप तीरास लागला की त्याचे बुडणे खोते ठरते. तसेच स्वप्नामधे अनेक प्रकारचे झालेले दु:ख जागे झाले की नष्ट हूते. किंवा जेवणाच्या शेवटि गोड घास खायला मिळाला की आनंद होतो. तसा आत मला तुझ्या भेटिचा आनंद होतो आहे. मी तुला हांक मारली व तू धावून माझे रक्षण**

**केले वत्यामुळे माझी भिती नाहिशी झाली.असे कौतुक करण्यासारखे तुमचे कार्य आहे.सूर्योदयाबरोबर अंधाराचा नाश होतो तसे तुजर आम्हाला साह्यकर्ता झालास तर आमचे सर्व दोष नष्ट होतात.तुका म्हणतो की हे नारायणा तूच ह्या जगाचा स्वामी आहेस, मी तुला शरण आलेलो आहे.आता देहाशी जोडलेल्या मान दंभ ईत्यादि उपचारांमुळे जे सुख मिळते त्याला आग लागो. मी ते मिळविळयाचा मुळीच प्रयत्न करणार नाही.**

**अभंगाच्या मागची पार्श्वभूमी :-**

हे दोन्ही अभंग तुकाराम गाथेच्या अगदी शेवटी शेवटी वाचायला मिळतात. हे वाचले की लक्षांत येते की महाराजांनी आपल्यासारख्यांच्या उद्धारासाठीच तळमळीने हा उपदेश सांगितला आहे. पण महाराज स्वत:कडे मी कोणी मोठा ज्ञानी आहे अशी भूमीका न घेता स्वता:लाच हे सांगत आहेत. पण आपण जाणतोच की महाराज ब्रह्मज्ञानीच होते . असे संत जन्ममृत्त्यातीत असतात. पण जगामधल्यांचा दुख:परिहार व्हावा हीच त्यांची ईच्छा असते. त्यांच्या ब्रह्मज्ञानानंतर आलेल्या अनुभवाचे वर्णन करणार्या " अणूरेणीया हा चरण असलेल्या अभंगामधे महाराजांनी स्पष्टच उल्लेख केला आहे की ते स्वत: जरी जन्ममृत्यातीत झाले आहेत तरीही जगावर म्हणजेच आपल्या सारख्यांचा उद्धार व्हावा म्हणून ते फक्त " उपकारापुरतेच आता उरले आहेत".

**पहिला अभंग** आपल्याला आठवण करून देतो आहे की आपल्याला अत्यंत दुर्लभ असा हा नरदेह मिळालेला आहे. नरदेहाचे वैशिष्ठ्य हेच आहे की फक्त नरदेहामधेच जीवाला विचार करून योग्य अयोग्य काय ते ठरविण्याचे स्वातंत्र्य आहे.तसे पाहिले तर सर्वच प्राणी " आहार , निद्रा, मृत्यूभय, व मैथून " ह्यामधे सर्व जीवन काळ घालवतात.

**येथे श्री समर्थांची एक ओवी आठवते ती म्हणजे**

**देह परमार्थी लाविलें । तरीच याचें सार्थ जालें । नाही तरी हें व्यर्थचि गेलें। नाना आघातें मृत्यपंथे ॥**

पण फक्त मनुष्यच " सुखदु:खाचे कारणे कोणती ? आपण शाश्वत टिकणारे सुख मिळवू शकतो काय ? आपला निर्माता कोण आहे? त्याचा व माझा काय संबंध आहे ? मला अमरत्व मिळवता येईल काय ? कसे? ईत्यादी प्रश्नांवर विचार करू शकतो. असे विचार करणे म्हणजेच अध्यात्म-विचार करणेअर्थात देह परमार्थी लावणे होय.

ह्या प्रश्नांची उत्तरे भगवंताने गीते द्वारा दिलीच आहेत. उपनिषदांचे( वेदांताचे) अत्यंत जुने वाङ्मय पण ह्या प्रश्नांचीच उत्तरे सांगतात. व ह्याशिवाय आपल्या संतांनीही ह्यावरचे मार्गदर्शन " गाथा, दासबोध, ज्ञानेश्वरी, भागवत ईत्यादी ग्रंथांद्वारे केलेले आहे.

म्हणूनच अशा ग्रंथांचे वाचन करून , त्यात जे सांगितले आहे तसे वागून आपण आपला उद्धार करू शकतो. आता आपल्या पैकी बरेच जण सत्तरीला आलेलो आहोत. मग उशीर झाला की काय असे वाटण्याची पण शक्यता आहे. आहे. **दुसऱ्या अभंगामधे** तुकाराम महाराज आपल्याला दिलासा देताहेत की कांही हरकत नाही. अजूनही वेळ हाती आहे व त्याचा सदूपयोग करता येईल.

**आता आपल्याला ह्या दोन अभंगाचा विचार करून अर्थ पाहता येतो.**

**दोन्ही अभंगांच्या अर्थाचे स्पष्टीकरण** :-

**१) पहिल्या अभंगाचे अर्थस्पष्टीकरण**

प्रस्तावनेमधे आपण पाहिलेच की नरजन्म किती महत्वाचा आहे. महाराज म्हणताहेत की अरेबाबा, तुला हा नरदेह अनेक योनिंमधे फिरून आल्यावर मिळालेला आहे. आता एकच काम

कर व ते म्हणजे भगवंताशी नाते जोड. त्याला आपलेसे कर. ( ह्यासाठीच शास्त्रांमधे मवविधा भक्ती सांगितल्या आहेत. ) हे नाते जोडायचे तर तुला एकच गोष्ट करावी लागेल. ती म्हणजे कांही अशा कल्पना तू धरून बसला आहेस त्यांचा त्याग कर.
मुख्यत: ह्या कल्पना म्हणजे १) वित्तेषणा ( धन-पैसा असला की सर्व सुखे मिळतील असे वाटणे व म्हणून पैसे कमविण्यासाठीच सर्व आयुष्य खर्च करणे ). २) दारेषणा पुरुषाला वाटणारे स्त्रीसुखाचे आकर्षण व स्त्रीला वाटणारे पुरुषसुखाचे आकर्षण ) ह्यामुळेच वंशवृद्धी होते व तेही आवश्यकच आहे. पण कांही वयानंतर ही ईषणा असणे अयोग्य असेच आपली शास्त्रे सांगतात.
३) लोकेषणा :- प्रसिद्धीची हांव. ही ईषणा प्रत्येक शिकलेल्या व्यक्तीला असू शकते.

ह्या सारख्या ईषणा माणसाच्या वासना वाढ्वतात व जर मरेतेवेळी एखादी वासना शिल्लक असेल तर त्या वासनेप्रमाणे जन्म येतो. उदाहरणार्थ दारेषणेमुळे कुत्र्याचा जन्म येण्याची शक्यताच जास्त असेल.
भागवतामधे हरीणाच्या वासनेत गुंतल्यामुळे जडभरताला हरीणाचा जन्म ह्यावा लागला ही कथा आहे.

***परंतू जर मला फक्त भगवंताच्या भेटीचीच वासना असेल तर काय होईल? उत्तर सोपे आहे. भगवंत हा जन्ममृत्यातीत आहे. म्हणजेच अशी त्याच्या भेटीची वासना मला मोक्षच देणारी असाणारीच आहे.***

**अभंगात तुकाराम महाराज हेच सांगताहेत की अशी वासना आता मनामधे यायला हवी व म्हणुन आता पंढरीची वाट धरा अर्थात सगूण भगवंताच्या स्मरणाची स्वत:ला सवय लावा.** त्याचे स्मरण हेच आनंदाचा मुख्य स्त्रोत आहे. महाराज स्वता:चेच उदाहरण देऊन सांगताहेत की मला जसा पांडुरंगाच्याच नामस्मरणाचा छंद लागला आहे तसा तुम्ही स्वत:ला नामस्मरणाचा छंद लावून घ्या.

ह्या पुढचा दुसरा अभंग आपणा सर्वांनाच असा दिलासा देतो आहे की जरी आतापर्यंत आपण कांहिहि साधना जसे नामस्मरण केले नसले तरीपण हरकत नसावी. जन्म व्यर्थ गेला की काय अशी चिंता करू नये. घाबरून जाऊ नये.

**अभंग २ चे अर्थस्पष्टीकरण :-**
अभंगाच्या १ व २ ह्या कडव्यांमधे महाराज म्हणताहेत की : हे हरी हे बरे झाले की मला अजून मृत्यू आलेला नाही. येथपर्यंत म्रुत्यू पासून वाचलो हे फार बरे झाले. आता जे कांही आयुष्य उरले आहे ते मी तुम्हाला समर्पण करतो आहे.

( ही काळाचीच कृपा आहे की ) आजपर्यंत काळाने मला अवसर दिला आहे. त्यामुळे माझ्या आयुष्याचा नाश झालेला नाही. आत जे पूर्वी मी घालवले ते आयुष्य्र जरी फोलपटाप्रमाणे व्यर्थ गेले तर जाऊ दे. निदान आता तरी मी बाकी उरलेले आयुष्य आहे त्याचा योग्य उपयोग करेन. व मला जे काय साधायचे आहे ते साधून घेईन.

जो योग्य प्रयत्न करून ह्याच देहामधे मुक्ती मिळवतो त्याला पुढचा जन्म कसा येईल ह्याची काळजी करण्याची खरे तर आवश्यकतच रहाणार नाही. भागवतामधे वर्णन आहे की परीक्षितराजाला ७ दिवस भागवताऐकूनच मुक्ती मिळाली. आपल्या जवळ नक्कीच सात दिवसांपेक्षा जास्त वेळ आहे. तो व्यर्थ घालवायचा नाही एवढे समजले की पुरे होते.

मागच्या अनेक अभंगांच्या विवरणातून एक मुद्द स्पष्ट होतो की जो माणूस फक्त देहसुखाच्याच मागे धावत असतो त्याला अनेक जन्म घ्यावे लागतात. कारण एका वासने-पूर्ती नंतर मिळालेल्या भोगांची आठवण रहाते. ह्या आठवणीलाच वासनेचे बीज-रूप होणे म्हणताता

येते. कधी कधी असे बीज ह्याच जन्मी फळाला येते. कधीकधी तसेच रहाते व त्यामुळे व पुढच्या जन्माची तयारी नकळत होते. ह्या वासना अनेक प्रकारच्या असता, उदाहरणार्थ :-

शरीरसुखाबद्दलच्या, उत्तमोत्तम खायला मिळावे, घरदारा असावे, मान कीर्ती मिळावी , सूड घ्यावा , बदला घ्यावा अशा वासना, संपत्ती मिळावी, सर्व जग पहावे अशा वासना, ; इत्यादी. यादी जेवढी करावी तेवधी लांबतच जाईल.

पण जर माणूस ह्या अज्ञाननिद्रेतून जागा झाला व त्याला कळले की फक्त भगवंताची भेट होण्यातच खरे जीवन सार्थक आहे तसेच त्याला हे पण कळते की सर्व मानपान वगैरे तात्पुरतेच असतात. कांहीकाळानंतर ते सर्व विसरले जातात. त्यांच्यापासून मिळणारा आनंद वा दु:ख ही पण तात्पुरती अर्थात नाशवंतच असतात.

म्हणुनच खरा भक्त ह्या सर्वांची तमा बाळगत नाही. हाच मुद्दा अभंगाच्या शेवटच्या कडव्यामधील "आता देहासंबंधीचे जे मान-दंभ ईत्यादी अपचार आहेत व त्यांच्यामुळे मिळणारे सुख आहे त्याला आग लागो ! मी ते मिळावे म्हणून प्रयत्न करणार नाही "ह्या चरणांमधे आलेला आहे.

ह्या जागे होण्याबद्दल उद्‌गार अभंगाच्या ३ कडव्यामधे दृष्टांत देऊन सांगितले आहेत. .
येथे तुकाराम महाराज म्हणतात की

१) जसा कोणी एखादा पाण्यात पडून बुडला पण नंतर तो किनाîrÉÉ ला लागला की त्याचे बुडणे खॊटे ठरते, किंवा

२) स्वप्नामधे जर दु:ख झाले , ते दु:ख जागे झाल्यावर शिल्लक रहात नाही,

३) जेवताना शेवटचा घास जर गॊड असेल तर मग आधी खाल्लेल्या अन्नाची चव उरत नाही;

***तसेच एकदा कां भगवंताच्याभेटीचे सुख मिळाले की बाकीची सर्व सुखे मिळमिळीत होतात. त्यांची आसक्ती रहात नाही. म्हणून भगवंत भेटीची तळमळ लागणे हेच खरे जागे होणे होय.***

असा जागा झालेला माणुस सतत भगवंताच्याच स्मरणात असतो. त्याचे भगवंताशी प्रेमाचे नाते जुळते. ह्या नात्याचे स्वरूप कधी मैत्रीचे ( अर्जून व कृष्णाचे ) , दासाचे ( समर्थ रामदास ) , पती-पत्नी चे ( मीराबाईंचे ) , घरमालक व चाकराचे ( एकनाथहाराज व श्रीखंड्याचे ) असे असते.

असे नाते जडले की भगवंत अशा भक्ताचा योगक्षेम वहातो. शरणागत भक्तांचे रक्षण करणे असे भगवंताचे कौतुक आहे

महाराज तर म्हणताहेत की जरी भक्तामधे कांही दोष असले तरी पण सुर्याचा उदय झाल्यावर जसा अंधाराचा नाश होतो ; तसेच एकदा कां भगवंताशी नाते जुळले की सर्व दोषांचे निरसन होते.

ह्या स्वानुभवाच्या जोरावरच महाराज अभंगात सांगतात की हे भगवंता ,मी हांक दिल्याबरोबर तुम्ही धावून आलात व माझे संकटामधे तुम्ही रक्षण केले आहे. मी तुम्हाला शरण आलो आहे.

**अभंगाची शिकवण** :-

थोडक्यात अशी शरणागती साधणे व नामस्मरण करणे हे दोन उपाय ह्या अभंगांद्वारे आपल्या सर्वांनाच ह्या मनुष्य जीवनाचे सार्थक करण्यासाठी तुकाराम महाराजांनी सांगितले आहेत.

ह्यासाठी समर्थ म्हणतात तसे “**संसार त्याग न करितां ।प्रपंच उपाधी न सांडितां । जनामधे सार्थकता । विचारेची होये ॥**

येथे विचार म्हणजे विवेकाने खालील प्रमाणे आचरण करणे होय.भगवंता विषयी अनन्य भाव ठेवून जगामधे वावरणे. त्यासाठी

१) जमेल तेवढे वाचेने सतत भगवंताचे नाम जसे " श्रीराम, ॐ नम: शिवाय ईत्यादि घेणे.

२) भगवंतच सर्व कर्ता-करविता आहे हे ध्यान मधे ठेवून आपल्याकडे जे काम येते ते त्याचीच पूजा करतो आहे ह्या भावनेने नीटपणे करणे.

३) तसेच ह्या जगामधे जे जे कांही आहे उदाहरणार्थ आपल्याजवळ असलेली संपत्ति, आपली मुलेबाळे , घरदार ईत्यादी सर्वकांही , त्याचा खरा स्वामी भगवंतच आहे हे समजून रहाणे, समाधानी वृत्ती ठेवणे.

४) भगवंत सर्वभूती आहे हे समजून प्रत्येकाबरोबर प्रेमाने ,नीती न्यायाचा व्यवहार करणे.,

**असा अर्थ आपण घेऊन जर स्वत:ची वागणूक ठेवावी ,तर मग आपोआपच जन्मसार्थक होईल हीच शिकवण येथे आहे असे मला वाटते.**

ॐ

**************

**अभंग :- काळ कोणासाठी थांबत नाही तरी त्वरा करून जन्मसार्थक करावे.**

आयुष्य मोजावया बैसला मापारी। तूं कां रे वेव्हारी संसाराच्या ॥ १॥
नेईल ऒढोनी ठाऊकें नसतां । न राहे दुश्चित्ता हरिविण ॥ २ ॥
कठीण हें दु:ख यम जाचतील । कोण सोडविल तये ठायीं ॥ ३॥
राहतील दुरी सज्जन सोयरिं । आठवीं श्रीहरी लवलाही ॥ ४॥
तुका म्हणें किती करशील लंडाई । होईल भंडाई पुढें थोर ॥ ५॥

**अभंगाचा शब्दार्थ** :-

अरे, तुझें आयुष्य मोजण्याकरता काळ स्वत:च मापाड्या म्हणजे मोजणारा होऊन बसला आहे, असें असूनही तू ह्या संसाराच्या व्यवहाराच्या मागे काय लागला आहेस ! ॥ १॥

तुला न कळताच तो तुला घेऊन जाईल, म्हणुन तू आता हरिचिंतनावांचून दुश्चित्त राहू नकोस ॥ २॥

तुझ्याकडुन झालेल्या पापकर्माबद्दल यम तुला मोठी शिक्षा करेल, ते दु:ख फार मोठे कठीण असते. त्या दु:खापासून तुला कोण सोडवेल ? ॥ ३॥

तुझे सगेसोयरे मित्र नातेवाईक त्यावेळेला सर्व दूर होतील. याकरता त्वरा कर व हरीचिंतन कर ॥ ४॥

तुका म्हणतो की आता किती दांडगाई करशील?; असे वागशील तर शेवटी तुझेच नुकसान होईल.॥५

**अभंगाच्या मागची भूमिका :-**

गीतेच्या ८ व्या अध्यायामधे भगवंताने मृत्यूबद्दल खोल विचार मांडलेले आहेत. नचिकेताने पण छांदोग्य उपनिषदामधे मृत्यूविषयी यमराजाला प्रश्न विचारलेला आहे.

सर्व संतांचे सांगणे हेच आहे की जीव व्यक्त दशेला येतो तो जन्म व अव्यक्तात परत जातो तो मृत्यू. हे त्याचे जाणेयेणे जीवाला जोवर मुक्ती मिळत नाही तोपर्यंत चालू असते. ह्या व निरनिराळया जन्मांमधे दु:खच जास्त भोगावे लागते.आनंदाचा काळ फार थोड्या वेळाचा असतो.फक्त मानव जन्मातच ह्या दुष्टचक्रामधून सुटण्याकरता प्रयत्न करता येतात. **परंतू माणसाला दैनंदिन जीवनांत अविद्येच्या प्रभावामुळे मृत्यूचे स्मरण राहात नाही**.अटळ मृत्यू , कधी येईल हे कोणालाच कळत नाही. म्हणून वेळ वाया न घालविता योग्य प्रयत्न करणेच महत्वाचे आहे. हेच समजावणारा हा तुकाराम महाराजांचा उपदेशपर अभंग आहे .

**अभंगाच्या अर्थाचे थोडक्यांत स्पष्टीकरण:-**

***तुकाराम महाराज अभंगाच्या पहिल्या व दुसîrÉÉ चरणामधे*** एक प्रश्न विचारून आपल्याला

जागे करीत आहेत. महाराज म्हणताहेत की अरे बाबा, काळ तुझे आयुष्य मोजतोच आहे हे तुला माहीत आहेना?, मग तरीही आपले स्वहित साधण्याचे सोडुन तू संसाराच्या व्यर्थ व्यवहारामधे कां गुंतला आहेस? यम तुला केंव्हाही घेऊन जाईल. म्हणुनच ईश्वराला विसरण्याचा दुश्चित्तपणा करू नकोस.

येथे एखादा म्हणेल की जर मी संसाराकडे लक्ष दिले नाही तर मला अनेक दु:खांना तोंड द्यावे लागेल. मग मी ईश्वराला केंव्हा आठवू? वेळच खरेतर पुरत नाही आहे. आपल्यापैकी सर्वांनाच हा प्रश्न विचारावासा वाटतो व असे वाटते की संत सांगतात ते चूक तर नसेल? आपल्याला सध्यातरी तसे वागणे कठीणच आहे असेच बहुतेक सर्वांना वाटते.

ह्या समस्येवर तोडगा कोणता ह्याचे उत्तर तुकाराम महाराजांनी **" ईश्वराला विसरण्याचा दुश्चित्तपणा करू नकोस "** असेच दिलेले आहे व ते अभंगाच्या पहिल्या चरणामधेच आलेले आहे.

**हे दुश्चित्तपण टाळणे कसे शक्य आहे त्याचे सोपे मार्गदर्शन दासबोधामधे आढळते**. (तुकाराम महाराजांचे पण असे अभंग आहेत.) येथे आधी इतर कांही संत काय सांगतात ते पाहणे योग्य ठरेल.
उदाहरणार्थ कांही संताची वचने पाहूया.

**१) शंकराचार्य** :- **"भजगोविंदम् "**हे स्तोत्रच ह्यासाठी श्रीमद् शंकराचार्यांनी सांगितले आहे. चिन्मय मिशनचे ह्या स्तोत्रावर विवरणपर पुस्तकच आहे. स्तोत्रातला एकच श्लोक वानगीदाखल खाली देतो आहे.
.बालस्थावत् क्रीडसक्त: तरूणस्थावत् तरूणी रक्त: वृद्धस्थावत् चिंतामग्न: परे ब्रह्मणी कोपि न लग्न:||

२) **कबीरांचा ह्याच अर्थाचा दोहा आहे**

बचपन बीता खेलखेलमें भरि जवानी सोया ! । देख बुढापा सोचे अब तू क्या पाया क्या खोया?||

देर नही है अब भी बंदे ; ले ले उसका नाम रे । बोलो राम बोलो राम बोलो राम राम राम ॥

३)**समर्थ रामदासांनी** दासबोधामधे " स्वगुणपरीक्षा निरूपण " नांवाचे चार सलग समास सांगितले आहेत. त्यामधे सर्वसामान्य माणूस आपले जीवन कसे व्यर्थ घालवतो ह्याचे वर्णन आहे.

किंवा **रामदासांचे खालील दोन श्लोक पाहता येतील..**

मना पाहतां सत्य हे मृत्यूभूमी । जितां बोलती सर्वही जीव मी मी ॥
चिरंजीव हे सर्वही मानिताती। अकस्मात सांडूनिया सर्व जाती ॥ श्लोक १५ वा॥
मना सांग पां रावणा काय जालें । अकस्मात तें राज्य सर्वे बुडालें॥
म्हणोनी कुडी वासना सांडि वेगी । बळें लागला काळ हा पाठिलागी ॥ श्लोक १४ वा॥

**सर्वांचे सांगणे हेच की दुश्चित्त पणे आयुष्य व्यर्थ दवडू नका** (दुश्चित्त पणे वागणे म्हणजे ईश्वराचे स्मरण न ठेवता जीवन जगणे.)

**. हे कसे साधायचे त्यावर दासबोधामधे नामस्मरण समासामधे समर्थ रामदास स्वामीचे मार्गदर्शन करताना** म्हणतात की

**“कांहीच न करूनि प्राणी । रामनाम जपे वाणी । तेणें संतुष्ट चक्रपाणी । भक्तांलागी सांभाळी ॥"**

***कांहीच न करणें म्हणजे "मी कर्ता, मी भोक्ता ह्या भावनेला रजा देणे होय".*** गीतेमधे अशा वागण्याला निष्काम कर्मयोग असे म्हणले आहे. आपण जर स्वत:च्याच आयुष्यातल्या

घटनांकडे **खरा कर्ता कोण होता ह्या दृष्टीने पाहीले** ***तर भगवंतच खरा कर्ता करविता आहे*** हे सहज लक्षांत येऊ शकते. हेच सतत लक्षांत राहाण्यासाठीच भगवंताचे स्मरण करत रहायचे ही सोपी युक्ती संतांनी सांगितली आहे.

अभंगाच्या **तिसऱ्या चरणामधे** महाराज सांगताहेत की जर तू असे केले नाहीस तर तेच सर्वांत मोठे पाप करणे आहे. या पापाची शिक्षा तुला यम देईलच ह्यात संशयच नाही. **ही शिक्षा म्हणजे पुन: जन्म पुन: दु:खे भोगणे . ह्या शिक्षेचा काळ जन्मोजन्म चालत राहणारा असल्याने हीच सर्वांत भयंकर शिक्षा आहे असेच म्हणता येते.**

**अभंगाचा ४ था चरण** हेच सांगतो की जेंव्हा मृत्यु येतो तेंव्हा त्यावेळी बायको, मुले वा ईतर कोणीही नातेवाईक, मित्र, सगे सोयरे मदत करू शकत नाहीत. **जशी वासना असेल तसाच पुढचा जन्म ती वासना भोगण्यासाठी येतो.** जर फक्त ईश्वराच्या भेटीची वासना असेल तर मात्र मग अशा व्यक्तीने शेवटचा क्षण गोड केला असेच म्हणता येते, ह्या ईश्वरभेटिच्या वासने मुळेच मुक्ती मिळू शकते हे सहज समजण्यासारखे आहे.

**ह्यानंतर अभंगाच्या ५व्या ( शेवटच्या ) चरणामधे** तुकाराम महाराजांनी दांडगाईने वागणे म्हणजे भगवंतास विसरून वागणे सोडा असे सांगितले आहे व हाच ईशारा दिला आहे की असे वागणे स्व:त:चाच घात करणारे आहे.

**अभंगाची शिकवण** :-

प्रत्येकाने आपण सध्या कसे जगतो आहोत हे नेहमी तपासून स्वत:मधे योग्य ती सुधारणा करावी व नरजन्माचे सार्थक करून घ्यावे हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.

ॐ

**************

**अभंग :- म्हातारपण जवळ येत आहे .सावध व्हा.**

जरा कर्णमूळीं सांगो आली गोष्टी । मृत्याचिये भेटि जवळी आली ॥ 1 ।।
आतां माझ्या मना होईं सावधान । औम पुण्याची जाण कार्यसिद्धि ॥ 2 ।।
शेवटिल घडी बुडतां नलगे वेळ । साधावा तो काळ जवळी आला ॥ 3 ।।
तुका म्हणे चिंती कुलींची देवता । वारावा भोंवता शब्द मिथ्या ॥ 4 ।।

**अभंगाचा शब्दार्थ** :

माझे म्हातारपण आता जवळ आले आहे व मृत्युची भेट होण्याची वेळजवळ आली आहे हे मला सांगत आहे. तरी हे माझ्या मना आता सावध हो व ॐ च जप हे पुण्यकर्म करायला लाग. आयुष्याची शेवटची घडी येईल तेंव्हा वेळ मिळणार नाही म्हणून आता वेळ योग्य रीतीने वापर. तुका म्हणतो की कुलदेवतेचे चिंतन कर ; बाकीचे सारे बोलणे व्यर्थ आहे.

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी कांही माहिती**:

**हा अभंग आपले लक्ष मनुष्यजन्माचे अग्रीम ध्येय मोक्षप्राप्ति आहे त्याकडे वेधण्यासाठी महाराजांनी लिहिला आहे**

तुकाराम महाराजांनी आधी सांगितलेल्या अभंगाप्रमाणे माणसाने त्याचा प्रत्येक क्षण मोक्षप्राप्तीचे ध्येय गाठण्यासाठी उपयोगांत आणायला हवा. पण आपण तसे वागत नाही. बाल्यावस्थेमधे खेळण्यात, तारूण्यावस्थेत संसारासाठी प्रयत्नांमधे व विषयसुखाच्यामागे धावण्यांत घालवतो.अनेकांची ही समजूत असते की म्हातारपणी वेळ जात नाही व इतर कांही व्यवधाने नसतात ह्मणून मोक्षप्राप्तीसाठीचे प्रयत्न फक्त म्हातारपणी करावे.

**परंतू संतांनी मात्र असे करू नये हेच नेहमी सांगितले आहे**.

शंकराचार्य त्यांच्या प्रसिद्ध भजगोविंदम् स्तोत्रामधे म्हणतात की

बालस्थावत क्रिडासक्त: । तरुणस्थावत तरूणीरक्त: |
वृध्धस्थावत चिंता मग्न:| परे ब्रम्हणी कोsपि न लग्न:।

तसेच संत कबीर म्हणतात की

बचपन बीता खेल खेल में भरी जवानी सोया ।
देख बुढापा सोचे अब तू क्या पाया क्या खोया ।।
देर नही है अब भी बंदे ले ले उसका नाम रे ।।
बोलो राम बोलो राम बोलो राम राम राम

म्हणून उपाय हाच की **" रामनाम" घ्यावे, गोविंदाचे स्मरण करावे.**

दोन्ही श्लोकांच अर्थ एकच आहे.**बाल्यावस्था खेळण्यात गेली, तारुण्यावस्थेत संसारामागे धावण्यात वय गेले व आता म्हातारपण आल्यावर आजारपणे व काळजीमधे काळ जातो आहेअसेच सर्वांचे होत आहे. कौणालाच मोक्षासाठी वेळ द्यावा हे कळत नाही .**

***<u>आधीच्या अभंगामधे आपण पाहिलेच आहे की हीच बद्धांची जीवनपद्धती असते.ह्याच परिणाम म्हणजे जन्ममृत्यु चक्रामधे माणूस फिरत राहातो.</u>***

**दोन्ही श्लोकांद्वारे हाच संदेश आहे की**
**आता जागे व्हा . अजून उशीर झालेला नाही. भगवंताचे नामस्मरण करा ( शंकराचार्य गोविंदाचे स्मरण करा म्हणतात, कबीरजी रामनामाचे )**

**अभंगाची शिकवण :**

अभंगाच्या शेवटच्या दोन कडव्यांमधे तुकाराम महाराज म्हणतात की " आता तरी जागे व्हा. कुलदेवतेचे स्मरण चिंतन करा.

तुकाराम महाराज कुलदेवतेचे स्मरण ह्या साठी करायला सांगताहेत कारण खालील प्रमाणे आहे.

आपल्या देशामधे प्रत्येक कुटुंबाची एक कुलदेवता असते. असा विश्वास आहे की कुलदेवता कुळाचे रक्षण तर करतेच शिवाय पुण्यकर्मांसाठी मदत पण करते.

शेवटी सगळ्या देवता ह्या त्या परमेश्वराचीच वेगवेगळी रूपे आहेत व म्हणून कुलदेववतेचे स्मरण चिंतन पण परमेश्वरालाच पोहोचते, आणि मोक्षाकडेच नेते.ह्याबद्दल खालील श्लोक प्रसिद्ध आहे..

आकाशात पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।
सर्व देव नमस्कारान् केशवं प्रति गच्छति ॥

श्लोका**चा** अर्थ हा अहे की जसे आकाशामधून पडणरे सर्व जल शेवटी सागरालाच मिळते , तसेच सर्व उपासना अंती परमेश्वरालाच पोहोचतात.खरेतर भगवंत सर्वत्र आहे . आपल्या हृदयामधेपण तोच आहे. त्याला आपण आत्मा -अंतरात्मा ह्या नावांनी संबोधतो. आपल्याला आतल्या आवाजाद्वारे तोच मार्गदर्शन करीत असतो पण आपण त्याकडे लक्ष देत नसतो. आपल्याला आवडणाîrÉÉ देवतेचा जप करताना आपण त्यालाच स्मरत असतो.म्हणुनच तुकाराम महारज आपल्याला कुलदेवतेचे स्मरण करायला सांगत आहेत. ह्यालाच भगवन्नामस्मरण करणे म्हणतात.आपण जसे आणखी कांही अभंग पाहू तसे तसे " सर्वच संत नामस्मरणावर कां भर देतात हे स्पष्ट होईल.

ॐ

**************

अभंग :_ जागे व्हा.सागणारा.

आंता उघडी डोळें । जरी अद्यापी न कळे। तरी मातेचिया खोळे । दगड आला पोटासी ॥ १ ॥
मनुष्य्देह ऐसा निध । साधील तें साधे सिद्ध । करूनि प्रबोध । संत पार उतरले ॥ २ ॥
नाव चंद्रभागे तिरीं । उभी पुंडलिकाचे द्वारीं । कट धरुनीयं करीं। उभाउभीं पालवी ॥ ३॥
तुका म्हणे फुकासाठीं । पायिं घातलिया मिठी । होतो उठौठी \ लवकरीच उतार ॥ ४ ॥
,

## अभंगाचा शब्दार्थ:-

जर अद्यापीही तुला कळले नसेल,तर आईच्या पोटी  तू दगड म्हणुन जन्मलास असे म्हणावे लागेल. आता तरी डोळे उघड.॥१॥

मनुष्यदेह अत्यंत अनमोल आहे .ज्यांनी त्याचे सार्थ केले तेच खरेशहाणे.संतांनी हे केले व परलोक साधला॥ २॥

भगवंत चंद्रभागातीरी कटीवर हात ठेऊअ उभा आहे.त्याचा चरणांना मिठी मार म्हणजे सर्वकांही साध्य होईल॥ ३+४॥हे

**अभंगाचा भावार्थ समजण्यासाठी लागणारी माहिती :**

हा अभंग कोणाला उद्देशून म्हटला आहे?

जर आपण आपल्या आयुष्याकडे पाहिले तर असे आढ्ळते की आपल्या जीवनामधे अशा अनेक घटना , प्रसंग येतात ( उदा. जवळच्याव्यक्तिचा मृत्यु ) ज्यांमुळे आपण आपल्या जीवनाच विचार करु लागतो. आपला जन्म कशासाठी झाला ह्यावर विचार करू लागतो. मग खरेतर लक्षांत येते की मृत्यू हा अटळच आहे व त्यापासून सुटका होईल कां असे पण मनांत विचार येतात हे विचार थोडवेळ तरी मनांत राहतातच. अध्यात्म ह्यावर उपाय सांगते असे पण मनास पटते. मन:शांती प्रत्येकालाच हवी असते.

परंतू हि मनाची अवस्था फारवेळ टिकत नाही. कांही दिवसांनंतर लोक परत आपापल्या नित्य व्यवहारंमधे पुन्हा गुंतुन जातात. कारण आलेले वैराग्य क्षणैकच असते. अशा वैराग्याला स्मशानवैराग्य असे म्हणतात. आपण पुन्हा बद्ध स्थितिमधे येतो.

कधिकधी मात्र त्रिविधतापाच्या अनुभवामुळे माणसे ह्यातुन सुटका होण्याचा कांही मार्ग आहे कां ते शोधू लागतात व अध्यात्माकडे वळतात. मनाच्या ह्या स्थितिला मुमुक्षत्व येणे म्हणतात. जरी अंगी मुमुक्षत्व आले तरि ते पुरेसे नसते.ह्य्यचे कारण म्हणजे आपल्या पाठिमागे अनेक उपाधी असतात. संसार असतो. संसार चलवण्यासाठी पैसे मिळवणे भाग असते, निरनिराळे उपभोग घ्यायचे असतात, घर नीट चालवायचे असते.म्हातारपणाची सोय करायची असते.ईत्यादि अनेक उपाधि असतात. पैसा पुरेसा असेल तर हे सर्व करणे शक्य होईलसे वाटत असते.

.

संत तुकाराम महाराज म्हणतात की अशी माणसे खरेतर झोपलेलीच असतात कारण त्यांना मनुष्यजन्माच्या मुख्य ध्येयाची जाणीवच नसते.

हा अभंग महाराजांनी अशा मंडळींसाठीच सांगितला आहे.

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

महाराज म्हणतातहेत की बाबारे फार उशीर झालेला नाही. निदान आतातरी डोळे उघड व मोक्षाच्या साठी योग्य मार्गावर वाटचाल करायला सुरवात कर. जर तू हे करायला तयार नसशील तर तू व्यर्थच तुझ्या आईला ( जिने तुझा जन्म नीट व्हावा म्हणून अनेक यातना व त्रास सोसले ) जन्म देण्यासठी त्रास दिलास. तुला दगडाचीच उपमा देणे योग्य होईल.हा नरजन्म मिळणे ही अत्यंत दुर्मीळ संधी तुला मिळालेली आहे ती व्यर्थ घालवू नकोस. खालिल मुद्द्यावर विचार केला तर ही संधी दुर्मीळ कशी ते समजते.

सध्याच्या विज्ञानाप्रमाणे व आपल्या शास्त्रांप्रमाणे जीवांच्या ८४ लक्ष योनि आहेत. फक्त माणूसच बुद्धी असल्यामुळे मी कोण?, कोठून आलो? माझे खरे स्वरूप काय ? देव म्हणजे कोण? त्याचा व माझा सम्बंध काय? जन्म-मृत्यु चक्रामधून माझी सुटका होऊ शकते कां? कशी? अश्या प्रश्नांवर विचर करू शकतो. जगामधे असलेल्या अनंत माणसांपैकी फारच थोडेजण हा विचार करतात . बाकिची माणसे आहार, निद्रा, मैथुन हेच जीवन जगणे समजतात. म्हणुनच महाराज म्हणतात की हि नरजन्माची संधी दुर्मीळ आहे.

तुकाराम महाराज पुढे म्हणतात की कांही जणांना हे समजले व त्यांनी मोक्षप्राप्ती करून घेतली. तुम्हीपण त्यांच्याप्रमाने भक्ती /ज्ञान अशा मार्गावरुन जाऊन मोक्षप्राप्ती करून घेऊ शकता.

आता हे कसे करायचे तेच महाराज भक्त पुंडलिकाचे उदाहरण देऊन स्पष्ट करीत आहेत.

भक्त पुंडलिक हे त्यांच्या आई-वडिलांनाच भगवंत मानून त्यांची सेवा करीत होते. टिच त्यांची साधना होती. ह्या भक्तिमुळे पांडुरंग त्यांना भेटायला आले. तेंव्हा पुंडलिकाने पुढे ठेवलेल्या विटेवरच पांडुरंग तिष्ठत उभे राहिले. भगवंत आपल्या भक्तांवर असे प्रेम करतो.**सर्वच संतांनी ही**

**ग्वाही दिलेली आहे की भगवंत आपल्या भक्तांवर नि:सीम प्रेम करतो. . भक्ताचेही भगवंतावर असेच प्रेम असते. दासबोधामधे समर्थ रामदास म्हणतात की " देव म्हणिजे आपुला प्राण । प्राणासी न करावे निर्वाण । परम प्रितीचे लक्षण । तें हें ऐसें॥ ऐसें परम सख्य धरितां\ । देवास लागे भक्ताची चिंता।**

**भगवतामधे असे म्हटले आहे की सत्ययुगांत ध्यानाने , द्वापारयुगांत षोडशोपचार पूजेने , त्रेतायुगांत होम व यज्ञ केल्याने मुक्ती मिळते. पण ह्या कलीयुगात प्रेमने केले**ली **भक्तीच मुक्ती मिळण्यास पुरेशी आहे.**

नामस्मरण भक्ती ही नेहमी कामें करतांना सुद्धा करता येते. असो.**भक्ताचेही भगवंतावर असेच प्रेम असायला हवे हा मुख्य मुद्दा येथे आहे.**म्हणुनच अभंगाच्या शेवटच्या चरणांमधे तुकाराम महाराज म्हणतात की उठा व त्या पांडुरंगाच्या चरणांना घट्ट मिठी मारा . म्हणजेच त्याला क्षणभरही विसरू नका ( नामस्मरण सतत करा ) . असे केले तर तुम्ही हा भवसागर सहज पार करून जाल.

**अभंगाची शिकवण** :- प्रपंच करीत असतानाच नामस्मरण करावे व जन्म सार्थक करावे.

ॐ

**************

**अभंग :- तू काळाचा घास होणार आहेस हे ध्यानात घे.**

अवघाचि आकार ग्रासियेला काळें। एकचि निराळें हरीचे नाम ॥ १॥
धरूनि राहिलो अविनाश कंठी । जीवन हे पोटीं सांठविले ॥ २॥
शरीर संपत्ती मृगजळासमान । जाईल नासोन खरे नोहें ॥ ३॥
तुका म्हणे आतां उपाधीच्या नांवें। आणियेला देवें वीट मज ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ:**

**जे जे दिसते ते सर्वकांही कालांतराने नष्ट होते फक्त हरीनाम ह्याला अपवाद आहे.हे नाम कंठी धरावे. शरिरसंपत्ती ही सर्व मृगजळाप्रमाणे खोटि आहेत.नष्ट होतात. ह्यासर्व उपाधींच मला वीट आला आहे.**

**अभंगामागची भूमिका :-**

मोक्षप्राप्तीसाठी अनेक मार्ग आहेत . त्यातलाच ज्ञान मार्ग पण एक आहे. ह्यामधे आपण अनेक प्रश्नांची उत्तरे शोधत असतो. जसे मी कोण आहे? माझे व ह्या सृष्टीचे नाते काय आहे? खरा देव कोणता? खरे ज्ञान कोणते? मला जन्म कां मिळाला आहे ? ही विराट सृष्टी कशी निर्माण झाली? ईत्यादी.

जेंव्हा एखाद्याला खरे ज्ञान ( आत्मज्ञान ) प्राप्त होते तेंव्हा सर्वच प्रश्नांची उत्तरे मिळतात. आशा व्यक्तीला आपण संत पुरुष म्हणतो. कांही आत्मज्ञानी पुरुष जनसंपर्कापासून दुर जातात तर कांही जनांमधेच राहून आपले अनुभव शब्दांकीत करतात. ह्या वाङमयामुळे इतरांना पण जन्ममृत्यूच्या चक्रामधून सुटण्यासाठी मार्गदर्शन होते.
प्रस्तुत अभंग असेच मार्गदर्शन करणारा आहे. येथेव आपल्याला ह्या सृष्टीच्या नाशवंत रूपाची जाणीव होते व अशी जाणीव झाली कि आपल्या वस्तू , जिवलगांचा वियोग झाल्यामुळे जे दु:ख होते त्याची धार बोथट होते.

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण:-**

पहिल्याच ओळिमधे तुकाराम महाराज म्हणतात की सर्व सृष्टी ही कालाचे खाद्य आहे. कधीनाकधी नष्ट होणारी आहे.आपण हे नेहमीच अनुभवत असतो. हाच वेदांतातल एक मुख्य सिद्धांत आहे की जे जे आपल्याला अनुभवास येते ते ते सर्व नष्ट होणारे म्हणजेच नाशवंत आहे.फक्त भगवंत हाच शाश्वत आहे. कारण तोच सर्व विश्वाचा तोच काळाचा निर्माता आहे. त्याला आपण पाहू शकत नाही पण त्याच्या नामाद्वारे आपण त्याच्याकडे पोचू शकतो. त्याचे नामपण कालातीत आहे.

अभंगाच्या ३ ऱ्या चरणामधे तुकाराम महाराज म्हणतात की आपले शरीर व संपत्ती सर्वच एखाद्या मृगजळा प्रमाणे आहेत. आपल्याला वाटत असते की ही आपली आहेत पण थोडा खोल विचार केला तर हे म्हणणे पटू शकते. जेंव्हा माणूस मृत्यु पावतो तेंव्हा तो बरोबर ह्यातले कांहीएक घेऊन जाऊ शकत नाही. जगज्जेता अलेक्झांडरची कहाणी अनेकांना माहीत असेल. तो मृत्यूसमयी बरोबर कांही नेता येत नाही म्हणून रडला. असो. म्हणुनच ह्याला मृगजळाची उपमा दिली आहे. मृगजळाच्या पाण्याने तहान भागत नसते. पण अनेक जन्मांच्या सवयिमुळे आपल्याला ह्या सर्वाची आसक्ती वाटत असते.

वेदांताच्या भाषेत ह्यालाच उपाधी म्हणतात. उपाधी म्हणजे जे नाही ते जोडले जाणे. जर एखादे लाल फूल एखाद्या नितळ काचेजवळ ठेवले तर काच लाल दिसते. तद्वतच आत्म्याने स्वत:ला ही शरीर व मनाची उपाधी मागे लावून घेतली आहे. सर्व विश्व हे परब्रह्मास बळजबरीने लावलेली उपाधी आहे असे वेदांत सांगतो.

शेवटच्या ओळींमधे तुकाराम महाराज म्हणतात की त्यांना ह्या उपाधीची नावड वीट आला आहे. तसेच अभंगाच्या दुसऱ्या चरणामधे त्यांनी हा वीट येण्याचे कारण पण सांगितले आहे. ते म्हणतात की मी देवाचे नांम धरून ठेवले आहे. हे अमृत मिळाल्यामुळे आता त्यांना बाकी सर्वाचा वीट आला आहे. अर्थात हे उघडच आहे की ते जन्म मृत्यू पलिकडे पोहोचले आहेत. जीवन्मुक्त झाले आहेत. ह्यामुळेच जगातले सर्वकांही त्यांना नकोसे झाले आहे.

**अभंगाची शिकवण:-**

जेंव्हा कोणाला कांही ईच्छाच उरलेली नसेल तर मग त्याला त्या ईच्छेची पूर्ती करून घेण्यासाठी जन्माची आवश्यकताच राहाणार नाही. ज्याला मोक्षाची वाटचाल करायची आहे त्याच्यासाठी अभंगाद्वारे तुकाराम महाराजांनी साधनेमधे उन्नती करून घेण्यासाठी आवश्यक किल्लीच ह्या अभंगाद्वारे प्रगट केली आहे. ह्या अभंगाची हीच शिकवण आहे.

ॐ

*************

**अभंग :_ आशाच माणसाला फसवून जन्म दु:खात टाकते.**

आवासाचिये आशा गळ गिळी मासा । फुटोनिया घसा मरण पावें ॥ १ ॥
मरणाचे वेळी करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळी ॥ २॥
अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखां । तुका म्हणें सुखा पार नाही ॥ ३॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

गळाला लावलेले आमिष मासा पहातो व ते खाण्याच्या आशेने त्याचा गळा त्या गळाला अडकतो . गळा फाटून असा मासा मरतो. ॥ १॥
मरणाची वेळी त्याला यातनांमुळे भगवंताची आठवण होते ॥ २॥
तुका म्हणतो की ज्याच्या मुखी अंतकाळी नाम येते त्याच्या सुखाला मर्यादाच नाही॥ ३॥

**अभंगामागची भूमिका :-**

आपण आतापर्यंत पाहिलेच आहे की जो पर्यंत माणसाला कसली तरी भोगेच्छा असते तोपर्यंत माणुस त्या ईच्छेच्या पूर्ती साठी प्रयत्न करत राहतो. या शिवाय दरवेळी नव्यानव्या वासना तयारच होत राहतात. ह्या वासना पुर्ण झाल्या नाहीत तरमग जीव पुन: पुन: नवी शरीरे धारण करत राहतो. एकूण जन्ममृत्युच्या चक्रामधे अडकून सतत सुख दु:खे भोगणे हे वासनांच्या मुळे घडते.

**ह्या दुष्ट चक्रामधून कोणाची सुटका होते ते हा अभंग सांगतो . अर्थात आपण मग काय करायला हवे ते आपसूकच समोर येते.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

**गळाला लावलेल्या आमिषाची आशा धरल्याने मासा स्वत:चे मरण बोलवून घेतो असा** दृष्टांत प्रथमच तुकाराम महाराज देत आहेत.. **अनेक प्राण्यांच्या जाती आहेत.** त्यांपैकी मासा येतो. प्रत्येक प्राण्याला स्वत:चा जीव अत्यंत आवडता असतो. त्यासाठी अन्न हे हवेच. पण माणसा शिवाय बाकीचे सर्वच प्राणी आहार, निद्रा व मैथुन ह्या मागेच जीवन घालवतात. ह्या पलिकडे आपल्याला कांही मिळवायला पाहीजे याची त्यांना जाणीवच नसते. म्हणुनच आपन पहातो की मासा अन्नाचे आमिष पाहून फसतो. उंदिर पिंजर्यात अडकतो तेही अशाच आशेमुळे.

**तुकाराम महाराज म्हणतात की प्रत्येक जीवाला मरणाचे वेळी देव आठवतो. इतरवेळी नाही.**

पण माणसाला सदसद् विवेक बुद्धीची देणगी देवाने दिलेली आहे. त्या बुद्धीमुळेच देव ही एक अशी शक्ती आहे की जी आपल्याला संकटांतून किंवा दु:खांतून सोडवू शकते असा त्याला विश्वास पण वाटतो.

तरीही माणूस पांच इंद्रीयांद्वारे मिळणारे जे जे मिळते ते ग्रहण करतो . त्यामधे त्याला आनंद मिळतो पण तो थोडावेळ पुरणारा. हा आनंद परत परत मिळावा म्हणुन माणुस प्रयत्न करत राहतो. ह्यालाच कर्म करणे असे अध्यात्मात म्हटले आहे.
कर्मफलाचे दोन भाग असतात. एकामुळे फळ मिळते. दुसरा भाग वासनांच्या रूपाने चित्तामधे जातो. ह्या वासनाच पुढे परत कांही कारणाने अंकुरित होतात. जर झाल्यानाहीत तर जीवात्मा शरीर त्यागचे वेळी ह्यावासना बरोबर घेऊन जातो. नंतर त्यापृण व्हाव्या म्हणून परत जन्म घेतो.

**ह्या चक्रामधून सुटका व्हावी असेपण कांही जणांना वाटते. अशांच्या साठी अभंगात महाराज म्हणतात की भगवंताचे नांव जर मुखांत मृत्युचावेळी आले तर तो अत्यंत सुखी होतो.**

**अभंगाची शिकवण:-**

**पण जर अशी भगवंताची आठवण यायला हवी तर त्याची पण सवय असायला हवी.**
आपल्या मनाचे एक वैशिष्ठ्य हे आहे की ज्याची त्याला आवड लागते तीच गोष्ट ते आपणहून करत राहते. . म्हणुन भगवंताचे नाव आठवणय़ाची सवय लागायला हवी जर भगवंताच्या भेटिचीच वासना मनामधे असेल तर मग इतर कसलीही वासना उरतच नाही . त्यामुळे माणसाला मुक्ती मोक्ष मिळतो. मोक्षाचे सुख हे सर्वसुखापेक्षा उत्तम आहे हे आपल्याला माहीतच आहे. **म्हणुनच नामस्मरण आता[ पासूनच करा असे महाराज आपल्याला ह्या अभंगाद्वारे सांगत आहेत.**

ॐ

*************

# भाग ६.२ वा



## ह्या भागामधे मुमुक्षूच्या मन:स्थितीचे वर्णन आहे.

संतांचा उपदेश ऐकल्यामुळे वा ईतर कांही कारणांमुळे बद्ध माणसाला अनुताप होतो व मुमुक्षूत्व उदयास येते. अशा मुमुक्षूच्या मनस्थितीचे वर्णन करणारे पुढील अभंग आहेत.

**अभंग :_ मी पंचभूतात्मक ह्या देहाच्या आधीन झालो आहे.**

पंचभूतांचियें सापडलो संदी । घातलोसें बंदी अहंकारें॥ १ ॥
आपुला आपण बांधविला गळा । नेंणेचि निराळा असतांही ॥ २ ॥
कासया सत्य मानिला हा संसार ।कां हे केले चार माझें तुझें ॥३ ॥
कां नाहीं गेलो शरण नारायणा । कां नाहीं वासना आंवरिली ॥ ४ ॥
किंचित सुखाचा धरिला अभिलाष । तेणें केला नाश बहु पुढे ॥ ५ ॥
तुका म्हणें आतां देह देऊं बळी । करूनि सांडूं होळी संचिताची ॥ ६ ॥

**शब्दार्थ :-**

पंचभूतांनी निर्माण केलेल्या तुरुंगात **स्वत:च्या अहंकारामुळे** मी बंदी झालो आहे.॥१॥
ह्या शरीरापेक्षा निराळे असूनही मी स्वत:च स्वत:च्या गळयास फांस लावला आहे ॥ २॥
ह्या संसाराला खरा मानून मी माझी स्थिती अशी कां केली ? ॥ ३॥
वासनांना कां आवरले नाही? नारायणाला कां शरण गेलो नाही ? ॥ ४॥
किंचित सुखाची अभिलाषा धरल्यामुळे माझे फार मोठे नुकसान मी करून घेतले॥५॥
तुका म्हणतो की आता ह्या देहाचा बळी देऊन मी संचिताची होळी करेन॥ ६॥

**अभंगाची पार्श्वभूमी :-**

आपणा सर्वांनाच हे माहीत आहे की भगवंताने आपल्याला म्हणजे फक्त माणसालाच विचार करण्याची शक्ती व बुद्धीची अत्यंत दुर्मीळ देणगी दिलेली आहे. ही देणगी चौऱ्यांशी लक्ष प्राणी योनितल्या फक्त माणसाकडेच आहे

.

प्रत्येक प्राणी आपले सर्व आयुष्य आहार, निद्रा, मैथून व मृत्यूभयातच सर्वसाधारणत: घालवतो. स्वत:च्या शरीर रक्षणासाठीच कार्यरत असतो. माणसांनी केलेले आयुर्विज्ञान व ईतर शास्त्रांचे प्रयत्न ह्या अमरत्वाच्या ध्येयानेच प्रेरित होत असतात.परंतू हे सर्व प्रयत्न अपूरेच असतात हे पण आपण जाणतो.

आपल्या ऋषीमुनींनी फार पूर्वी ह्यावर विचार केला आहे व स्वानुभवावरून हे स्पष्ट सांगितले आहे की माणसाला हे अमरत्वाचे ध्येय साधणे मनुष्यजन्मातच शक्य आहे . त्यासाठी साम्हणूनच आपल्या शास्त्रांनी प्रयत्नपूर्वक हे शोधून काढले की माणसाला अमरत्व मिळण्यासाठी काय करायला हवे

ह्यामुळे हे स्पष्ट झाले आहे की , खऱ्या देवाची भगवंताची भेट हॊणे आवश्यक आहे. ज्याला ही भेट होते तो भगवंताचा अंश होतो व अमर होतो. ( कारण भगवंत हा जन्ममृत्यातीत आहे)
ज्याला अशी ईच्छा होते की आपण भगवंताची भेट घ्यावी व मोक्ष साधावा त्याला शास्त्रांमधे " मुमुक्षू " असे म्हणतात. अशी ईच्छा मनामधे येणे ह्यालाच " मुमुक्षूत्वाचा उदय होणे " म्हणतात.
अशा मुमुक्षूच्या मनामधे कोणते विचार येतात ते हा अभंग सांगतो.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**
**मनामधे मुमुक्षुत्वाचा उदय झाला की येणारा विचार अभंगाच्या पहिल्याच चार ओळींमधे तुकाराम महाराजांनी मांडला आहे. मुमुक्षुत्वाचे एक मुख्य कारण म्हणजे संतांचे बोल उपदेश ऐकायला मिळणे,**
**हे आहेच ह्या शिवाय पूर्वसुकृत हवेच. अनेकदा त्रिविधतापांमुळे त्रस्त झाल्यामुळे पण माणुस मुमुक्षू होतो.**

एक मुख्य मुद्दा हा पण आहे की जरी जीवात्मा हा खरेतर नेहंईच मुक्त होता व सतत ब्रह्मानंद भोगत होता , पण ह्या दृश्याच्या आसक्तीत गुंतल्यामुळे त्याने शरीर धारणा केली व स्वत:ला मऱ्यादित शक्ती असणारा समजू लागला. ह्याप्रमाणे जिवात्म्याने स्वत:च स्वत:ला बंदी करून घेतले आहे. द्रूश्याची आसक्ती असल्यामुळे जिवात्म्याला पंचेंद्रियाच्या द्वारे मिळणारे भोग हवेहवेसे वाटतात. भोगांची आठवण चित्तामधे राह्हते. ह्या आठवणींना वासनाबीजे म्हणतात. जर सध्याच्या जन्मामधे वासनापूर्ती झाली नाही की नवे शरीरम्हणजे नवा जन्म घेणे होते व हे चक्र सतत चालू राहते.

**जो मुमुक्षू झालेला असतो त्या हे कळलेले असते पण आपण ह्यातून कसे सुटायचे हे मात्र समजत नसते. पण आपण आतापर्यंत वेळ व्यर्थ घालवला ह्याची खंत मुमुक्षूला वाटतेच.**आपण स्वत:ला बंधनात बंदी केले आहे व आता वृद्धत्वाकडे वाटचाल होत आहे ; मग मोक्ष मिळेल कां ही काळजी पण वाटते.

अभंगाच्या पहिल्या दोन ओळींमधे तुकाराम महाराज हाच प्रश्न स्वत:लाच ( मुमुक्षूच्या भूमिकेत जाऊन ) विचारत आहेत की " खरेतर मी स्वतंत्रच व आनंदातच

होतो.मग मी स्व:ला असे ह्या शरीर बंधनात कां बांधून घेतले आहे. ?

**असे वाटणे हीच स्वता:ला मुक्त करण्याच्या प्रवासातली पहिली स्थिती होय.**

अभंगाच्या पुढच्या ओळींमधे मुमुक्षूला पडलेले दोन प्रश्न तुकाराम महाराजांनी लिहिले आहे . ते प्रश्न म्हणजे

१) जरी मला अनुभव येतो आहे की हे सर्व दृश्यजगत नाशवंत आहे ; तरीपण मला असे कां वाटते की जगच अविनाशी आहे?

जग ह्या शब्दाची व्याप्ती खूप मोठी आहे. त्यामधे मुख्यत: स्वत:चे शरीर, बायको/नवरा मुलेबाळे, जवळचे नातेवाईक, मित्र , घर , संपत्ती , स्वत:च्या आवडीनिवडी हवेनकोपण, पंचेद्रियांद्वारे मिळणारे भोग /आनंद ईत्यादी सर्व कांही येते. ह्या सर्वांची आसक्ती हीच जिवाला अनेक जन्म व अर्थातच मृत्यू ह्यामधे फिरवत असते.

२) असे असूनही मला ही आसक्ती कां वाटते ?

तुकाराम महाराजांनी लगेच पुढचा प्रश्न पण लिहिला आहे. हा प्रश्न म्हणजे :-नारायण मला ह्यातून मोकळे करेल हे तर मला माहीत आहे. तरीही हे सर्व समजून उमजून सुद्धा मी नारायणाला कां शरण गेलो नाही? येथे आपण नारायणाला शरण जावे हा भाव / विचार मनामधे उत्पन्न झाला आहे असे दिसते.

म्हणुनच पुढच्या चरणांमधे तुकाराम महाराज म्हणतात की जगातल्या वस्तूंबद्दल आसक्त होऊन मी आयुष्यातला काळ व्यर्थच घालवला आहे. ह्यामुळे माझी फार मोठी हानी झालेली आहे. ( येथे हानी म्हणजे जन्ममृत्यू चक्रामधे अडकणे असा अर्थ घेणे योग्य ठरते कारण जन्म हेच दु:खाचे मूळ आहे), येथे सुखाचा काळ थोडा असतो. बाह्य विषयांकडून मिळनारे सुख क्षणीक असते.

ह्यानंतर अभंगाच्या शेवटच्या चरणामधे वर लिहिलेले विचारमंथन झाल्यामूळे आता काय कारवाई करायची हा भाग तुकाराम महाराजांनी स्पष्ट केला आहे. ही कारवाई म्हणजे भगवंताला सर्व संसाराची आसक्ती सोडून देऊन शरंण जाणे ही होय.

म्हणुनच महाराज म्हणताहेत की आता एकच काम करायचे मी ठरविले आहे ते म्हणजे भगवंतास शरण जाणे व संचिताची होळी करायची.( होळी करणे म्हणजेच संचिताचे परिणाम पूर्णपणे संपविणे )अशा रीतीने उरते ती फक्त भगवद्भेटीची आसक्ती. ही वासना अर्थातच जन्मबंधनातून सोडवते.

**अभंगाची शिकवण :-**

येथे हेच शिकायला मिळते की आपण आत्मपरीक्षण करून पहायचे की आपल्याल खरेच भगवद् भेटीची आंस लागली आहे कां? जर उत्तर होय असे असले तर मग आपण भगवंतास शरण जाऊन जीवन जगायला सुरवात करायला हवी.

***शरण जाणे म्हणजे कसे जगणे हे सांगणारे अभंग आहेत ते यानंतर पाहूया..***

ॐ

*****************************

**अभंग :- मुमुक्षुला लागलेली तळमळ**
**कन्या सासुऱ्यासी जाये । मागे परतोनी पाहे ॥ १ ॥**
**तैसें जाले माझ्या जीवा । केंव्हा भेटशी केशवा ॥ २ ॥**
**चुकलीया माय । बाळा हुरुहुरु पाहे ॥ ३ ॥**
**जीवनावेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ ४ ॥**

**अभंगाचा शब्दार्थ :**

ज्यावेळी नवी नवरी आपल्या पतीबरोबर सासरी जाण्यासाठी निघते ; त्यावेळी ती आपल्या माहेरच्या मंडळींकडे पुन:पुन: वळून पाहाते ॥ १॥

माझीही स्थिती अशीच झाली आहे. हे केशवा तू मला केंव्हा भेटशील रे! ॥ २॥

आई न दिसल्याने जसे मूल अस्वस्थ होते,॥ ३॥ पाण्यामधून बाहेर काढलेली मासोळी जशी तडफडते ॥ ४ ॥ तशी माझी स्थिती झाली आहे.

**अभंगच्या अर्थाचे स्पष्टीकरण :**

ह्या अभंगामधे तुकाराम महाराजांनी स्वत:च्या मनाची होत असलेली तळमळ व मन:स्थिती व्यक्त केलेली आहे. महाराजांनी ह्यासाठी पतीबरोबर सासरी निघालेल्या नववधूच्या मनस्थितीचे उदाहरण दिलेले आहे. विवाहापर्यंतचे तिचे आपले सर्व बालपण , आयुष्य ज्या घरी घालवले ते सोडायची वेळ आलेली आहे. मायेच्या माणसांची भेट परत कधी होईल ही हुरहूर तर मनांत आहेच व शिवाय नवे वैवाहिक जीवन सुरू करण्याची उत्सुकता पण आहे. म्हणुनच अशी नववधू घरातून निघताना पुन: पुन: मागे वळून पाहाते.

अभंगातले दुसरे उदाहरण आई दिसत नसल्यामुळे होणारी बालकाची स्थिती जशी असते त्याचे दिले आहे. . आईहेच बाळाचे सर्व कांही जग असते. आईचा विरह ताटातूट लहान बाळाला क्षणभरही सहन होत नाही

अभंगाच्या शेवटी पाण्यामधून बाहेर काढलेल्या मासोळीचे आहे. मासोळी पाण्याविना जिवंतच राहू शकत नाही. त्यामुळे तिची पाण्यामधून बाहेर काढल्याव अत्यंत तडफड होते हे आपण सर्वानी पाहिलेच आहे.

भगवंताची भेट होण्यासाठी तुकाराम महाराजांची मन:स्थिती ही शीच झालेली आहे. त्यांन फक्त एकच गोष्ट हवी आहे ती म्हणजे त्यांच्या पांडूरंगाची भेट. अभंगात महाराजांनी पांडुरंगालाच केशवा अशी हांक मारलेली आहे.

**ह्या अभंगाची शिकवण :**

जेंव्हा माणसाला फक्त भगवंतच हवा असतो व बाकी कसलीही ईच्छा आसक्ती रहात नाही , तेंव्हाच तो अशा भक्ताला दर्शन देतो. श्री. रामकृष्ण परमहंसानी ह्यासाठी खालील लिहिलेला दृष्टांत दिलेला आहे.

श्री. रामकृष्ण परमहंस ह्यांच्या बद्दलच्या प्रसिद्ध ग्रंथांत ( कथा चरितमृत ) The gospel of Sri Ramakrishana ( English version page 85) म्हणतात की **" जेंव्हा लोभी माणसाचे संपत्तीवरचे प्रेम, लहान बाळाचे आईवरचे प्रेम व पुरुषाचे पतिव्रता पत्नीवरचे प्रेम ह्या तीनही**

**प्रेमभावना भगवंताविषयी एकाच वेळी एकत्रपणे , एकाद्यामधे एकाचवे ळी प्रगट होतात ; तेंव्हाच भगवंत अशा व्यक्तीकडे आकर्षित  होतो आणी म्हणून त्याला दर्शन देतो " भगवंतासाठी मनामधे अशी व्याकुळता असायला हवी हेच हा अभंग आपल्याला शिकवतो.**

ॐ

******************

**अभंग : प्रयत्नांचे महत्व समजावणारा**

झाली होती काया । बहुत मळीण देवराया ।
तुझ्या उजळली नांमें । चित्त प्रक्षाळिले प्रेमें ॥ १ ॥
अनुतापें झाला झाडा । प्रारब्धाचा नितोडा । नितोडा == संबंध तुटणे
तुका म्हणें देह पायीं । ठेवुनि झालो उतराई ॥ २॥

अभंगाचा शब्दार्थ :-

हे भगवंता माझी काय व चित्त फार मळली होती. तुझ्या नामामुळे ती स्वच्छझाली व चित्तामधे प्रेम भाव प्रगटला. अनुतापामुळे प्रारब्धाचा जोर संपला व असा मी तुझ्यापायी हादेह अर्पण करून तुझा उतराई झालो आहे.

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठीची पार्श्वभूमी :-**

संत कसे असतात तर पावसासारखे! सर्वांचे कल्याण व्हावे म्हणुन संतांचा उपदेश असतो. पाऊस सगळीकडे पडतो पण जेथे सुपीक जमीन असते तेथे बी पेरलेले असले तर उत्तम पीक मिळते. तसेच मन जर शुद्ध असेल तर संतांच्या उपदेशाचा परीणाम ताबडतोब होतो. परिणाम म्हणजे सद्‌गुरूकृपा हाच होय. ज्याच्यावर सद्‌गुरूकृपा होते तोच मुक्त होतो. नरजन्माची सार्थकता म्हणजे सायोज्य मुक्तिच जी ह्याच जन्मात मिळते तीच आहे . स्वत: भगवान श्रीकृष्णांनी व सर्वच संतांनी सांगितले आहे. फक्त नरदेहधारी जीवालाच ही संधी मिळालेली आहे.

अशी हि स्थिती असणारा पुरुष कसा असतो ते ह्या अभंगावरून आपल्याला थोडेसे कळते.

**साखर खाल्ल्याशिवाय तिची गोडी कळत नसते. तसेच अशी आत्मज्ञानी स्थिती म्हणजे काय हा अनुभवाचा भाग आहे.**
**एवढे मात्र खरे की ही स्थिती संपूर्ण , सतत न भंगणारे समाधान देणारी आहे. शिवाय अशी स्थिती आली की जन्ममृत्यू च्या चक्रामधून जीवाची सुटका झालेली असते. म्हणुनच असे समाधान आपल्याला मिळावे असे प्रत्येकालाच खरेतर वाटत असते.**

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**
सुरवातीस पहिल्याचरणामधे महाराज म्हणतात की त्यांची काया म्हणजे शरीर मळलेले होते. येथे आपण समजू शकतो की बाह्य शरीर स्नान केल्याने स्वच्छ होते. पण मनाचे काय?जर मन खाणे, पिणे, वैषयिक सुखे भोगणे व त्याच्याच आठवणीत रमलेले असेल तर मन **" मळलेलेच " म्हणावे लागेल. असे वासनांनी भरलेले मन असेल तर शरीर मळलेले अस्वच्छच म्हणावे लागेल. वासनांच्यामुळेच आपण सर्वजण जन्ममृत्यूचक्रा व त्यामुळेधे फिरत आहोत व सुखदु:खाच्या प्रवाहात वाहात आहोत हे आपणा सर्वांनाच आता माहीत आहे.**

**नामस्मरणाची साधना** तुकाराम महाराजांनी केली व त्यांचे मन ह्या साधनेमुळे शुद्ध झाले आहे असे महाराज अभंगाच्या पुढच्या चरणात आपल्याला सांगताहेत.
ह्या चरणातच महाराज म्हणतात की " प्रेमे चित्त प्रक्षाळिले " ., अर्थात महाराजांनी नामस्मरण प्रेमाने केलेले आहे. थोडक्यांत अर्थ हाच की आपले नामस्मरण ही एक क्रिया Mechanical action म्हणुन नसावी तर त्यांत भगवंताचे प्रेम भरलेले असावे.
हे प्रेम कसे ह्याबद्दल आपण पूर्वीच्या अभंगात श्री रामकृष्ण परमहंसांच्या एका वचनामधे पाहिले आहे. आईचे आपल्या बाळवर, पत्नीचे आपल्या प्रिय पतीवर, कवडीचुंबकाचे पैशावर जसे असते त्यापेक्षा अनेक पटीने भगवंतावरचे प्रेम असावे. असा हा दृष्टांत आहे. जर **आपण समजून उमजून** नियमितपणे भगवंतास आठवले तर असे प्रेम निर्माण होते असे श्री. गोंदवलेकर महाराज सांगतात.

**अभंगाच्या पुढच्या ( चरण ३) मधे हे "समजणे -उमजणे " अर्थात** आपल्या पूर्वीच्या वागणूकीचा ( सर्व काळ विषयांच्यामागेच धावत असणे व भगवंताला त्याने कांहीतरी द्यावे ह्या भावनेने पूजणे ) पश्चाताप पावणे होय. असा पश्चाताप होऊन जर भगवंताला शरण गेलो तर तो आपली माऊलीच असल्याने आपल्याला नक्कीच जवळ घेत असतो.
**आपल्याला फक्त एक पाऊल पुढे टाकायचे असते हाच अर्थ येते समोर येतो.**

**अभंगाच्या शेवटच्या चरणामधे** महाराज म्हणतात की मला असा पश्चाताप झाला होता ( व त्यामुळे पांडूरंगच माझा त्राता आहे ह्या भावनेने अत्यंत अनन्यभावाने मी त्याचे स्मरण केले ). ह्या मुळे माझे प्रारब्धाचे भोग संपले. मी त्याचाच चरणी हा देह अर्पण केला आहे आणी त्याचा उतराई झालो आहे.

आपण ह्या जन्मामधे जी कांही सुखे वा दु:खे भोगत असतो ती म्हणजे पूर्वजन्मी केलेल्या पुण्य-पापांचेच फळ असते. ह्या शिवाय आपण आताच्या जन्मामधे पण ह्यात भर टाकलेलीच आहे.
पण भगवंताचे अनन्यभावे स्मरण केल्यामुळे हे सर्व भोग आता संपले आहेत. मी हा देह भगवंताला अर्पण केला आहे. ( ह्याचा अर्थ हाच की महाराजांचे " मीपण " = " अहंकार " पूर्ण लयास गेलेला आहे. ) .
जर आपण तुकाराम महाराजांचे चरीत्र पाहिले तरच त्यांचा मी पूर्ण पणे कसा लयास गेला होत ते कळते. ते जीवन्मुक्तच होते.

श्री. दासबोधामधे द.९स३ "नि:संदेहनिरूपण" मधे असा जीवन्मुक्त कसा असतो त्याचे वर्णन येते. समर्थाचंचे बोलणे पण तुकाराम महाराजांच्या प्रमाणेच अनुभवाचे ( प्रचीतीचेच) आहे. असा पुरुष अकर्ता,अभोक्ता,अलिप्त पणे संसारात वावरत असतो. त्याला अंतर्‍यामी स्वत:च्या स्थितीची पूण जाणीव असते. व त्याचे वागणे "उरलो उपकाराकरिता" असेच असते. प्रारब्धाप्रमाणे जे जे भोग यायचे त्यांनी तो स्वत:च्या आत्मस्थितीपासून विचलित होत नाही. स्वामी विवेकानंद, श्री रामकृश्ण परमहंस, शेगावचे श्री. गजानन महाराज, लोकमान्य टिळक अशी बरीच नांवे आपल्याला माहित आहेत.असो.

**येथे असे म्हणावेसे वाटते की आपल्याला सध्याच्या अज्ञानावस्थेतून ज्ञानवस्थे कडे जायचे आहे कारण असे केले तरच शाश्वत समाधान म्हणजेच मोक्ष मिळेल.अन्यथा नाही.**

शंकराचार्य भजगोविंदम् स्तोत्रमधे सांगतात तसे
कुरुते गंगा सागर गमनम् । व्रत प्रतीपालन अथवा दानम् ।
ज्ञानविहिनं कर्ममनेन । मुक्तिर्नभवती जन्म शतेन ॥

**श्लोकाचा अर्थ:- जरी गंगास्नान, सागरस्नान, अनेक व्रतवैकल्ये किंवा दानधर्म केला, तरी जोपर्यंत ज्ञान होत नाही तोपर्यंत शंभर जन्म जरी घेतले तरी मोक्ष मिळणार नाही.**

***<u>येथे असा प्रश्न उपस्थित होईल की आपल्याला हे कसे जमणार? व त्याचे उत्तर एकच आहे की आपल्या हाती प्रयत्न करणे , नीती नियमांप्रमाणे वागणे नक्कीच आहे.</u>***

झोपण्यासाठी आपण अंथरूणावर पडणे हा प्रयत्न आप्ण रोज करतच असतो. झोप अमूक एक वेळानेच लागली असे नक्की कोणीच सांगू शकत नाही पण आपण रोज झोपी जातोच.तद्वतच प्रयत्न म्हणजे भगवंताचे नामस्मरण किंवा आपल्याला जी साधना करायची ती नियमितपणे करणे व बाकीचे त्याच्या मर्जीवर सोडुन देणे एवढे आपल्याच हाती आहे.

**अभंगाची शिकवण :- मला वाटते की असे प्रयत्न आपण करावे हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.**

**ह्या प्रयत्नांचे स्वरूप काय ते सांगणारे अभंग पुढे येतीलच.**

ॐ

**************

**अभंग :- मुमुक्षूच्या मनातली तळमळ कशी आहे ते सांगतो.**

तुजलागीं माझा जीव जाला पिसा । अवलोकिंतो दिशा पांडुरंगा ॥ १ ॥
सांडिला व्यवहार माया लोकाचार । छंद निरंतर हाचि मनीं ॥ २॥
आइकिलें कांनी तें रुप लोचन । देखावया सीण करिताती ॥ ३॥
प्राण हाविकळ होय कासाविस । जीवनाविण मत्स्य तयापरी ॥ ४॥
तुका म्हणें आता कोण तो उपाव । करूं तुझे पाव आतुडे तो ॥ ५॥

**शब्दार्थ :-**

हे देवा पांडुरंगा , माझा जीव तुझ्याकरता वेडा झाल्याने मी दाहीदिशांस तुला शोधतो आहे ॥ १॥

आता माझ्या मनांत फक्त तुझे दर्शन व्हावे हाच एकच छंद उरला आहे, लोकव्यवहाराचा मी त्याग केला आहे ॥ २॥

तुझ्या स्वरूपाचे जे वर्णन मी ऐकलें आहे तेच रूप दिसावे ह्याच्यासाठी माझे डोळे लागले आहेत व ( तू न दिसल्यामुळे ते थकले आहेत). ॥ ३॥

पाण्यावाचून मासा जसा तळमळतो तसेच माझा प्राण तुझ्या दर्शनाकरतां तळमळत आहे ॥ ४ ॥

तुका म्हणतो की ज्या योगे तुझे दर्शन होईल असा कोणता उपाय मी आता करू? ॥ ५॥

**अभंगामागची भूमिका :-**

भगवंताची भेट कशी होईल असे प्रत्येक भक्ताला वाटते. ह्याचे कारण म्हणजे मनामधे भगवंत आहेच व तोच मला सर्व दु:खातून सोडवेल ही मनाची खात्री म्हणजे भाव भक्ताच्या मनामधे असतो. भाव याचा संस्कृतमधला अर्थ हाच आहे की " असण्याची खात्री असणे ". गीतमधे म्हटल्याप्रमाणे फक्त भगवंतच खरा आहे व बाकी सर्व एक भासच आहे ( गीत अ.२ श्लोक १६ ) .असा भाव भक्ताच्या मनामधे असतोच व शिवाय त्याच्या मनामधे भगवंताबद्दल पराकोटीचे प्रेम पण असते.

असा भक्त भगवंताच्या भेटीसाठी व्याकूळ होतो .***ही स्थिति येणे म्हणजे भगवंताच्या साक्षात्काराची वेळ जवळ येणे होय. तुकाराम महाराजांची अशी स्थिति असताना त्यांनी हा अभंग रचला आहे. महाराजांचे चरीत्र पाहिले की ते अशा स्थितीत होते असे आढळते.***

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

तुकाराम महाराज पांडुरंगाला आर्तभावाने विचारताहेत की हे देवा, तुझ्यासाठी माझा जीव अगदी वेडापिसा झाला आहे. तू कोठेतरी दिसशील म्हणुन नजर सर्व दिशांना भिरभिरत पाहाते आहे. तुझी भेट व्हावी म्हणून मी सर्व कांही लोकव्यवहार सोडून दिले आहेत. आता मनाला

एकच छंद लागला आहे तो म्हणजे तुझे दर्शन व्हावे. तू कसा आहेस हे मला माहीत नाही. पण मी तुझ्या रूपाचे वर्णन ऐकले आहे.

**(आपण सर्व जाणतोच की असे भगवंताच्या रूपाचे वर्णन निरनिराळया स्तोत्रांत, भगवद्गीतेमधे, भगवतामधे आले आहे.)**

पण ते रुप कांही मला दिसत नाही आहे व आता माझे डोळे तुझ वाट पाहून थकले आहेत. जर माश्याला पाण्याबाहेर काढले तर तो जसा तळमळतो तशीच तळमळ मला तुझ्या दर्शनाची लागली आहे. महाराज शेवटी देवांना विनवितात की "हे देवा तूच ह्यावर उपाय सांग जेणेकरून मला तुझे दर्शन होईल."

**अभंगाची शिकवण :-**

ह्या अभंगाचा उद्देश आत्मपरीक्षणा करताच आपल्याला करता येतो. आपण स्वत:चे अंत:करण तपासुन समजू शकतो की आपल्याला खरेच अशी भगवंताच्या भेटीची तळमळ लागली आहे कां?

परमार्थामधे असे आत्मपरीक्षण करणे महत्वाचे आहे.

ॐ

**************************

**तीन अभंग :- अनेक जन्म साधना केल्यामुळे हा नरज्न्म मिळाला , आता तो सार्थकी लावेन. भगवंतास शरणजाणे कसे करायचे ते वर्णन.**

**अभंग १** :-

बहु जन्म केला लाग। तो हा भाग लाधलों ।| १ ॥
जीव देईन बळी । करीन होळी संसाराची ॥ २ ॥
गेलें मग नये हातां । पुढची चिंता वाटतसे ॥ ३॥
तुका म्हणें तांतड करू । पाय धरूं बळकट ॥ ४॥

**अभंग २:-**

दुर्बुद्धी ते मना । कदा नुपजों नारायणा ॥ १॥
आतां मज ऐसें करी । तुझे पाय चित्ती धरी ॥ २॥
उपजला भावों । तुझ्या कृपें सिद्धी जावो ॥ ३ ॥
तुका म्हणें आतां । लाभ नाही परता ॥ ३॥

**अभंग ३:-**
देवावरी भार । वृत्ति अयाचित सार ॥ १ ॥
देह देवाचें सांभाळी । सार योजे यथाकाळी ॥ २॥
विष्वासी निर्धार । विस्तरारिल विश्वंभर ॥ ३॥
तुका म्हणें व्हावें । ब:ळ एकचि जाणांवें ॥ ४॥

**अभंगांचा शब्दार्थ :-**

अनेंक जन्मी परमार्थाचा पाठलाग केल्याने अशा प्रकारचा भाग प्राप्त झाला.
आतां मी परमार्थाकडे जीव बळी देऊन सर्व संसाराची होळी करून टाकीन.
एकदां कां हा नरदेह गेला म्हणजे तो पुन: मिळणर नाही ; या विषयीची मोठी काळजी लागली आहे.
तुका म्हणतो की त्वरा करून विठोबाचे पाय हृदयांत बळकट धरून ठेवू .
हे नारायणा , माझ्या मनात कधी वाईट बुद्धी उत्पन्न होऊं देऊं नकोस.
माझ्या चित्ताने तुझे पाय धरून रहावे , असे तू मला कर .
असा जो भाव तुझ्या कृपेने उत्पन्न झाला आहे, तो तुझ्या कृपेनेच सिद्धीस जावो .
तुका म्हणतो की ह्या परता आता मला दुसरा लाभ नाही .

सर्वस्वाचा भार देवावर घालून अयाचित वृत्तिने राहणे हे सार आहे .
देह देवाच्या स्वाधीन करून योग्य काली त्याची योग्य कर्माकडे योजना करणे हे सार मानावे.
विश्वामधे विश्वपोषक आहे असा निश्चय केला म्हणजे तो सर्व व्यवस्था लावतो.
तुका म्हणतो की अशा प्रकारची स्थिती असणे हेच एक बळ आहे असें समजावे.

**अभंगामागची पार्श्वभूमिका :-**
नरजन्माचे महत्व काय ह्या बद्दल ह्या अभंगामधे चर्चा आहे, तसेच जन्माचे सार्थक कसे करून घ्यायचे हे सांगणारे दोन अभंग येथे देणे उचित ठरेल असे वाटले म्हणून हे तीन अभंग एकत्र घेतले आहेत. तुकाराम महाराजांच्या ह्या उपदेशातलातला कांही भाग ईतर कांही अभंगांमधे

आधी येऊन गेला आहे . समर्थ रामदास स्वामी पण सांगतात की " विवरलेची विवरावे " अर्थात जे महत्वाचे आहे ते परत परत सांगावे. तुकाराम महाराज पण पुन: एकदा आपल्याला हाच विषय ह्या अभंगांद्वारे सांगत आहेत.

जीवन्मुक्त संतांमधे तुकाराम महाराज येतात हे आपण जाणतोच. अशी संतमडळी नेहमीच सहज समाधी अवस्थेमधे असतात. असे असले तरी पण लोक कल्याणार्थ मुद्दाम संत बरेच वेळा आपण सांगतो ते पटावे म्हणून स्वत:चेच उदाहरण देतात. तुकाराम महाराजांच्या अभंगांमधे बहुतेकवेळा असे स्वत:चेच उदाहरण त्यांनी दिलेले आढळते. तसेच ह्या अभंगांमधे पण आहे. असो.

महाराज एक जीवन्मुक्त संतपुरुष होते म्हणुन त्यांच्या शब्दांना स्वानूभवाचे बळ आहे.

**अभंगांच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

**अभंग १ ला :-**

श्रीभगवद्गीते मध्ये अर्जूनाने असा एक प्रश्न भगवंतास विचारला आहे की जर एखाद्या साधकाला मोक्ष मिळाला नाही तर त्याला पुढचा जन्म कोणता येतो ? व भगवंतांनी हेच उत्तर दिले आहे की असा साधक पुढचा जन्म अशा कुळामधे घेतो जेथे त्याची साधना त्याला पुढे नेता येते.

आपण तुकाराम महाराजांच्या पूर्वजांची माहिती पाहीली की आढळते की त्यांच्या सहा सात पिढ्यांमधे परंपरेने विठ्ठलाची भक्ती केली जात आहे.

**म्हणुनच ह्या अभंगात ( चरण १ ला व चरण ३ रा )** ते सांगताहेत त्यांनी अनेक पूर्वजन्मामधे त्यांनी जी परमार्थ साधना केली त्यामुळे त्यांना आता तीव्रतेने भगवद्भक्ती करावीशी वाटत आहे . ते भगवद्भजन करताहेत. कारण त्यांना भगवंताच्या दर्शनाची तीव्र आंस लागली आहे.

मनुष्य जन्मा मधे प्राणी कधीनाकधी वासनाधीन होतोच व काम्य कर्मे पण करतो. मग त्या कर्मांचे फळ भोगंण्यासाठी पुन: जन्म पण घ्यावा लागतो. जो मुमुक्षू झालेला असतो त्याला हे कळलेले असते. त्यामुळे अशा मुमुक्षूला पुढचा जन्म कोणता येईल ही काळजी वाटत असते.

तुकाराम महाराज अशा मुमुक्षूच्या भूमिकेत जाऊन येथे असे म्हणताहेत की " अशी काळजी वाटते आहे की जर ह्याजन्मी ही भेट झाली नाही तर पुन: असा नरजन्म मिळेल की नाही."

**अभंगाच्या दुसऱ्या चरणामधे** ते स्वत:लाच सांगत आहेत की ही नरजन्माची संधी व्यर्थ जाऊं नये .म्हणून त्यांनी आता असे ठरविले आहे की आपला जीव बळी देऊन , संसाराची होळी करून टाकायची.

ही संसाराची हॊळी करायची म्हणजे काय ते **अभंगाच्या शेवटच्या चरणामधे** स्पष्ट केले आहे. महाराज म्हणतात की आता ह्या क्षणापासुन मी विठ्ठलाचे पाय हृदयांत बळकटपणे धरून ठेव्णार आहे.

*आपणच स्वत:ला बद्ध समजत असतो. पण खरेतर आपण विषयांना धरलेले असते. असे विषयांना ( घरदार, पती -पत्नी, मुले बाळे ऐहिक गोष्टी, कलांचे ज्ञान, संपत्ती, उत्तम चविष्ट खाण्याचे पदार्थ, प्रसिद्धी, ईत्यादीना ) व म्हणूनच संसारामधे गुंतलेलो असतो.*

*उपनिषदांमधे एका पक्षाचे उदाहरण आहे. हा पक्षी स्वत:च पिंजऱ्यातल्या नळीला धरून असतो. जर नळी सोडली तर आपण पडू अशी भीती त्याला वाटत असते. म्हणून जरी पिंजऱ्याचे दार उघडले तरी तो पिंजऱ्यातच अडकून रहातो म्हणजेच स्वत:च स्वत:ला त्याने पिंजऱ्यामधे ठेवलेले असते.*

***आपली पण स्थिती अशीच असते. जर विवेक विचार केला तर आपण पण मुक्त होऊ शकतो.***

*म्हणूनच समर्थ रामदास स्वामी सांगतात की परमार्थसाधण्यासाठी कांहीही सोडावे लागत नाही. जो योग्य विवेक विचार करतो तो च सुटतो. असा विवेक विचार करून संसाराचे नाशवंतपण कळते. मग आपोआपच संसाराची आसक्ती कमी होते.*
***हेच संसाराची होळी करणे .ही मन:स्थिती जेंव्हा आपण भगवंताचे पाय घट्ट धरतो अर्थात सतत त्याचे स्मरण ठेवले की येते.***
***पुढचे अभंग हे कसे आचरणामधे आणायचे तेच सांगत आहेत.***

***तात्पर्य हेच की संसाराची होळी करणे अर्थात विठ्ठलाचे पाय ह्रदयात घट्टपणे धरणे हे प्रत्यक्षात आचरणामधे कसे आणायचे त्याचेच स्पष्टीकरण पुढच्या अभंग २ व अभंग ३ मधे महाराजांनी केले आहे.***

**अभंग २ रा :-**
जॊ मुमुक्षु झालेला असतो त्याला हे समजलेले असते की आपल्या वासनाच सर्वप्रथम शुद्ध व्हायला हव्या. कारण वासना हेच जन्म मृत्यू चक्रामधे अडकण्याचे कारण असते.पण वासनांची शुद्धी करणे हे तेवढे सोपे नसते.
अशा व्यक्तीला ह्या अभंगामधे हाच उपदेश आहे की त्याने सरळ भगवंतालाच शरण जावे व लहान मूल जसे आईला सर्व कांही सांगते तसेच भगवंताकडेच आपले विचार व्यक्त करावेत.असे आपण जेंव्हां जेंव्हा प्रार्थना करतो तेंव्हा आपण करतच असतो.

**प्रार्थनेचे वैशिठ्य हेच असते की प्रार्थना करणाऱ्याला भगवंत आपली प्रार्थना नक्की ऐकणारच ही खात्री असते.**
अभंगाच्या पहिल्या चरणातच महाराजांनी " हे भगवंता मनामधे कुबुद्धी ( वासनांच्या मागे धावणारी बुद्धी) निर्माणच होऊ देऊ नकोस " ही प्रार्थना केली आहे

जर आपण भगवंताला नाशवंत वस्तूंची मागणी करणारी प्रार्थना केली तर भगवंत ते देईलही पण त्यामुळे आपणच स्वत:हून स्वत:ला जन्ममृत्यू चक्रामधे बांधत असतो. अशी प्राथना करणे हा कुबुद्धीचाच एक आविष्कार असतो हे लक्षांत घ्यायचे आहे.

पण जर आपण शाश्वत भगवंताच्या भेटीची वासना ठेवली तर मग आपण आपोआपच जन्ममृत्यूचक्रातून सुटू शकतो. कारण भगवंताची भेट म्हणजे त्याच्याशी ऐक्य साधणे होय.प्रभू रामकृष्ण परमहंस दृष्टांत देताना म्हणतात की " मिठाची बाहुली समुद्राची खोली मोजायला गेली व समुद्रच झाली. तसेच भगवद भेट होणे असते.

ही अशी भगवदभेटीची वासना सतत जागृत असणे अर्थातच आवश्यक आहे. व म्हणूनच अभंगाच्या पुढच्याच चरणामधे अशी प्रार्थना केली आहे की "हे भगवंता माझ्यामनामधे सतत तुझेच स्मरण असेल असे , माझ्या चित्ताने तुझे पाय धरून रहावे, असे भाव माझ्यामनामधे तू उत्पन्न कर; आणी असा जो भाव तुझ्या कृपेने उत्पन्न झाला आहे, तो तुझ्या कृपेनेच सिद्धीस जावो" .

**हे समजले आहे म्हणूनच अभंगाच्या शेवटच्या चरणामधे तुकाराम महाराज म्हणताहेत की " असे घडण्यापरता दुसर कोणताही लाभ आता मला नको आहे. "**

**अभंग ३ रा :-**

**असा भाव अंत:करणात उत्पन्न होण्यासाठी आपल्याला भगवंताच्या कर्तृत्वाची पूर्ण जाण असायला हवी. जर आपण स्वत:च्या आयुष्यातल्या घटनांकडे पाहीले व अफाट सृष्टीकडे रात्री जर नजर टाकली तर हे सहजच कळू शकते की " सर्वकर्ता,सर्वज्ञ, सर्वव्यापी असा तो भगवंतच आहे."**

**गीतेमधे भगवंत म्हणतात की**
**" ईश्वर: सर्वभूतानां हृद्देशे र्जून तिष्ठती।भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया॥१८-६१॥**
**अर्थ: हे अर्जूना, ईश्वर स्र्रव प्राणीमात्रांच्या हृदयात राहून यंत्रावर घातल्याप्रमाणे सर्व प्राण्यांना आपल्या मायेने फिरवत असतो."**

ह्या अभंगाच्या सुरवातीलाच म्हणूनच तुकाराम महाराज म्हणताहेत की माणसाने अयाचित वृत्तीने जगामधे वावरावे. पुढच्या दोन चरणांमधे महाराज आपल्याला हे सांगताहेत की

भगवंतावर विश्वास ठेवावा की तोच सर्वकाही आहे. आपला देह सुद्धा त्याच्याच मालकीचा आहे. तोच खरा कर्ता आहे आपण नव्हे.

**असे झाले की माणूस अयाचित वृत्तीने वागू लागतो.**

अयाचित म्हणजे कांहीही न मागता जे मिळेल त्यांत समाधान मानणे, जे घडते ते माझ्या भल्यासाठीच घडत आहे हे मनामधे दृढ ठेवणे होय. मग जेजे काम आपल्याकडे येते ते त्याचीच ईच्छा आहे हे समजून आपण ते काम त्याची पूजाच आहे ह्या भावनेने करू शकतो. ह्यामुळे आपले हवे -नकोपण संपायला लागते.

अर्थात ह्यासाठी स्वत:ला ह्याची सारखी आठवण करून द्यावीच लागते. प्रार्थना रोज केली की हळू हळू ही आठवण मनामधे ताजी राहाते मनाचा निश्चय होतो की भगवंत माझी सर्व काळजी घेतोच आहे.

अशा भक्ताचा योगक्षेम स्वत: भगवंत वाहतो. हे गीतेमधी दिलेले आश्वासन प्रसिद्धच आहे.

अभंगाच्या शेवटच्या चरणांत तुकाराम महाराज म्हणताहेत की **अशा प्रकारची मनाची स्थिती असणे हेच एक बळ ( शक्ती) आहे असें समजावे. बळ ह्यासाठी म्हटले आहे की हे बळच भक्ताला मोक्षस्थिती देते.**

**अभंगाची शिकवण :-**

**शिकवण हीच आहे की ज्याला आपल्या जन्माचे खरे सार्थ करून घ्यायचे आहे त्याने अनन्यभावाने सरळ भगवंतास शरण जावे . ह्यासाठी त्यालाच वेळोवेळी प्रार्थना करावी की त्यानेच मार्ग दाखवावा.**

*टीप :- समर्थ रामदासांचे खालील करूणाष्ट्क हे अशी प्रार्थना करण्यास उपयोगी आहे. ह्या प्रार्थनेमधे सर्व कांही मुद्दे येतात.*

*अशी प्रार्थना आपण रोज करू शकतो व ह्यासाठी फारतर ५ ते ७ मिनिटांचा अवधी पुरेसा आहे.*

समर्थांचे करूणाष्टक "   रघूनायका  मागणें  हें चि आंता "

उदासीन हे वृत्ती जीवी धरावी । अती आदरे सर्व सेवा घडावी ।
सदा प्रीती लागो तुझे गूण गाता । रघूनायका मागणे हेंचि आंता ॥ १॥
तुझे रूपडे लोचनी म्यां पहावे । तुझे गूण गाता मनासि रहावे ।
उठॊ आवडी भक्तिपंथेचि जाता । रघूनायका मागणे हेंचि आंता ॥२॥
मनीं वासना भक्ति तुझी करावी । कृपाळूपणें राघवे पूरवावी ।
वसावें मज अंतरी नाम घेतां । रघूनायका मागणे हेंचि आंता ॥३॥
सदा सर्वदा योग तूझा घडावा । तुझे कारणी देह माझा पडावा ।
उपेक्षू नको गूणवंता अनंता । रघूनायका मागणे हेंचि आंता ॥ ४॥
नको द्रव्यदारा नको येरझारा । नको मानसी ज्ञानगर्वे फुगारा ।
सगूणीं मज लावि रें भक्तिपंथा । रघूनायका मागणे हेंचि आंता ॥ ५॥
भवें व्यापलो प्रितीछाया करावी ।कृपासागरें सर्व चिंता हरावी ।
मज संकटी सोडवावे समर्था । रघूनायका मागणे हेंचि आंता ॥ ६॥
मनीं कामना कल्पना तें नसावी । कुबुद्धी कुडी वासना निरसावी ।
नकॊ संशयो तोडी संसारवेथा । रघूनायका मागणे हेंचि आंता ॥ ७ ॥
समर्था पुढे काय मागो कळेना । दुराशा मनीं बैसली हे ढळेना ।
तुटो संशयो नीरसी सर्व चिंता । रघूनायका मागणे हेंचि आंता ॥८ ॥
ब्रिदाकारणे दीन हांती धरावे । म्हणे दास भक्तासि रे उद्धरावे ।
सुटो ब्रीद आम्हांसि सांडून जाता ।रघूनायका मागणे हेंचि आंता ॥९ ॥

ॐ

**************

# भाग ६.३




ह्या भागामधे जागे झालेल्या मुमुक्षूला उपदेशपर अभंग आहेत.

ऐसा हा लौकिक कदा रखावेना । पतितपावना देवराया ॥ १ ॥
संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितं आळसी पोटपोसा ॥ २॥
आचार करितां म्हणती हा पसारा । न करितां नरा निंदिताती ॥ ३॥
संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासी ज्ञान नाहिं ॥ ४ ॥
धन नाही त्यासी ठायींचा करंटा । समर्थासी ताठा करिताती ॥ ५ ॥
बहु बोलोंजाता म्हणती वाचाळ । न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥ ६ ॥
भेटिसि न जातां म्हणती हा निष्ठूर । येता जातां घर बुडविलें ॥ ७ ॥
लग्न करूं जातां म्हणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥ ८ ॥
निपुत्रिका म्हणति पहा हो चांडाळ । पातकाचे मूळ पोरवडा ॥ ९ ॥
लोक जैसा ओक धरिता धरवेनां । अभक्ता जिरे ना संतसंग ॥ १० ॥
तुका म्हणे आतां आइका हे वचन । त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११ ॥

अभंगाचा शब्दार्थ:-

हे पतितपावन देवराया, मला लौकीक पद्धतीने जीवन जगता येत नाहीये ( कारण लोक दोन्ही बाजूने बोलतात ). संसार करीन म्हटले तर म्हणतात की हा दोषी आहे कारण पोटाला पोसण्यासाठीच जगतो आहे. आचार केला की म्हणतात की हा पसारा मांडूण बसला आहे. न करावा तर निंदा करतात. म्हणतात संतसंग करू म्हटले तर म्हणतात की हा उपदेश करतो आहे.न करावे तर माझ्यासारख्या अज्ञान्याला ज्ञान मिळणार नाही.सर्व समर्थ लोक माझ्यापाशी धन असल्यामुळे करंटा म्हणतात. फार बोलणे केले तर वाचाळ म्हणतात न केले तर गर्व आहे म्हणतात. जर कोणाला भेट्ण्यास नकार दिला तर म्हणतात की हा निष्ठूर आहे व ह्याने घर बुडवले.लग्न करू म्हटले तर म्हणतात की हा मातला आहे व नाही केले तर म्हणतात की हा नपूंसक आहे, निपुत्रिकाला चांडाल म्हणतात व अनेक मुले असतील तर म्हणतात की ह्याने पोरवडा वाढवला आहे. लोकांच्या म्हणन्याकडे जशी ओकारी हाती धरवत नाही तसच अभक्ताला संतसंग आवडत नाही. तुका म्हणतो की माझ्र वच ऐका . सर्व लाज सोडून हे जनहो तुम्ही भक्ती करा.

*अभंगाचा अर्थ समजण्यासाठीची माहीती :*

**आपण प्रत्येकजणाला सभोवतालच्या समाजातच रहायचे आहे. कोठेही गेलो तरी हेच आढळते की सर्व माणसांचा स्वभाव कांही बाबतीत सारखाच असतो, मग तो भारतीय असो वा पाश्चिमात्य असो किंवा पृथ्वीवर च्या कोठल्याही परदेशातला असो.**

ह्या सर्व समाजांच्या जीवन जगण्याबाबत कांही विशिष्ठ पद्धती असतात. पण कांही जणांना अध्यात्माबद्दल आपुलकी असते.

**वैदिक धर्मा मधे माणसाने चार आश्रमांप्रमाणे जीवन जगावे असे अपेक्षित आहे. पहिले म्हणजे त्याने आपली कर्तव्ये सर्वप्रथम योग्य रीत्या करावी., आपल्या कुटुंबाला जगण्या करता लागणारा पैसा अडका नीती न्याय्य मार्गाने मिळवावा , गृहथाने वंशवृध्दीसाठी कामाला पण जीवनांत योग्य स्थान द्यावे व शिवाय मोक्षप्राप्तीसाठी सुद्धा जरूर यत्नशील असावे.**

**ज्याला मोक्षाची कामना आहे अशा अशा प्रत्येकासाठी हा अभंग आहे.**
**अभंगाची शिकवण :**

बरेच वेळा असे दिसते की जर एखाद्याने परमार्थसाधना सुरु केली तर समाजाला वा त्याच्या कुटुंबातल्या माणसांना ते आवडत नाही.

ह्याचे कारण म्हणजे त्यांना वाटते की हा आता आपल्या कर्तव्याला विसरेल व घरातल्या मंडळींचे हाल होतील. अनेक कारणे असू शकतात.

ह्या संदर्भानुसार अभंगाच्या सुरवातिच्या चरणांचा अर्थ अगदी स्पष्ट आहे. सोपा आहे म्हणून येथे त्या भागाचे स्पष्टीकरण दिलेले नाही.फक्त तो भाग सध्याच्या मराठीमधे लिहिला आहे.

ऐसा हा लौकिक कदा रखावेना । पतितपावना देवराया ॥ १ ॥

हे देवा मला तुझी भक्ति करायची आहे व त्यामुळे लौकीक पध्दतीने मला जगता येत नाहि आहे. मला माहीत आहे की तूच माझ्यासारख्या पतिताला पावन करणारा आहेस.

संसार करितां म्हणती हा दोषी । टाकितं आळसी पोटपोसा ॥ २॥
जर मी स्वत:ची कर्तव्ये केली नाहीत व तुझे भजन करत राहिलो तर लोक मला आळशी फुकटखाऊ म्हणतील.

आचार करितां म्हणती हा पसारा । न करितांनरा निंदिताती ॥ ३॥
जर संसाराकडेच लक्ष दिले तर निंदा करून म्हणतील की हा स्वार्थी आहे व स्वत:च्या भल्या साठी ह्याने हा सर्व पसारा व्याप वाढविलेला आहे.

संतसंग करितां म्हणती हा उपदेशी । येरा अभाग्यासी ज्ञान नाहिं ॥ ४ ॥
जर संतसंग धरला तर ंहणतील की हा लोकांना उपदेश करतो जणू कांही बाकिच्यांना कळतच नाही असे ह्याला वाटते.

धन नाही त्यासी ठायींचा करंटा । समर्थासी ताठा करिताती ॥ ५ ॥
जर जवळ धन संपत्ती नसेल तर मग करंटा म्हणतील व असेल तर म्हणतील की ह्याला पैशाचा मद चढलेला आहे.

बहु बोलोंजाता म्हणती वाचाळ । न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥ ६ ॥
जर लोकांमधे बोलत बसेल तर म्हणतील की हा वाचाळ आहे, व न बोलल्यास गर्विष्ठ म्हणतील.

भेटिसि न जातां म्हणती हा निष्ठूर । येता जातां घर बुडविलें ॥ ७ ॥
जर कोणाशी फार जवळीक ठेवली नाही तर म्हणतील की हा निष्ठूर काळजाचा आहे व जनसंपर्क वाढवला तर म्हणतील की लोकांचे करून ह्याने घर बुडविले.

लग्न करूं जातां म्हणती हा मातला । न करितां जाला नपुंसक ॥ ८ ॥
लग्न करु म्हटले तर म्हणतात की हा मातला आहे व गुढ्घ्याला बाशिंग लावून बसला आहे. व न केले तर म्हणतात की हा नपुंसक आहे.

निपुत्रिका म्हणति पहा हो चांडाळ । पातकाचे मूळ पोरवडा ॥ ९ ॥
ज्याला मुलेबाळे नाहीत त्याला चांडाळ म्हणतात व ज्याला आहेत त्याला म्हणतात की ह्याने पोरवडा वाढवला कारण अनेक मुले असल्यानेच माणूस पातकी होतो.( त्यांचे पालन पोषण करण्याकरीता पातके करतो)

लोक जैसा ओक धरिता धरवेनां । अभक्ता जिरे ना संतसंग ॥ १० ॥
ज्याप्रमाणे ओकारी हातांमधे धरता येत नाही त्याच प्रमाणे ज्याला संतसंग हवा असतो त्याला संसारांत मग्न झालेल्याची संगत धरवत नाही.

**फक्त शेवटच्या दोन चरणांमधे तुकाराम महाराजांनी महत्वाचे जे कांही सांगितले आहे तेवढा भागच येते स्पष्टीकरणासाठी घेतलेला आहे.**

**महाराज म्हणतात जर तुम्हाला मोक्षाची वाटचाल करायची ईच्छा झाली असेल तर मग ईतर मंडळी काय म्हणतील त्या कडे लक्ष देऊ नका. व प्रयत्न सुरू करा. ( कारण येथे व्यक्तिगत भाव व साधानाच महत्वाची आहे. )**

**अभंगाची शिकवण:-**

**जोवर तुमच्या माअमधे भगवंताविषयी प्रेम व श्रद्धा आहे, जोवर तुम्ही स्वत:ची कर्तव्ये न विसरता बिनचुकपणे करता ( त्यांच्या कडे दुर्लक्ष करत नाहॊ आहात; तर मग भगवंताची मनापासून भक्ती करा. कोण काय म्हणतो ह्याकडे दुर्लक्ष करा )**

ॐ

****************************

**अभंग :- जन्म कां येतो? जन्म येण्याचे कारण,**

जन्मा येणे घडे पातकाचे मूळ । संचिताचे फळ आपुलिया ।। १ ॥
मग वांयाविण दु:ख वाटो नये । रुसोनिया काय देवावरी ॥ २ ॥
ठाउकची आहे संसार दु:खाचा । चित्ती सिण याचा वाटू नये ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचे नाम आठवावे । तेणें विसरावे जन्म दु:ख ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

आपण आपल्याच संचिताची फळे भोगण्यासाठी जन्म घेतो.॥ १॥
म्हणुन जर कांही दु:ख वात्याला अले तर देवावर रागावण्यात काय अर्थ आहे ?॥ २॥
तेंव्हा हा संसार दु:खमय आहे याचा विचार मनात आणून उगाच कष्टी होऊ नये ॥ ३॥
तुका म्हणतो की ज्याला जन्म दु:ख विसरायचे असेल त्यान नामस्मरण करावे ॥ ४॥

**अभंगामागची भूमिका :**

अभंगाच्या सुरवातीलाच तुकाराम महाराजांनी "संचित " हा शब्द उपयोगांत आणला आहे. ह्या शिवाय अनेक ठिकाणी कर्म हा शब्द सुखदु:खावर विवरणांमधे येतो. कर्म म्हणजे व्यक्तीने केलेल सर्व कार्य होय. **आपल्या कडच्या तत्वज्ञानाप्रमाणे प्रत्येक कर्माचे फळ हे अवश्य मिळते.**

**जे फळ त्या त्या जन्मी फळ मिळाले नाही तर ते संचितात जमा होते.**

अनेक जन्मांमधे एकत्र साठलेली अशी कर्मफळे म्हणजे संचित असे म्हणता येते. ह्यांपैकी प्रारब्ध म्हणजे जे फळ आपल्या ह्या जन्मांत मिळते ते आणी आगामी म्हणजे जे कर्म केल्यावर फळ भविष्यात मिळते ते कर्म.

आपल्या सर्व संतांनी सांगितले आहे की जेंव्हा माणसाला आत्मज्ञान होते तेंव्हा त्याच्या संचित व आगामी कर्मफळभोगांचा नाश होतो. अर्थात आत्मज्ञान झाले की संचिताची व आगामीची फल देण्याची शक्ति संपते.

ह्यासाठी भाजलेल्या बी चा दृष्टांत आहे. भाजली गेलेली बी कधीही नवे रोप जन्मास घालू शकत नाही तसेच आत्मज्ञान झाल्यावर संचिव आगामी दोन्ही फळे देवू शकत नाहीत.यांचे होते. उरते ते ते प्रारब्धाचे फळ. ते मात्र मृत्यूपुर्वी भोगून संपते. मग कांहीच उरले नसल्याने जन्माचे कारणच रहात नाही . ह्यालाच मोक्ष म्हणतात.

प्रसिद्ध भजगोविंदम् स्तोत्रमधे आचार्य शंकराचार्य म्हणतात
कुरुते गंगा सागर गमनम् । व्रत परीपालन अथवा दानम् ॥
**ज्ञानविहीनं कर्म अनेन । मुक्तिर्नभवती जन्म शतेन** ॥
अर्थात **जोवर आत्मज्ञान होत नाही तोवर मुक्तिची शक्यताच नाही. हेच सत्य श्रीमद् भगवद्गीतेमधे पण सांगितले आहे. संत तुकारामांचे पण हेच मत आहे.**

ईतर अभंगाचे विवरण पाहीले तर हा मुद्दा तेथे पण येतो. आपण सतत सुख व दु:खाच्या चक्रामधे फिरत असतो. आपली शास्त्रे ह्याचे कारण काय सांगतात तो भाग खालील प्रमाणे आहे.

आपल्या सर्व कृती ह्या स्वत:च्या " मी" म्हणजे मी कर्ता ह्या विचारांत घडत असतात. असेच आपण पुर्वीच्या अनेक जन्मांमधे करत आलो आहोत. केलेल्या कर्मफळाच्या ईच्छेनुसार संचित निर्माण झाले. त्याची बरीच फळे आपण ह्या जन्मात दु:ख रुपाने भोगत आहोत.

कर्माचा हा सिध्दांतच आहे की प्रत्येकाला त्याच्या कर्माचे फळ भोगावेच लागेल. सर्व कांही ह्या नियमानुसार आपल्या ह्या दृश्य जगामधे चाललेले आहे आपण कांही फळे ह्या जन्मी भोगतो तर कांही फळे पुढे केंव्हातरी नक्कीच भोगावी लागणार आहेत. त्यासाठी कोणतातरी जन्मपण घ्यावा लागणारच हे उघड आहे.

शास्त्रे म्हणतात की जशा वासना मृत्युसमयी उरलेल्या असतात त्यावासनापुर्तीसाठी जे शरीर तसे शरीर जीव धारण करतो व मग कर्मफळे भोगतो. मृत्यूसमयीच्या वृत्तीनुसार जीवात्मा माणसाचे, राक्षसाचे अथवा कोठ्ल्यातरी किडे वा प्राण्याचे शरीर अशा कारणांमुळे धारण करतो

**अभंगची शिकवण :**

**तुकाराम महाराज म्हणूनच पहिल्याच चरणामधे म्हणतात** की जन्म घेतला की सुख दु:ख हे भोगावेच लागणार आहे.

तसेच सर्वच संतपुरुष म्हणतात की आपल्याला "मी कौण आहे **?** “ ह्याचे म्हणजे स्वस्वरूपाचे विस्मरण झाले आहे व हीच सर्वांत मोठी चूक आपल्याकडून घडली आहे.

त्यामुळे आपण स्वत:पेक्षा भगवंत हा वेगळाच समजत आहोत. हरकत नाहि पण भगवंताला विसरणे हे मुख्य पाप आपण करत आहोत. स्वत:ला वेगळे समजण्यामुळेच आपण जन्म-मृत्यु चक्रामधे अडकलेलो आहोत.

पातंजल सूत्र “ मन एव मनुष्याणां कारणम बंधमोक्षयो:” मधे म्हटल्याप्रमाणे आपले मनच आपल्याला मदत करणारे असते. सर्वसाधारणत: प्रत्येक घटने मागे कांहीतरी कारण नक्कीच असते अशी आपली समजूत असते . पण बरेच वेळा कारण काय असावे हे आपल्याला प्रयत्न करूनही कळत नाही. खरेतर अशी कारणे शोधणे व्यर्थ असते. आपल्या पूर्वी केलेल्या कांही कर्मामुळे सुद्धा घटना घडलेली असू शकते. एवढे नक्कीच म्हणता येईल की भगवंत कांही मुद्दाम आपल्याला दु:ख देत नसतो. तो तर सर्व विश्वाचा निर्माता आहे. सर्व विश्वाचा कारभार त्याच्या नियमांप्रमाणे चालत असतो व आपण सारी त्याचीच मुले आहोत म्हणून तो कोणा एकावरच रागावला हे शक्यच नाही.

तुकाराम महाराज ह्याच मुद्द्यावर प्रथम भर देत आहेत. ते पुढच्या चरणामधे म्हणतात की माणसाने हे समजून घ्यावे व दु:खामुळे व्यथित होऊ नये. ह्या जगाच्या नियमानुसार आपल्यालापैकी प्रत्येकस हे सर्व दु:खभोग भोगावे लागतात.

**येथे एक प्रश्न मनामधे येतो तो हा की : - जर संचिता प्रंमाणेच सर्व कांही दु:खे येत असली तर मग त्यामधून मुक्त होण्यासाठी प्रयत्नांचे महत्त्वच राहात नाही!. मग कांही उपायच उपलब्ध नाही कां? कमीतकंमी दु:खाची तीव्रता कंमी होईल असातरी उपाय आहे कां? थोडक्यात म्हणायचे झाले तर प्रयत्न करायचेच नाहीत का? प्रयत्न केले तर त्यांचा कांही उपयोग होतो कां?**

**संत तुकाराम महाराजांनी ह्या सर्व प्रश्नांचे उत्तर अभंगाच्या शेवटच्या चरणामधे दिले आहे.**
**ते म्हणतात की उपाय आहे तो म्हणजे नामस्मरण करणे**
**श्री.रामकृष्ण संघाच्या श्री.शारदामातेने पण हाच " नामस्मरणाचाच" उपाय सांगितला आहे**
**माताजी म्हणतात की " नामस्मरण केले तर होणाऱ्या दु:खाची तीव्रता कमी होते. जर मोठ्या शस्त्राचा धाव होणार असेल , त्या ऐवजी सुई टोचेल व तुमचा भोग संपेल.**

इतर अनेक अभंगांमधे तुकाराम महाराज सांगतात कि प्रयत्नपूर्वक मनावर ताबा ठेवा . सर्वात उत्तम नामस्मरण करणे होय. संत रामदास स्वामी तर म्हणतात की योग्य प्रयत्न करणे महत्वाचे मग ते ऐहीक सुखासाठी असोत वा पारमार्थिक कारणासाठी असोत. काय करायचे व कशासाठी हे निवडण्याची प्रत्येकाला मुभा आहे.
**माझ्या मते हे प्रयत्न साधारणत: खालीलप्रमाणे असायला हवेत :-**

आपण अनेक वेळा नकळत भारी वजन उचलतो व पाठीस दुखणे स्वता:वर ओढवून घेतो, कधी नको ते बोलतो व त्यामुळे दु:ख भोगतो, किंवा गरज नसताना कांही करण्यचे आश्वासन देतो व नंतर याचा पश्चाताप होतो कारण दिलेला शब्द पाळता येत नाही. मग अर्थातच लोकांचे शिव्याशाप ऐकावे लागतात.कोणी रागवले ते ऐकून घ्यावे लागते. अनेक उदाहरणे देता येतात असे घडले की आपण स्वता:लाच सांगतो की असे व्हायला नको होते. पण धनुष्यामधून सुटलेला बाण परत घेता येत नाही हेच खरे.

दशरथ राजाने असेच तीन वर कैकेयीला विचार न करता दिले व पुढचे रामायण घडले. रामप्रभूंना १४ वर्षे वनवासात जावे लागले.

**अभंगाची शिकवण:-**
**पण जर आपण पुढे काय होईल ह्यावर विचार करून काम केले तर असे बरेचसे प्रसंग टळता येतात.**

ही विचार करण्याची सवयच लावून घ्यावी लागते. भगवंताने म्हणुनच माणसाला विवेक बुद्धी दिलेली आहे. पण आपण त्याकडे पुरेसे लक्षच दिले नव्हते. ही विचार करण्याची सवय लावण्यास पण बरेच प्रयत्न करावे लागतात. जन्मभर हे प्रयत्न सातत्याने सुरू ठेवावे लागतात. **अर्थात तरीहि दु:खे ही येतातच व म्हणूनच नामस्मरण करणे आवश्यक आहे. त्याचे जे फळ मिळायचे ते भगवंत देईलच ही श्रद्धा धरूनच नामस्मरंण करावे असे हा अभंग शिकवतो अशी माझी धारणा आहे.**

ॐ

**अभंग :- सर्व कामातून मोकळे झाल्यावर मग परमार्थ करू असे म्हणू नका.**

म्हणशीं होऊनि निश्चिंता । हरुनियां अवघी चिंता ॥ मग जाऊं एकांता । भजन करूं ॥ १॥
संसारसंभ्रमें आशा लागे पाठी । तेणें जीवा साटी होईल तुझ्या ॥ २॥
सेकीं नाडसील नाडसील । विषय्संगे अवघा नाडसील । मागुता पडसील। भवडोहीं ॥ ३॥
शरीर सकळ मायेचा बांधा । यासीनाही कदा आराणूक । ॥ ४ ॥
करिती ताडातोडी अंतर बाह्यात्कारीं । ऐंसें जाती चारी दिवस वेगां ॥ ५ ॥
मोलाची घडी जाते वायाविण । न मिळे मोल धन देतां कोडी ॥ ६ ॥
जागा होईं करीं हिताचा उपाय । तुका म्हणें हाय करिसी मग ॥ ७ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

जर तू म्हणशील की मी निश्चिंत होऊन मग एकांतात भजन करेन तर संसारातल्या भ्रमामुळे आशा पाठीशी लागेल व तुझी कुचंबणाच होईल ॥ १ +२॥
शेवटी विषयसंगामुळे तू नाडला जाशीला व भवडोहामधे बुडशील ॥ ३॥
हे शरीर शेवटी मायेमुळेच घडले आहे , याला कधीच विश्रांती नसते ॥ ४ ॥
धावपळिमुळे तुझ्या आयुष्याचे दिवस भराभर जातील ॥ ५ ॥
ह्या आयुष्यातला प्रत्येक क्षण मोलाचा आहे, कवडि देऊन अनमोल धन मिळत नाही ॥ ६ ॥
तुका म्हणतो की जागा हो , स्वत:च्या हिताचा उपाय कर अन्यथा हायहाय करत मरशील ॥ ७॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी माहिती :-**

**ह्या अभंगाचा अर्थ समजण्यासाठी त्यामागची भूमिका वगैरेची खरेतर मुळिच आवश्यकता नाही**

**अभंगाचा अधिकारी कोण आहे ? अभंग कोणासाठी आहे ?एवढे मात्र पाहाणे योग्य आहे.**

बरेच वेळा आपल्याला हे पटलेले असते की भगवद्‌भक्ती केलीच पाहिजे. पण अनेक कामे , उपाधी आपल्या मागे लागलेल्या असतात. कांही आप्ण लाऊन घेतलेल्या तर कांही जगण्यासाठी आवश्यक असतात.
**ह्या सर्वामधे आपण भगवद्‌भक्तीला दुय्यम स्थान देतो. अशा आपल्या सारख्या जीवांसाठी केलेला हा तुकाराम महाराजांचा कळकळीचा उपदेश आहे.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

तुकाराम महाराज म्हणताहेत की जर तुम्ही म्हणाल की सर्व कामे आटोपली की मी निश्चिंतपणे एकांतात जाऊन भगवंताचे भजन भक्ती करेन , तर असे करणे अत्यंत कठीणे आहे. कारण ह्या शरीरामागे लागलेल्या निरनिराळया उपाधींमुळे तुम्हाला एकांतात जायला वेळच मिळणार नाही .
त्यामुळे जरी मनाला फार पटले असेल की भगवद्‌भजन भक्ती करावी तरीही हे तुमच्याकडून होणार नाही.कारन मन विषयांमगेच लागलेले आहे. ह्यामुळे एवढे मात्र नक्की की तुम्ही सतत ह्या भवसागरांत बुडून जाल. शेवटी ह्या कुचंबणेतच सर्व आयुष्य संपेल. तुम्ही हे लक्षांतघ्या की आय्ष्यातला प्रत्येक क्षण मोलाचा आहे. तसेच फक्त माणसालाच भक्तीकरून मोक्षाची प्राप्ती करून घेण्याची क्षमता देवाने दिलेली आहे . म्हणुन हा नरदेह अत्यंत मोलाच खरेतर अनमोल आहे. त्यामानाने विषयांपासुन मिळणारी सर्व सुखे ही कवडिमोल ठरतात. म्हणुन जागे व्हा. नरदेहाची अशी ही अनमोल संधी व्यर्थ घालवू नका. अन्यथा हाय हाय करण्याविना दुसरे कांहीही हाती लागणार नाही.

**अभंगाची शिकवण :-**

आतापर्यंत जरी आयुष्य भगवद्भक्तीविना घालवले असले तरीही आता तरी शाहाण्या माणसाने पुढे असे न वागणेच श्रेयस्कर आहे.

ॐ

*************

**अभंग :- परमार्थासाठी संसार सोडाव लागत नाही.**

युक्ताहार न लगे आणिक साधन । अल्प नारायणे दाखविले || १ ||
कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटि ॥ २ ॥
न लगे लौकिक सांडावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड । ३ ॥
तुका म्हणे मज आणिक उपाव । दिसती ते वाव नामेंविण ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

नारायणाने मला हे दाखविले आहे की फक्त युक्ताहार म्हणजे आहार अगदी कमी नको वा फार जस्त नको नसावा॥१॥
कलियुगा मधे नारायणाचे किर्तन केले तरी तो भेट देतो ॥ २ ॥
त्याच्या भेतीसाठी आपला लौकिक व्यवहार सोडावा लागत नाही किंवा जंगलात जाऊन भस्म दंड म्हणजे सम्न्यास घ्यावा लागत नाही ॥३॥
तुकाराम महारज म्हणतात की मला नामस्मरना शिवाय दुसरा उपाय ( नारायणाच्या भेटीसाठी) आढळत नाही ॥ ४॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी कांही माहिती :**

आपल्या शास्त्रांमधे ईश्वरप्राप्ती साठी निरनिराळ्या पद्धती मार्ग सांगितले आहेत.
( उदाहरणार्थ : नवविधा भक्ति मार्ग , ज्ञान मार्ग ज्यामधे आपण "मी कोण आहे ? माझे खरे स्वरूप काय आहे? माझे आणी ईश्वराचे काय नाते आहे? अश्या प्रश्नांची उत्तरे

शोधतो ), योगमार्ग म्हनजे हठयोगाचामार्ग, संन्यास घेणे, निर्निराळयातीर्थयात्रा करणे, निर्निराळया पूजा व यज्ञ करणे इत्यादी ). हे सर्व मार्ग एकाच ध्येयाच्यापूर्ती साठी म्हणजे मोक्षप्राप्तीसाठी सांगितले आहेत.
ह्या सर्व मार्गांमधे मानसाला शक्ति, वेल व पैसा खर्च करावा लागतो. संसारातली कामे पाथीशी असल्यामुळे माणूस निराश होऊन आपला अभ्यासच सोडण्याचा येथे संभव आहे. थोडक्यांत असेच म्हणता येईल की परमार्थसाधना कर्णे संसार करतांना कठीण होते.

आधी पाहिलेल्या अभंगाचा अर्थ लावतांना आपण हे पाहिले होते की निरनिराळया युगांमधे निरनिराळी साधना केली जात असे. सध्या आपण कलियुगामधे आहोत. साधारणत: ४००० वर्षांपूर्वी महाभारत युद्ध संपल्याच्या वेळेपासून कलियुग सुरु झाले. कलियुगामधे सर्वसाधारण मनुष्य हा स्वत:च्या संसारामधे गुंतलेला असतोव आहे. त्याला परमार्थसाधनासाठी वर वर्णन केली मार्ग चोखाळणे कठीण होऊन बसले आहे. ह्यामुळेच तो जन्म-मृत्यु चक्रांमधे अडकलेला असतो.
दिलासा देताहेत.
.
येथे तुकाराम महाराजांचे समकालीन समर्थ रामदास स्वामींचे ह्या विषयावरचे विवेचन खुलासा करणारे आहे.
समर्थ म्हणतात :
आधी प्रपंच करावा नेटका। मग घ्यावे परमार्था विवेका। येथे आळस करू नका विवेकी हो ॥ 1 || प्रपंच सांडून परमार्थ कराल। तेणे तुम्ही कष्टी व्हाल। फ्रपंच परमार्थ कराल |तरी तुम्ही विवेकी॥२॥ प्रपंच साडून परमार्थ केला। तरी मिळेना अन्न खायाला। मग तया करंट्याला।परमार्थ कैसा|| ३॥ परमार्थ सांडुन प्रपंच करिसी । तरी तू येमयातना भोगिसी । अंती परम कष्टी होसी | येमयातना भोगिता ॥४ ॥
ह्या ओव्यांचा सलग अर्थ:
विचारवंत मानसाने प्रपंच व परमार्थ विवेकाने नीति न्यायने वागून सुव्यवस्थितपणे करावा. ह्याबाबतीत मुळिच आळस करू नये. जर तुम्ही फक्त परमार्थाकडेच लक्ष दिले व प्रपंचाकडे दुर्लक्ष केले तर तुम्हाला नीट जेवायला सुद्ध मिळणार नाही. तसेच

जर फक्त प्रपंचच कराल तर तुम्हाला यमयातना भोगाव्या लागतील. ( जन्ममरणाच्या चक्रामधे अडकल्याने माणसाला अनेक जन्म ह्या अश्या यातना भोगाव्या लागता हे आपण पुर्वी पाहिलेच आहे!) **नेटका प्रपंच म्हणजे जरूरीपुरता प्रपंच करणे.**

य़ेथे आपल्याला हाच संदेश आहे की तुम्ही व्यवहार व परमार्थ दोन्हीकडे सारखेच लक्ष द्यायला हवे. यामुळे व्यवहारात यश मिळेल आणि परर्मार्थामधे आपले मोक्षाचे ध्येय पण साध्य होईल.

अनेक संतमंडलींनी उदा. तुकारम महाराज, एकनाथ , नामदेव व असे अनेक संत गृहस्थाश्रमी होते पण त्यांना आत्मज्ञान प्राप्त झाले. म्हणुनच संसार सोडणे आवश्यक नाही; संसाराची आसक्ती सुटणे महत्वाचे आहे हेच स्पष्ट होते.

संसारात राहूनही भगवंताची भक्ती करता येते व म्हणुनच तुकाराम महाराजांनी आपल्याला ह्या अभंगामधे " नामस्मरण भक्तीच मला योग्य वाटते" हे अभंगाच्या शेवटच्या चरणा मधे सांगितले आहे.

जेंव्हा मनुष्य नामस्मरण सुरु करतो तेंव्हा ते प्रथम वैखरी वाणी मधे करणे सोपे असते. वैखरीतले नामस्मरण दुसऱ्याला ऐकू येते. पण असे स्मरण करणे जर चालू ठेवले तर हळूहळू स्मरण मध्यमेमधे म्हणजे पुटपुटल्य़ाप्रमाणे होते. जसा जसा देवाविष्यी प्रेम, भक्तिभाव वाढू लागतो तसेतसे स्मरण पश्चंती म्हणजे मनात सुरु होते.

ह्या स्थितिमधे आपण स्वत:ची व्यवहारामधली कामे करू शकतो व स्मरणक्रिया पण चालू राहते.

**अभंगाची शिकवण :**

तुकाराममहाराजांना असेच स्मरण असावे असे बहुधा म्हणायचे असावे. ही स्मरणाची स्थिति सतत प्रयत्नांनीच येऊ शकते . ह्यासाठीच सरावाचे महत्व महाराजांनी ह्या अभंगामधे सांगितले आहे.

निदान मला तरी ह्या अभंगाचा असाच अर्थ आहे असे वाटते.

ॐ

**************

**अभंग :- मनाला लगाम घालावा**

होउं नको कांही मना या आधीन । नाईकें वचन याचेंकांही ॥ १॥
हटियाची गोष्टी मोडून काढावी । सोई ही धरावी विठोबाची ॥ २॥
आपुले आधीन करूनियां ठेवा । नाहीं तरी जीवा घातक हें॥ ३॥
तुका म्हणें झाले जे मना आधीन । तयांसी बंधन यम करी ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

मनाच्या आधीन होऊ नकोस. मनाचे ऐकू नकोस ॥१॥
हट्टीपणाने मन माहते त्याकडे दुर्लक्ष करावे व विठोबाची सोय धरावी.॥२॥
मनाला स्वत:चे गुला म कऋन ठेवा अन्यथा जीवाचा घात होईल॥३॥
तुका म्हणतो की जे मनाचे गुलाम झाले त्यांना यम बांधून नेतो॥४॥

**अभंगामागची भूमिका :-**

आपला नेहमीचाच अनुभव हाच आहे की आपल्याला सुख किंवा दुख: कांही वेळापर्यंतच भोगावे लागतात. सुखभोगाने आनंद तर दुख:भोगाने दुख: अनुभवास येते. ह्याशिवाय आणखी एक परिणाम आपल्या न कळत होतो तो म्हणजे ह्या भोगांची आठवण आपल्या चित्तामधे बीजरुपाने साठविली जाते. ही आठवण जेंव्हा पुन: उफाळून वर येते तेंव्हा आपल्याला तोच भोग परत घ्यावासा वाटतो. ह्यालाच वासना जागृत होणे पण म्हणतात.
उदाहरणार्थ जर आनंदाचा भोग घेतला गेला तर त्याचे बीज तोच आनंद परत मिळावा ह्या रूपाच्या विचाराने पुढे कधीतरी प्रगट होते. दुख:भोगाचे बीज कधी सूड व प्रतिशोधाचे रुप घेते तर कधी असा भोग पुन: नकॊ असे रूप घेते. ह्या बीजकोशाचेच एक नांव संचित असे आहे.
अशी वासनेची बीजेच आपल्याला पुन:पुन: जन्म घ्यायला लावतात.

हे सर्व घडते ते आपला मनावर ताबा नसल्यामुळे घडते . आपण मन सांगते तसे वागतो.
हा अभंग ह्या संदर्भातलाच आहे .
**टीप :- हा अभंग मनावर ताबा ठेवायला सांगतो. ह्यासाठी मनाचे कार्य कसे चालते हे समजणेआवश्यक आहे. पण हा विषय वेगळा व बराच मोठा आहे. तसेच मनावर ताबा ( आपले**

**ध्येय भगवद्‌भेटिचे आहे) करण्यास काय करता येते त्याबद्दल पण जे समजले त्या मुख्य तत्वाचेच फक्त वर्णन येथे केले आहे.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण:- :-**

अभंगाच्या पहील्याच चरणामधे असे सांगितले आहे की आपण मनाचे गुलाम होऊ नये.

मनाच्या अनेक गुणांपैकी आठवण राहणे हा मनाच एक महत्वाचा गुण आहे. आपल्या पाच इंद्रियांच्यापैकी कोणत्यातरी इंद्रियाने आनंद वा दुखांची आपल्याला आठवण राहते. आपले सर्व जीवनच आठवणिवर चालत असते. जन्म झाल्याबरोबर ही आठवण राहण्याची क्रिया सुरू होते.

साधे उदाहरण पाहूया.

समजा एखाद्याने आंबा कधीही पाहिला नव्हता. तो त्याने पाहिला व चाखला. असे केल्याबरोबर त्याच्या आठवणीच्या कोशामधे आंबा पिवळा असतोव त्याची चव मधूर असते ह्या अनुभवाचीच आठवण तयार होते. खाताना झालेला आनंद तात्पुरताच पण आठवण मात्र नेहमीकरता चितामधे उरते.ह्यालाच वासनाबीज असेही म्हणतात.नंतर उन्हाळा आला व नुसती आंब्याचे चित्र असलेली जाहिरात पाहिली, तर पुन: आंबा खाण्याची वासना वर ऊफाळून येते. अर्थात आठवण हीच मनामधे वासनाबीज रुपे मनामधे राहिलेली असते म्हणूनच असे घडते.

पण जर मधल्या काळामधे अशा माणसाला मधुमेह झाल्याचे निदान झाले असेल तर अशी वासनापूर्ती त्याने केल्यास ते आनंदाऐवजी दुखा:चे कारण होते. ***अशा माणसाने निग्रहपूर्व आंबा खाल्ला नाही तरी वासनेचे बीज मनामधे उरलेलेच असते. अशी बीजेच पुनर्जन्माचे कारण बनतात पुढच्या जन्मामधे नवी बीजे तयार होतात.***

ह्या बीजांचे वर्गीकरण करायचे झाले तर लोकेषणा, दारेषणा( पुत्रेषणा) , वित्तेषणा , सूडाची ईच्छा इत्यादी करता येते. कोणतीही ईषणा ०( वासना ) जर अपूर्ण असेल तर ती पुढच्या जन्माला कारणीभूत होते, हे आपण वर पाहिलेच आहे.

ह्या सर्व वासना , ईच्छा सतत मनामधे येत राहतात म्हणूनच तुकाराम महाराज पहील्याच चरणात सांगताहेत की वासनांचे गुलाम होऊ नका. ह्यासाठीच मनाचे ऐकू नका असे ते म्हणतात.

अध्यात्मातला एक सिद्धांत हाच आहे की वासनापूर्ती न झाल्यामुळेच प्राण्याला पुन:पुन: जन्म मृत्यूचक्रामधे अडकावे लागते. माणसाच्या जन्माचे मुख्य उद्देश्य भगवंताची प्राप्ती हेच आहे व वासनापूर्तीमागे लागल्यामुळे ते दूरच राहते. भगवंताचे दर्शन/प्राप्ति झाली की मगच जन्ममृत्यूचक्रामधून जीवाची कायमची सुटका होते.

**तुकाराम महाराजांचा आजचा अभंग मनावर ताबा कसा मिळवावा हेच सांगतो.**

**येथे प्रश्न असा येतो की हे कसे साधायचे.?** ह्याच प्रश्नाचे उत्तर पुढच्याच चरणात येते.
उत्तर हेच आहे की चांगल्या वासनेने अशुभ वासनेला बाजूला करा. ह्यासाठीच प्रयत्नाचे महत्व आहे. चांगल्या वासना म्हणजे ज्यांच्यामुळे पुढचा जन्म घ्यायची पाळी येणार नाही त्या वासना.

**भगवंता बद्दल प्रेमभावना असल्याने त्याचीच भेट व्हावी ही सर्वांत शुभ वासना होय. भगवंत आपल्याला दिसत नाही पण तो आहेच हे सत्य आहे. तोच खरेतर आपली आई आहे व त्याला आपल्या मनातले सर्व कांही कळत असते. म्हणून आपण जर त्याचे स्मरण कोणतेही नांव घेऊन उदा. विठ्ठल विठ्ठल किंवा श्रीराम जयराम जयजय राम , ॐ नम:शिवाय इत्यादिपैकी कोणत्याही नामाने करू शकतो. हे स्मरण हट्टाने जबरदस्त प्रयत्न करून करावे असे पण महाराज सांगतात.**

अभंगाच्या पुढच्या चरणामधे ( ३ रा) महाराज परत असे सांगतात की असे प्रयत्न जर तुम्ही केले नाही तर परत जन्म-मृत्यू चक्रामधे अडकावे लागेल. थोडक्यात म्हणजे असे स्मरण न करण्याने तुमचीच हानी होणार आहे.

अभंगाच्या शेवटच्या चरणामधे ( ४ था) महाराज हाच मुद्दा वेगळ्या पद्धतीने पुन: सांगताहेत. महाराज म्हणतात की जर तुम्ही अशा वागणुकीने मनावर ताबा ठेवला नाही तर मग यमदेवता मृत्युदेवता तुम्हाला पुन: ह्या शरीररूपी तुरुंगात टाकेल . तेंव्हा सावध व्हावे.

**अभंगाची शिकवण :**

जरी आपल्या वासना समूळ नष्ट करता येत नाहीत तरी पण आपण कमीतकमी हा प्रयत्न करू शकतो की आपल्या वासना शुभ असाव्या. कारण शुभ वासनाच आपल्याला जन्ममृत्युचक्रामधून शेवटी सोडवितात.

ॐ

*************

**अभंग :- परस्त्रीला मातेसमान मानावे.( दारेषणेवर ताबा ठेवण्याचा उपाय)**

पराविया नारी माउली समान । मानिलिया धन काय वेचे ॥ १ ॥
न करीतां परनिंदा परद्रव्य अभिळस । काय तुमचें यास वेचें सांगा॥ २ ॥
बैसलिये ठायीं म्हणतां रामराम । काय होय श्रम ऐंसे सांगा ॥ ३ ॥
संतांचे वचनीं मानितां विश्वास । काय तुमचें यास वेचे सांगा ॥ 4 ॥
खरें बोलतां कोण लागती सायास । काय वेचें यास ऐंसे सांगा ॥ 5 ॥
तुका म्हणे देव जोडे याचसाअठीं । आणिक ते आटी न लगे कांहीं ॥ 6 ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

जर परनारीला आईसमान मानले तर त्यांत तुमचे काय जाते? ॥ १॥

मला सांगा की परनिंदा, परद्रव्याची अभिलाशा न धरण्यात तुमचे काय नुकसान होते?॥ २॥

एके ठिकाणी बसून राम राम म्हणण्यास तुम्हाला काय श्रम होतात? ॥ ३॥
संतांच्या वचनांवर विश्वास ठेवण्यांत तुमचे काय धन खर्च होते?॥ ४॥
खरे बोलण्यास तुम्हाला काय प्रयत्न करावे लागता. खरे बोलण्यांत तुमचे काय जाते? ॥ ५॥
तुका म्हणतों की ( जसे ह्या सर्वासाठी कांहीही खरच करावा लागत नाही तसेच ) भगवंताशी नाते जोडण्यास पण कांही श्रम लागत नाहीत॥ ६॥

ह्या अभंगात तुकाराम महाराज हेच सांगताहेत की भगवद्‌भेटीसाठी फारसे श्रम करावे लागत नाहीत. हे कसे ते पुढे लिहिलेल्या विवरणात येते.

**अर्थ समजण्यासाठी लागणारी अभंगमागची भूमिका व माहिती :-**
अभंगाच्च अर्थ समजण्यासाठी खरेतर कांहिही माहिती आवश्यक नाही. पण जर संतांची चरित्रे वाचनांत असतील तर ते जरूर उपयोगी पडेल. संतांचे आचरण "जसे बोलणे तसे वागणे" असे असते एवढे जरूर लक्षांत घेणे योग्य राहील.

**अभंगाचे अर्थ स्पष्टीकरण :-**
**अभंगाच्या १, २ व ५ ह्या चरणांचा अर्थ सोपा आहे .**
**१ ला चरण :-** तुकाराम महाराज येथे उपदेश देताहेत की प्रत्येक परक्या स्त्रीला ती आई आहे ह्या भावनेनेच पहावे. अशी दृष्टी असली की स्त्रीला पाहून मनामधे ईतर वाईट विचारच येत नाहीत. श्री. रामकृष्ण परमहंस हे सुद्धा म्हणत की जेंव्हा एखादी स्त्री दृष्टीस पडेल तेंव्हा तुम्ही आईला ( जगन्मातेला) आठवा , मग तिच्या पाऊलांकडे प्रथम बघा. असे केले की तुमच्या मनांमधे स्त्रीबद्दल वाईट विचारच येणार नाहीत. ( संदर्भ: The gospel of sri. Ramakrishna page 701) . ते पुढे म्हणतात कि आदिशक्तीनेच सर्व स्त्रीरूपे धारण केलेली आहेत. म्हणुनच मी सर्व स्त्रीयांना आई जगदंबा म्हणून पाहतो. आई हे स्त्रीरुप सर्वांत शुद्ध स्वरूप आहे . ह्या ठिकाणी कोठेही थोडेही पंचेद्रियांना आकर्षण वाटावे असे अंश नाहीत.

**अभंगाच्या २ ऱ्या कडव्यांत महाराज म्हणतात की** माणसाने मत्सर ह्या भावनेच्या प्रगट होण्याकडे विषेश लक्ष केंद्रित करावे. जेंव्हा कोणाचे संपत्तीचे प्रदर्शन आपण पाहातो तेंव्हा

परोत्कर्ष द्वेष, मत्सर, हेवा ह्या भावना जन्म घेतात. आपल्याला पण असे वैभव मिळायला हवे हे बीज तयार करतात व वैभव मिळावे म्हणुन पु:न जन्म घेण्याची तजवीज नकळत तयार होते. म्हणून या बाबतीत अत्यंत जागरूक रहा असे महाराज म्हणतात.
कॊणाचीही निंदा करूनका असे पण महाराजांनी पुढे सांगितले आहे. जेंव्हा कॊणी निंदात्मक बोलतो तेंव्हा स्वत:च्याच अंत:करणामधे तो द्वेषाच्या भावनेला थारा देत असतो. ह्या बीजाचा वृक्ष होण्यास फार वेळ लागत नाही व मग माणुस नको ते करतो. त्याचे फळ कधीतरी भोगावेच लागते. म्हणुन निंदा न करण्यामधे हे सर्व होणे टाळले जाते.

**तिसऱ्या कडव्यांत** तुकाराम महाराजांनी हेच आपल्या लक्षांत आणुन दिले आहे की " नामस्मरण करण्यासाठी ( रामनाम किंवा कोणतेही दुसरे नाम ) कांहीही कठीण प्रयत्न करावे लागत नाहीत. फक्त नामजप मनांत करायचा, किंवा कॊणत्याही पद्धतीने नाम सतत घ्यायचे एवढे पुरे. ह्यामुळे नामस्मरण करण्याची आपल्याला सवय होते. मग कोठेही , जसे गाणी ऐकताना, टेलिव्हिजन पाहाताना भगवंताचे नामस्मरण करणे **सहज** होते.

**अभंगाचा चौथा चरणाकडे मात्र अधीक लक्ष देणे आवश्यक आहे कारण येथे महत्वाची शिकवण आहे.**

**येथे महाराज म्हणतात की संत जे सांगतात त्यावर विश्वास ठेवावा.**
शिवाजी महाराजांचे गुरू स्वामी समर्थ रामदास यांच्या दासबोधग्रंथाच्या " संतस्तवन " समासामधे संतांचे यथार्थ वर्णन आहे.त्यातली खालील ओवीचरण संतांचे वर्णन करणारी आहे .
जे वस्तु परम दुल्लभ। जयेचा अलभ्य लाभ। तेंचि होये सुल्लभ। संतसंगेकरुनी॥
माहाराजे चक्रवर्ती। जाले आहेत पुढे होती । परंतु कोणी सायोज्यमुक्ति। देणार नाही ॥
जे त्रैंलोकी नाही दान। तें करिती संतसज्जन। तयां संतांचे महिमान। काय म्हणोनी वर्णावे॥
**ह्यांचा शब्दार्थ जरी पाहिला तरी संतांचा महिमा कळतो.**
ह्या ओव्यांचा एकूण अर्थ खालील प्रमाणे आहे.

परमात्मवस्तू ( परब्रह्मप्राप्ती) अतिशय दुर्लभ आहे. ती मिळणे हाच अलभ्य लाभ आहे. ती दुर्लभ वस्तू संताच्या संगतीने सुलभरीतीनें लाभते. आजपर्यंत जगामधें कित्येक महाराजे, चक्रवर्ती राजे झाले, सध्याही आहेत. पुढेही होतील. पण यांपैकी कोणीही सायुज्यमुक्ति देऊं शकणार नाही. संत विलक्षण दानशूर असतात व आपले सामर्थ्य उदारपणे दुसऱ्याला सहाय्य करण्यासाठी वापरतातत. त्रैलोक्यांत शोधलें तरी सापडणार नाही असे अलौकिक दान संत देतात. त्या संतांचा थोरपणा कोणत्या शब्दांत वर्णन करायचा? वर्णन करताच येत नाही.
हे संतांना कां शक्य होते ह्याचे कारण म्हणजे संत जीवन्मुक्त असतात. त्यांना आपण ब्रह्मज्ञानी म्हणुन ओळखतो.
असे हे ब्रह्मज्ञान फक्त संतच देऊ शकतात. संत स्वत: ब्रह्मज्ञानी असतात. जन्म-मृत्युवर विजय मिळवलेले असतात. थोडक्यांत सांगायचे झाले तर संत हे मनुष्यरूप घेतलेले प्रत्यक्ष परब्रह्मच असतात. अव्यक्त परब्रह्मच संतरूपाने अवतरित झालेले असते.

एक गोष्ट स्पष्ट होते ती म्हणजे अशा संतांचि वाणी म्हणजेच परमेश्वरी वाणी होय.

**आपण सगळेचजण द्वैता मधे आहोत. आपल्याला कळेल असे शब्दाअंचे साधनच भवपार करू शकते. त्यासाठीच संत अवतरित होतात व आपल्याला समजेल अशा भाषेंत उपदेश करून मोक्ष अर्थात ब्रह्मज्ञान मिळवण्याचा मार्ग दाखवतात.**
**म्हणूनच अभंगाच्या ४थ्या चरणामधे तुकाराम महाराज म्हणतात की " रामराम म्हणा, नामस्मरण करा. त्यासाठी फक्त तुमची संतवचनांवर श्रद्धा हवी".**

**अभंगाच्या ५ व्या चरणात** महाराज आपल्याला नेहमी खर बोला असे सांगताहेत. तएच ६व्याचरणांत शेवटी तुकाराम महाराजंनी खात्री दिली आहे की इतर कांहि प्रयत्न करण्याची तुम्हाला गरजच नाही. फक्त ह्याअभंगाप्रमाणे आचरण केले तरी पुरे आहे. .
**धर्मराज युधिष्ठीराला अर्धसत्य बोलल्यामुळे नरकाचेच दर्शन घडले. जर आपण नेहमी खोटे बोललो तर आपल्याला पण नरक पाहावा लागेल. त्या पेक्षा खरे बोललेलेच बरे.**

**हाच उपदेश इतर अनेक संतांनी केलेला आहे. भक्तिमार्गामधे नामस्मरणाला महत्व आहे कारण नामस्मरण हा एक सोपा मार्ग आहे.**

**अभंगाचा अर्थ व शिकवण :** ही वरील प्रमाणे असावी असे मला वाटते.

ॐ

**********

**अभंग :- देव फक्त भावाचा भुकेला असतो.**

न ये तुज जरी मधुर उत्तर । दिधला सुस्वर नाहीं देवें ॥ १ ॥
नाहिं तयाविण भुकेला विठ्ठल । येईल तैसा बोल रामकृष्ण ॥ २॥
देवापाशी मागे आवडिची भक्ती । विश्वासेंशी प्रीती भावबळें ॥ ३ ॥
तुका म्हणें मना सांगतो विचार । धरावा निर्धार दिसेदिस ॥ ४॥.

**अभंगाचा शब्दार्थ :-**

जरी तुला देवाने गोडगळा दिलेला नाही तरी तुला जसे जमेल तसे रामकृष्ण म्हणत रहा , विठ्ठल हा भावाचा भुकेला आहे.॥ १ + २ ॥
देवाकडे ( त्याला ) जी आवडते ती भक्ति, प्रेम व त्याच्यावर दृढ विश्वास माग. ॥ ३॥
तुका म्हणतो हे मना तुला सांगतो तो विचार ऐक. भक्ती करण्याचाच निर्धार रोज करावा ॥ ४॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठीची भूमिका :-**

आपले संत, तसेच शास्त्रे सतत हेच सांगतात की माणसाचा जन्मच भगवंताला भेटण्यासाठी म्हणजेच मोक्षपदाची प्राप्ती करून घेण्यासाठी झालेला आहे. ह्या साथीचे प्रयत्न, शोध हा कांहिना कांही कारणांमुळे सुरू होतो. भौतिकाशास्त्रज्ञ हे शोधायचा प्रयत्न करतात की आपल्या

ह्या ब्रह्मांडाचा उगम कसा झाला व त्यामधे आपले स्थान कोणते? पण सर्वसामान्य माणसाला कांहीतरी दु:खे भोगावी लागतात व त्यांमधून पूर्णत: सुटण्याचा मार्ग आहे कां ते हवे असते.
एवढे मात्र नक्की खरे की ह्यासर्व ब्रह्मांडाचा कारभार चालवणारी कोणतीतरी शक्ती आहे. तिलाच आपण देव म्हणतो. असा देव आहे हे पटलेले असते व त्याने माझी दु:खे दूर करावी ह्या उद्देशाने माणसे देवाची भक्ती करण्यास प्रवृत्त होतात.
आपल्या संतानी भक्ती कशी करावी ह्या साठी सोप्या भाषेंत मार्गदर्शन केलेले आहे.
येथे एक प्रश्न पडू शकतात की १) भक्ती करायची म्हणजे नक्की काय करायचे? २) हा अभंग कोणासाठी असावा?३) भक्ति करण्यास काय पात्रता लागते?
ह्या तीनही प्रश्नांचे उतार हेच आहे की ज्याला स्वत:ची कर्तव्ये करायची आहेत व शिवाय मोक्षाची ईच्छा धरून आहे त्याच्यासाठीच हा अभंग तुकाराम महाराजांनी सांगितला आहे.

तुकाराम महाराज अभंगाच्या पहिल्या दोन चरणांमधे म्हणतात की भगवंताची भक्ति करण्यासाठी लागतो तो मुख्य भाव.
हा भाव प्रेमाचा हवा. येथे रामकृष्ण परमहंसांचे एक वचन आठवते. ते म्हणतात की नवजात बाळावरचे आईचेप्रेम, कृपणाचे पैशाविषयिचे प्रेम व पतिव्रतेचे पतीवरचे प्रेम ह्या सर्वांस एकत्र घेतले तर जी प्रेमभावना असेल तसे देवावर प्रेम असावे. असे प्रेम म्हणजेच देवावरची भक्ती."

असे प्रेम निर्माण झाले की भक्ताला देवाशिवाय दुसरे कांही नकॊ असे वाटते. देवाच्याच ईच्छेनुसार जे घडते त्यांत तो आनंद मानतो. मग तो फक्त भगवंताचेच स्मरण करत असतो.
तुकाराम  महाराज आपल्याला हेच येथे सांगताहेत की " अशा भक्तिभावाने त्याचे नांव जसे " रामकृष्ण " तुम्ही घ्या , ध्यानात ठेवा, त्यासाठी गोड गळ्याची आवश्यकता नाही. विठ्ठल म्हणजे भगवंत अशाच भावाचा भुकेला आहे.

अभंगाच्या ३ व ४ थ्या चरणांमधे महाराज सांगताहेत की तुमचा मनाला मी एक विचार सांगतो आहे. तो म्हणजे देवाजवळ मागायचे तर अशी भक्ती दे हेच मागावे. मी अशी भक्ती करेन असा रोज दिवसेदिवस निर्धार करा.

ह्याचा अर्थ असा की सुरवातीला अशी भक्ति निर्माण होणे सहज नाही. त्यासाठी निश्चयपूर्वक कांही प्रयत्न पण दिसेदिस म्हणजे रोजच करावे लागतील.

हे प्रयत्न म्हणजे
१)मनाने मी त्याचे विस्मरण होऊ देणार नाही असा प्रयत्न कराव लागेल. जर आपण मनाला सतत भगवंताचेच स्मरण करण्याची मनाला सवय लावली तर हे शक्य आहे.
2) जे करावे लागेल ती त्याचीच पूजा म्हणुन ते काम नीटपणे करणे ३) तसेच जर होणारी प्रत्येक घटना होण्यामागे त्याचीच प्रेरणा आहे ( ह्यामधे आपण स्वत:जे करतो ते पण आले ) कर्ताकरविता तोच आहे हे स्वत:ला समजावणे पण येते.
विश्वासाने असे प्रयत्न केले तर भगवंत दूर नाही हेच महाराजांनी आपल्याला ह्या अभंगाद्वारे सांगितले आहे.

**अभंगाची शिकवण :**

निर्धारपूर्वक भगवंताचे स्मरण नित्य व नियमितपणे करावे हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.

ॐ

****************

**अभंग :- देवाच्या भेटीची आंस कशी असावी ह्याचे वर्णन**

दुडीवरी दुडी । चाले मोकळी गुजरी ॥ १ ॥
ध्यान लागो ऐसें हरी । तुज चरणीं तैशापरी ॥ २ ॥
आवंतण्याची आस । जैसी लागे दुर्बळास ॥ ३ ॥
लोभ्या कळांतराची आस । बोटें मोजी दिवस मास ॥ ४ ॥
तुका म्हणे पंढरीनाथा । मजला आणिक नको व्यथा ॥ ५ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

गुजराथी स्त्रीया डोक्यावर एकावर एक रचलेल्या अनेक घागरी पाणी वाहून नेतात . त्यांचे दोनही हात मोकळे असतात पण लक्ष मात्र घागरींवरच असते. ॥ १ ॥
हे हरी तुझ्या चरणांठायीं असेच ध्यान लागो ॥ २॥
जशी गांवजेवणासाठी दुबळा मनुष्य आंस लागलेली असते ॥ ३ ॥
किंवा जसा लोभी सावकार येणाऱ्या व्याजाची आतुरतेने वाट पहात असतो व त्यासाठी बोटांवर दिवस, महिने मोजत असतो ॥४।।
तसेच हे भगवंता तुझ्या भेटीची मला आंस लागली आहे, मला आणखी कांहिही उपाधी नको आहेत.॥ ५॥

**Note: शेवटच्या चरणांवरून हे स्पष्टच आहे की तुकाराम महाराजांनी पांडुरंगाला ही प्रार्थना केली आहे. तसेच भगवद् भेटीची आंस कशी असावी ते पण स्पष्ट केले आहे.**

**अभंगाचा अर्थ स्पष्ट होण्यासाठी लागणारी माहिती व भूमिका :**

जो मुमुक्षु झालेला आहे म्हणजेच ज्याला भगवंताच्या भेटीची तळमळ लागली आहे त्याला कायकाय प्रयत्न करावे लागणार आहेत त्याच्या मनाची कशी अवस्था असायला हवी त्याचेच ह्या प्रार्थने द्वारे मार्गदर्शन येथे वाचायला मिळते. मुख्यत: सर्वप्रथम चित्तशुद्धी महत्वाची असते. शुद्ध चितामधे नेहमीच भगवंताचे बद्दल विचार मनामधे येतात.

**भगवान पतंजली म्हणतात की माणसाचे मनच त्याला बंधनात अडकविते व मनच बंधनांमधून सोडविते.**

मनाचा एक उत्तम गुण हा आहे की ते एकावेळी एकाच गोष्टीचा विचार करू शकते. मन " एकदेशी " आहे असे म्हणुनच म्हटले जाते. उदाहरणार्थ: जर चवदार खाद्य पदार्थाची आठवण झाली तर तोच मिळावा असे दुसरा कांही विचार मनांत येईतोपर्यंत मनास वाटते.

मनाचा दुसरा पैलू म्हणजे आपली आठवण ठेवण्याची शक्ती हा आहे. विचार केला तर हे आढळते की ह्या आठवणीमुळेच आपले सर्व व्यवहार ह्या जगांत चालले आहेत. आथवणीमुळेच कधी आपण योग्य वर्तन करतो तर कधी अयोग्य वर्तन पण आठवणीमुळेच घडते.
आपल्यापैकी बरच जण तर जुन्या आठवणींवरच जणू जगत असतात. कांही जण भूतकाळांत घडलेल्या घटना आठवतात व वर्तमानकाळांत दु:खी होतात. कधी आपल्याला पूर्वीचा भोगलेला आनंद आठवतो व तोच आनंद परत मिळावा म्हणून आपण तेच प्रयत्न पुन्हा पुन्हा करतो. कधी आपल्याला दुसऱ्या कडून मिळालेल्या प्रेममय वागणुकीची आठवण होते व त्या व्यक्ती बद्दल कृतज्ञता वाटते. जर अशांची यादी करायचे म्हटले तर हि यादी कधी न संपणारी होईल.
हा सर्व आपल्यामधील आठवण शक्तीचा खेळ आहे. आपल्या निरनिराळ्या केलेल्या कार्याचे मूळ आठवणच असते.

जोपर्यंत असे कोणतेही कार्य ( कर्म) आपल्यांतला " मी" किंवा "अहंकार " हे धरून केले असेल तर ह्या दृश्य सृष्टीच्या नियमा प्रमाणे केलेल्या कर्माचे फळ भोगावेच लागते. कधी ते मात्र सांगता येणार नाही.
मिळणारे फळ कधी शरीर व मनाला आनंद देणारे, कधी दु:ख देणारे असते. ते कधी कधी ताबडतोब मिळते तर कधी भविष्यांत. कांही फळे भोगण्यासाठी पुधे एखादा जन्म पण घ्यावा लागतो.
**थोडक्यांत म्हणजे आपणच आपल्या जीवनाचे भविष्य घडवत असतो**

**येथे आपण खालील मुद्याची नोंद घेणे जरूरीचे आहे :**

आपल्या संतसज्जन मंडळींनी पापाची व्याख्या अशी केली आहे की " आपण भगवंत हाच खरा कर्ता आहे हे विसरून केलेली सर्व कर्मे पापकर्मे असतात. कारण ह्या कर्मांआगे "मी केले" हा अहंकार जागा असतो. मग अर्थातच केलेल्या कर्मांचि फळे भोगणे हे पण आलेच. त्यासाठी जन्म-मृत्यू चक्रामधे आपले अडकणे पण आले. ताप भोगणे आले.

शास्त्रांमधे तीन तापांचे वर्णन आहे.

देहेंद्रियप्राणेन सुखं दु:खं च प्राप्यते । इम्माध्यात्मिकं तापं जायते दु:खं देहिनाम ।
सर्वभूतेन संयोगात सुखं दु:खं च जायते । द्वितिय तापसंताप: सत्यं चैवाधिभौतिकं ॥
शुभाशुभेन कर्मणा देहांते यमयातना । स्वर्गनरकादि भोक्त्व्यमिदं चैवाधिदैविकम ॥

1. आध्यात्मिक ताप: बाह्य वस्तूंशी संपर्क न येता वाट्याला आलेले दु:ख. उदा अंग दुखणे, निरनिराळे रोग होणे.
2. आधिभौतिक ताप : बाह्य वस्तूंशी संपर्क झाल्याने शरीराला होणारे दु:ख. जसे सांपाचे चावणे, विजेचा झटका .
3. आधिदैविक ताप : म्रुत्युनंतर भोगाव्या लागणाऱ्या यमयातना

समर्थ रामदास स्वामी म्हणतात की
(संसारें दु:खवला । त्रिविधतापें पोळला । तोचि येक अधिकारी जाला । परमार्थासी ॥)
जो अशा त्रिविध तापांनी पोळला जातो तोच परमार्थ करण्यासाठी अधिकारी होतो.

तसेच आपण हे पण लक्षांत घ्यायला हवे की आपण सध्या द्वैतामधे जगतो आहोत. देव व आपण वेगळे आहोत असे आपल्याला वाटत आहे म्हणून हे द्वैतात जगणे आहे. ह्यामुळे आपल्याला भगवंत हा सर्व तापांतून मुक्त करणारा त्राता आहे असे वाटते. असे वाटण्याचे कारण म्हणजे तोच सर्वशक्तिमान आहे ही मनाची समजूत असणे होय.
**असे ज्याला जाणवते तोच भगवंताच्या भेटीसाठी आतूर होईल. ह्या ठिकाणी माणुस परमर्थाकडे वाटचाल करायला लागतो.**

**अभंगाची शिकवण::**
ही भगवद्‌भेटीची तळमळ आतुरता कशी असावी /असते तेच ह्या अभंगाद्वारे आपल्याला शिकता येते.

तुकाराम महाराज ह्या अभंगामधले गुजराथी स्त्रीयांचे, लोभी मणसाच्या मन:स्थितीचे दृष्टांत देऊन हेच सांगत आहेत की माणसाला संसारातली कामे करणे व भगवंताचे स्मरण राखणे हि दोन्ही एकच वेळी मनाच्ह्या साह्याने करता येतात. मुख्यत: मन भगवंताठायी ठेवणे महत्वाचे आहे.

मुद्दा हा अहे की मनामधे भगवंताच्या भेटिची आत्यंतीक आंस , तळमळ असायला हवी. **अशी टोकाची आत्यंतिक तळमळ असणे म्हणजेच भगवंताचा ध्यास लागणे होय. इंग्रजी भाषेत त्यालाच Passion हृ शब्द त्यातल्यात्यात जवळचा आहे.**

**भक्तीमधे** हा ध्यासच सर्व कांही करतो. ह्या ध्यासाची ज्योत सतत प्रयत्नपूर्वक पेटलेली ठेवावी लागते. त्यासाठी नामस्मरणाद्वारे मन भगवंताकडे लावावे लागते. ह्याशिवाय हे सर्व हातून होण्यासाठी ईश्वराची कृपा पण हवीच. अशी कृपाच शेवटी मोक्षाचे फळ देणारी होते.

तळमळ कशी असावी ह्याबद्दल श्री. रामकृष्ण परमहंस ( स्वामी विवेकानंदांचे सद्गुरू) म्हणतात की अशी खरी तळमळ म्हणजे प्रेमाचे तीन रंग (भाव) एकाच ठिकाणी एकाच वेळी असणे.

१) बाळाचे आईवर असणारे प्रेम.

२) लोभी माणसाचे पैश्यावरचे प्रेम.

३) पतीचचे पत्नीवर व पत्नीचे पतिवरचे प्रेम.

असा प्रेमभाव माझ्या मनामधे राहॊ अशी तुकाराम महाराज भगवंताकडे ह्या अभंगात प्रार्थना करताहेत.. .

माझ्या मते ह्या अभंगामुळे खरी तळमळ कशी वा ध्यास कसा असावी ह्यावर प्रकाश टाकणारा आहे.

**आपण प्रत्येकाने स्वत:लाच हा प्रश्न विचारायला हवा:**

**प्रश्न: मला खरच कां अशी भगवंतभेटीची तळमळ लागली आहे?**

आपल्याला मिळणारे उत्तर धकादायकच असेल. पण तरीही निराश होण्याचे कारण नाही. कारण देव भावाचाच भुकेला असतो .

तुकाराम महाराजांचे अभंग आपल्याला मार्गदर्शन करतीलच.
एक कविता येथे चपखल बसते तीच पुधे लिहिली आहे.

जेंव्हा तुम्ही निराशा होता तेंव्हा तुम्ही भूतकाळांत जगत असता.
जेंव्हा तुम्ही चिंताग्रस्त असता तेंव्हा तुम्ही भवोष्याविषयी चिंताकरत असता.
जेंव्हा तुम्ही आनंदी असता तेंव्हा तुम्ही वर्तमानात जगत असता.

*When you are depressed, you think of the past.*
*When you are anxious you worry about the future.*
*When you are happy, you are living in the present.*

म्हणुन वर्तमानात स्वता:ला अशा तळमळीने भगवंताला हांक मारावी हेच येथे आपल्याला शिकायला मिळते.

ॐ

**************

**अभंग :- सवय लावून घेण्याचे महत्व**

**साधू बचनाग खाती तोळातोळा । आणिकांते डोळां न पाहवें ॥ १ ॥**
**साधू भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनियां ॥ २ ॥**
**असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥ ३ ॥**

**अभंगाचा शब्दार्थ :**

कांही साधू बचनागासारखे विष तोळा तोळा खातात. पण त्यांचे हे खाणे सुद्धा कोणाकोणाला पाहावत नाही.कांहीजण नागाला हातांत धरतात तर कांहीची नागाला पाहूनच बोबडी वळते.ह्या लोकांना असाध्य तेच साध्य होते कारण म्हणजे त्यांचा सतत अभ्यास हेच आहे असे तुकाराम महाराज म्हणतात.

**अभंग समजण्यासाठी लागणारी आवश्यक अशी कांही माहीती :**

ह्या अभंगामधे संत तुकाराम महाराज आपल्याला अभ्यास करातांना सराव म्हणजेच तीच गोष्ट पुन:पुन: करावी लागते त्याचे महत्व सांगत आहेत. सरावाचे महत्व व्यवहारामधे तर आहेच पण परमार्थामधेही सराव मह्त्वाचा आहे.

अर्थात १) सराव प्रपंचात करावा लागतो तसेच २) परमार्थामधेपण पण सराव मह्त्वाचा आहे.

सराव करायचा म्हणजे खालील बाबींचा विचार करावा लागतो.

१) योजना तयार करणे: जे काम करायचे ते कसे? ह्याची योजना करायला पाहिजे. ह्या साठी आपल्या जवळ काय काय सामग्री आहे, कोणती सामग्री केंव्हा लागेल, कोठून मिळेल, किती वेळ लागेल, कितीवेळा सराव करावा लागेल ईत्यादी सर्व बाबींचा विचार; योजना तयार करतांना करावा लागतो.

२) सबूरी : कांही कामे अनेक वेळा करावी तेव्हाच नीट करण्य़ाची सवय होते. त्यासाठीच सबूरी महत्वाची असते.

३) योजने प्रमाणे ठरलेली कांमें त्याच वेळेला करणे मह्त्वाचे असते.

४) चाळणा करणे: योजनेत ठरविल्याप्रमाणे कार्य होते आहे की नाही हे सुद्धा वेळोवेळी तपासणे मह्त्वाचे असते. त्यामुळे जर कांही अडचणी आल्या तर त्यांवर उपाय वेळेवरच करता येतो.

**ह्या अशा पद्धतीने योजना करण्यालाच समर्थ रामदासांनी " दीर्घसूचना " हा शब्द वापरला आहे.**

**तुकाराम महाराजांना पण हेच अभिप्रेत आहे.**

ह्या वरून एक गोष्ट लक्षांत येते की तुकाराम महाराजांचा उपदेश पण व्यवहारामधे तसेच परमार्थामधे यशस्वी कसे होता येईल त्याबद्दल मार्गदर्शक आहे.

**अ) व्यवहारामधे यशस्वी होण्यासाठीचा उपदेशाचा भाग खालील प्रमाणे आहे.**

नुकतेच एक पुस्तक एका ब्रिटिश लेखकाने लिहिलेले प्रसिद्ध झाले आहे. पुस्तकाच्या लेखकाचे नांव आहे "ग्लॅडवेल". लेखक म्हणतो की जर एखाद्याने १० हजार तास सराव केला तर अशा माणसाला ज्या विषयाचा सराव केला त्या विषयांत प्राविण्य मिळते. लोकांमधे त्या विषयाचा तज्ञ म्हणून मानमान्यता मिळते याशिवाय जर नशीबाची साथ असेल तर मग विषेश प्रसिद्धी पण मिळते. पुस्तकामधे "बिल गेट" यांच्या सारख्यांची उदाहरणे दिलेली आहेत व १०हजार तासांच्या लेखकाच्या सिद्धांताला पुरावा म्हणून ही उदाहरणे आहेत.

व्यावहारीक जगामधे यश मिळावे ह्यासाठी मार्गदर्शन करणारी अनेक पुस्तके आहेत.

ज्याल यश हवे त्याने न थकता सतत सराव करावा व जो असे करेल त्याला अशक्य असे कांही नाही हाच संदेश येथे मिळतो.

ब) परमार्थामधे यशस्वी होण्यासाठीचा उपदेशाचा भाग खालील प्रमाणे आहे.

आपल्या सर्वच संतजनांनी “ श्रवण क्रिया “ सतत करावी हाच मुद्दा अनेक ठिकाणी मांडला आहे. ह्यात श्रवण, मनन व निदिध्यास ह्यासर्वांचा समावेश आहे.श्रवणामधे भगवद्गीता, उपनिषदे, ईत्यादी सद्ग्रंथांचे वाचन येते. तसेच मान्यवरांची प्रवचने कीर्तने ऐकणे हे पण येते. पण फक्त ऐकणे पुरेसे नसते तर ऐकलेल्यावर स्वत: विचार करणे ,सखोल दडलेला अर्थ शोधून काढणे हे पण महत्वाचे असते.

ह्यानंतर जे समजले ते वर्तनांत आणणे हवे. तरच श्रवणाचा उपयोग होईल.

भगवंताची माया शक्ती ही एवढी शक्तिमान आहे की ती आपले मन सहजपणे इतर ठिकाणी नेते व आपल्याला पथभ्रष्ट करते. पण हीच माया जर आपली श्रद्धा अढळ असली व आपल्या मधे सबूरी असेल तर आपल्याला भगवंताकडे पण नेते.

एक गणीतांतले उदाहरण येथे घेता येते. आपल्याला माहीत आहे की २ चे वर्गमूळ १.४४ आहे.जो गणीताचा अभ्यासक आहे त्याला हे माहीत असते की हि संख्या १ .४४..... अशी अहे. जितके पुढे पुढे जाल तेवढी वर्गमूळाची किंमत जास्त खरी व बरोबर होत जाते. किती पुढे जायचे ह्याला मर्यादा नाही.

**ह्याच प्रमाणे " परमार्थात "मी कोण आहे? माझे खरे स्वरूप काय आहे? मला ह्या जन्ममृत्यु चक्रामधून कशी व केंव्हा सुटका मिळेल? " ह्या प्रश्नांची उत्तरे शोधण्यासाठी सतत प्रयत्न करावे लागतात. भगवंतावर श्रद्धा असावी लागते व कधीनाकधी माझी त्याची भेट घडणारच आहे व मी वाट पाहायला तयार आहे ही सबूरी पण लागते.**

**अभंगाची शिकवण :-**

**हीच शिकवण दिलेली आहे की जेवढे प्रयत्न व्यवहारामधे यशस्वी होण्यासाठी लागतात त्यांपेक्षा कोटीपट प्रयत्न परमार्थामधे यशस्वी होण्यासाठी लागतात. असे प्रयत्न म्हणजे नामस्मरण करणे ईत्यादी. ते सतत करायची सवय स्वत:ला लावावी लागते.**

ॐ

*****************

**अभंग :- नरदेहाचे सार्थक करावे हे सांगणारा**

आता कांही सोस न करीं आणिक। धरीन तें एक हेंची दृढ ॥ १॥
जेणें भवसिंधु उतरिजे पार । तुटे हा दुश्तर गर्भवास ॥ २ ॥
जोडिन ते आतां देवाचे चरण । अविनाश धन परमार्थ ॥ ३॥
तुका म्हणें बरा जोडला हा देह । मनुष्यपण इहलोकां आले ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ:-**

आता ईतर गोष्टींचा सोस न धरावा, फक्त एकच गोष्ट मनात दृढ धरावी.॥१॥
ह्या गोष्टीला धरल्यामुळे भवसिंधूतून तू पार पडशील, तुझा गर्भवासाचा फेरा सुटेल.॥२॥
आता ते देवाचे चरन ( मी ) धरेन व परमार्थाचे अविनाशी धन मला मिळेल ॥ ३॥
तुका म्हणतो की बरे झाले व हा मनुष्याचा देह धारण करून ईहलोकामधे मी आलो ॥ ४॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी माहिती:-**

आपली वेद व इतर शास्त्रे , तसेच सर्व संतांनी आपल्याला मिळालेल्या ह्या नरजन्माचे महत्व ऒळखले आहे. फक्त ह्या नरदेहातच आपण जन्मदु:खाच्या काव रणांचा शोध घेऊ शकतो व कारणे ओळखून योग्य ती उपाय योजना करून जन्ममृत्यूच्या चक्रांतून स्वता:स सोडवू शकतो. समर्थ रामदास नरदेहस्तवनाच्या समासामधे म्हणतात की
" देह परमार्थी लाविलें । तरीच ह्याचे सार्थक जाले । नांही तरी व्यर्थची गेले । ना आघातें मृत्यपंथे॥
“ या नरदेहाचेनीं आधारें। नाना साधनांचेनि द्वारें। मुख्य सारासारविचारें । बहुत सुटले ॥ "
समर्थ रामदासांनी म्हणूनच नरदेहाला रत्नपेटीची उपमा पण दिलेली आहे.
सर्वांत श्रेष्ठ संपत्ती कोणती तर " मोक्ष संपत्ति म्हणजेच जन्म मृत्यू चक्रामधून मुक्ति " हीच आहे. ही संपत्ती मिळविणे फक्त नरदेहातच शक्य आहे. जो शाश्वत काय आहे व अशाश्वत काय आहे हे समजून सर्व अशाश्वत वस्तूंची आसक्ति सोडतो त्यानेच ह्या मनुष्यजन्माच्या संधीच योग्य उपयोग केला असे म्हणता येते.

ह्या अभंगामधे तुकाराम महाराजांनी स्वत:चेच उदाहरण देऊन जन्माचे सार्थक करण्याचा मार्ग दाखविला आहे. महाराज अभंगाच्या पहिल्याच चरणामधे म्हणतात की मनुष्य जन्म मिळाला ह्याचा त्यांना फार आनंद झाला आहे.कसे ते आता अभंगाच्या १,२ व ३ चरणांचा अर्थ पाहून स्पष्ट होईल.हाच मुद्दा सर्वच संत वेगवेगळया शब्दांत मांडतात.

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी प्रथम ४था, नंतर १, २, व ३ असा क्रम घ्यावा लागतो.**

तुकाराम महाराज अभंगाच्या **४थ्या** चरणामधे म्हणतात की हा नरदेह प्राप्त झाल्याचा त्यांना आनंद वाटतो आहे. ह्याचे कारण स्पष्टच आहे ते हेच की ह्या नरदेहातच माणूस आपली बुद्धी विवेकाने वापरू शकतो. बाकीच्या योनींमधे ( पशू, पक्षी ईत्यादी ) फक्त अन्न, निद्रा, व प्रजोत्पादन एवढेच प्राणी समजू शकतो. मृत्यूचे भय मात्र सर्वांनाच असते. फक्त मनुष्यानेच जन्ममृत्यूच्या, सुख दु:खाच्या कारणांचा शोध घेतलेला दिसतो. अनेक शास्त्रे जसे औषधी वैद्यकीचे शास्त्र, संगणक शास्त्र, विज्ञान , ईलेक्ट्रॉनिक्स वगैरे शास्त्रांची वाढ ह्याच एका कारणा मुळे झालेली आहे .
महाराजांचे समकालीन समर्थ रामदासांनी तर नरदेहस्तवनाचा एक वेगळा समासच लिहिला आहे. समर्थ एका ठिकाणी म्हणतात

" या नरदेहाचेनीं आधारें। नाना साधनांचेनि द्वारें। मुख्य सारासारविचारें । बहुत सुटले ॥ " सारासार विचार म्हणजे शाश्वत काय व अशाश्वत काय हे ओळखून शाश्वताची कांस धरणे. शाश्वत फक्त भगवंतच आहे बाकी ( ह्यात आपण स्वत: म्हणजे आपले शरीर, नतेवाईक मित्रमडली, संपत्ती घर दार ईत्यादी सर्व येते) सर्व कधीनाकधी नाश पावणारेच आहे. म्हणुनच हे पण अर्थातच स्पष्ट आहे की फक्त नरजन्मातच आपण मोक्षासाठी योग्य त्या कारवाया करू शकतो. ही नरदेहाची भगवंताने दिलेली भेट वा संधी व्यर्थ घालवणे अगदी चूकच आहे.

ह्यानंतर **१, २ व ३ चरणामधे महाराजांनी काय सांगितले आहे ते आता पाहूया.**
प्रथम महाराज म्हणतात की आता त्यांना कसलीच आवड उरलेली नाही. कसल्याच वस्तूंची आसक्ती राहिलेली नाही. आणि आता फक्त भगवंताचे चरण मात्र ते धरून ठवणार आहेत. आपण मगे पाहिलेच आहे की जर माणसाल कसलीही आसक्ती असेल तर ती ईछचा पूर्ण व्हावी म्हणून जन्म घ्यावा लागतो. एकमेव भगवंताची आसच ह्याला अपवाद आहे. महाराजा चे सर्वस्व फक्त भगवंत आहे . हेच आपल्यालापण आचरणामधे आणायचे आहे.

२व ३ चरणांमधे महाराज म्हणतात की ते आता देवाचे चरण घट्ट धरून रहाणार आहेत. जेंव्हा माणूस भगवंतालाच सर्वस्व मानू लागतो तेंव्हाच अशी उत्कट मनस्थिती होते. असे भगवंताचे उत्कट प्रेमच त्याला ह्या भवसागरामधून तरून नेते. नाहीतर हा संसार तरून जाणे दुष्करच आहे असे सर्व संतांनी स्वानुभवावरून स्पष्टच सांगितले आहे.
आपली सर्व शास्त्रे ह्या संसारलाच भव सागर म्हणतात. ह्यातुण पलिकडच्या मोक्षाच्या किनाऱ्याला नेणारे जहाज म्हणजेच भगवंताबद्दल उत्पन्न झालेली उत्कट भक्ति (प्रेम) . असे प्रेम भक्ताच्या अंत:करणांत निर्माण झाले की मोक्ष सहज होतो. अशी ह्या भक्तीची महती आहे.

**अभंगाची शिकवण ;-**

**शिकवण तशी सोपीच आहे ती हीच आहे की भगवंतच आपला त्राता अहे हे समजून त्याची भक्ती करा. सतत त्याचे स्मरण ठेवावे. अगदी क्षणभरसुद्धा त्याचा विसर पडायला नकॊ . हेच आचरणांत येणे महत्वाचे आहे.**

ॐ

**************

**अभंग :- भगवंतच सर्वकर्ता व सर्वांचा मालक आहे हे ध्यानी घेऊन वागा.**

आता तळमळ । केली पाहिजे सीतळ ॥ १ ॥
करील तें पाहें देव । पायीं ठेवुनिया भाव ॥ २ ॥
तोचि अन्नदाता । नाहीं आणिकांचि चिंता ॥ ३ ॥
तुका म्हणेव दासा । नुपेक्षील हा भरंवसा ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

अहो सज्जनहो, आता आपले मन तळमळ रहित म्हणजे शांत केले पाहिजे.॥ १॥

( त्याकरता) भगवंतच सर्वकर्ता आहे हा भाव भगवंताच्या ठायी ( चरणांपायी ) ठेवा॥ २॥

तोच सर्वांचा अन्नदाता आहे म्हणून इतर कसलीही चिंता करू नका ॥ ३ ॥

तुका म्हणतो की जो असा दासभाव ठेवतो त्याची उपेक्षा तो करणार नाही ही खात्री बाळगा ॥४॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी कांही माहिति ( अभंगामागची भूमिका)**

जसे लोकांना सांगतो (बोलतो) तसेच बोलल्यासारखे वागणे ही आपल्या सर्वच संतांची पद्धत होती व असते. तुकाराम महाराजच एका दुसरया अभंगामधे म्हणतात " बोले तैसा चाले त्याची वंदावी पाऊले." अर्थात असे वागणाऱ्याला नहमीच वंदन करावे असे ते सांगत आहेत.

माझ्या मते हा अभंग बहुतेक तुकाराममहारांजांना आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर लिहिला असावा. नारदभक्तीसुत्रंमधे नवविधाभक्तींची नांवे येतात. म्हणजेच भक्ति करण्यचे नऊ मार्ग नारदांनी सांगितले आहेत. भक्त तोच असतो जो भगवंताठायी अनन्य भावाने ( तुझ्याशिवाय माझा दुसरा कोणीही नाही, हा भाव ) भगवंतास पूर्णपणे शरण गेलेला असतो.

ह्या सर्व भक्तींतील सर्वोच्य भक्ती म्हणजे आत्मनिवेदन भक्ती. बाकी सर्व भक्तींचा शेवटआत्मनिवेदनामधे होतो. ह्याबद्दल श्रिमद् भगवद्गीतेमधील खालील श्लोक प्रसिद्ध आहे.

**अनन्या श्चिंतयंतो माम ये जना: पर्युपासते। तेषां नित्याभि युक्तानां योगक्षेमं वहाम्यहम ॥**

ह्या श्लोकामधे भगवंतानी संपूर्ण शरणागतीवरच भर दिलेला आहे. संपूर्ण शरणागत होणे म्हणजे स्वत:चे सर्वस्व भगवंतास अर्पण होण्याची प्रक्रिया आहे. जेंव्हा भक्ताकडून आत्मनिवेदन घडते तेंव्हा ही क्रिया आपोआपच होते. ही मनाची अत्यंत सुंदर स्थिति असते. आत्मनिवेदन ह्या शब्दाचा अर्थच स्वत:ला भगवंतार्पण करणे हा आहे.

आत्मनिवेदनाचे वरवर पाहाता तीन प्रकार आहेत जे भक्ताच्या जीवनामधे प्रगट होतात.

**१) जड आत्मनिवेदन**

ह्या जगामधे मी जे जे माझे आहे असे म्हणतो त्या सर्वाचा खरा मालक भगवंतच  फक्त आहे हा भाव मनामधे असणे . तसेच भगवंतच खरा कर्ता आहे व तो माझ्याकडून सर्व कार्य करवून घेतो आहे ही भावना असणे. श्री. रामकृष्ण परमहंस यांच्या शब्दांत " मी एक यंत्र आहे व ह्या यंत्राचा चालक भगवंत आहे "हीच भावना स्पष्टपणे प्रगट होते.

२) **चंचळ आत्मनिवेदन**:

सर्वत्र भगवंतच भरलेला आहे मग वस्तू चल (प्रत्येक प्राणीमात्र ज्यांमधे चैतन्य आहे ते सर्व) असो किंवा अचल ( ज्यांमधे चैतन्य नाही असे भासते ) असो.
एका योग्याची आत्मकथा ( Autobiography of a Yogi ) ह्या स्वामी परमहंस योगानंदांच्या पुस्तकांत खालील प्रसंग येतो. स्वामीजी जेंव्हा सर जगदीशचंद्र बसू ह्यांना भेटले होते. त्यावेळी बसूंनी स्वामिजींना त्यांचे यंत्र दाखवले. बसूंनीच प्रथम हे सिद्ध केले की
" वनस्पतींमधे सुद्धा चैतन्य आहे " . बसुंनी ह्या यंत्राद्वारे लोखंडाच्या पत्र्यामधे पण चैतन्य आहे हे स्वामीजींना प्रात्यक्षिक करून दाखविले होते.

३ **निश्चळ आत्मनिवेदन**।

फक्त भगवंतच ( परब्रह्मच ) काय ते शाश्वत आहे व बाकी कोणतीही वस्तु अशाश्वत आहे . हे शाश्वतच माझे खरे स्वरूप आहे हा भाव असणे .सच्चिदांनन्द स्वरुपो अहम .

ब्रह्मज्ञानी व्यक्तिच्या बाबतीत ह्या तीनही जाणीवा सतत जागृत असतात. आपण बाकीच्या सर्वांना यामधील कांही जड व चंचल निवेदनाच्या जाणीवा कधीकधी अनुभवास येतात पण फारच अल्पकाळच अशी जाणीव टिकते . खरेतर याचे स्मरण प्रयत्नपूर्वक श्रद्धा ठेवून करावे लागते. शिवाय योग्यवेळी मला हा अनुभव येईल ह्या श्रद्धेने आपले प्रयत्न सतत चालू ठेवावे लागतात. सबूरीने रहावे लागते.

**अभंगाची शिकवण :**

जर आपल्याला ही खात्री असेल की भगवंत आपली सर्व काळजी घेतो आहे व आपल्याआवश्यक त्या सर्व गरजा पण पुरवतो आहे ; तर मग मनाप्रमाणे कांही झाले नाही तरी दु:ख वाटणार नाही. तसेच जर सर्व कांही मनाप्रमाणे झाले तरी गर्वाने मन फुलून जाणार नाही. आनंद अर्थातच होईल पण त्याच वेळी भगवंताबद्दल कृतज्ञतेने मन भरून जाईल.

ह्या मुद्द्यांवर आपण खरेतर मनन, चिंतन केले पाहीजे. ह्यासाठी जीवनांतील प्रत्येक घटनेकडे ह्यादृष्टीने जर आपण पाहीले तर आत्मनिवेदना बद्दल जे कांही मुद्दे वर येथे लिहिले ते योग्य आहे हे पण मनास पटेल. असा विचार केला तर मन ( जर कांही कारणाने उद्वीग्न झाले असेल तर) शांत होते. तुकाराम महाराजांच्या चरीत्रामधे अनेक घटना आहेत ज्या वाचल्या की स्पष्ट होते की महाराज केवढे मोठे सत्पुरुष होते व ह्या अभंगात सांगितल्या प्रमाणेच वागत होते.

भगवंत प्रत्येक प्राणीमात्रांची काळजी घेत असतो, प्रत्येकाचा योगक्शेम तोच वाहतोआहे हे सहज समजू शकते. आपल्याला ( फक्त मनुष्याला) त्याने सारासारविवेक बुद्धी ,विचार करण्याची शक्ती दिलेली आहे. अर्थात म्हणूनच माणसावर जबाबदारी पण आहे. ती म्हणजे गरजूंना ( ज्यांना स्वत:कष्ट करूनही पुरेसे मिळत नाही ) अशांना दान करणे विशेषत: अन्नदानाला मोठे पुण्यकर्म मानले जाते.

आपण जन्माला येतो तेंव्हा बरोबर फक्त संस्कार घेऊन येतो व मृत्युनंतर संस्कारच घेऊन जातो. ईतर कांही बरोबर येते नाही. निरनिराळी रत्ने, संपत्ती, सोने नाणें, हे सर्व कांही भगवंतानेच निर्माण केलेले आहे. म्हणजेच तोच खरा ह्या सर्वाच स्वामी मालक आहे. तोच

ठरवत असतो की कोणाजवळ असलेली संपत्ती त्याच्यापाशी किती वेळ रहावी. ह्याचे उदाहरण म्हणजे कम्युनिस्ट क्रांतीच्या वेळी अने्क लोकांची संपत्ती जणू क्षणभरांतच नष्ट झाली. डॉ. झिवागो ह्या कादंबरीत ह्या सारख्या प्रसंगांचे वर्णन आहे.
**थोडक्यांत भगवंतच सर्व संपत्तीचा एकमेव स्वामी आहे, हे स्पष्टच आहे.**

तसेच आपल्याला असा अनुभव अनेक वेळा येतो की जरी योग्य योजना केली व कांही कार्य केले तरी त्याचे परिणाम कांही योजल्याप्रमाणे मिळत नाहीत. अनेक वेळा आपण जे व्हायचे ते होऊ देतो. जर आपण विचार केला तर हे लक्षांत येये की सर्व कांही भगवंताच्या ईच्छेनुसारच घडले तर मग मनास दुख: होणार नाही ; पण प्रयत्न मात्र योग्य ते केलेच पाहीजेत हे विसरायला नको.
गीते मधे भगवंतानी हे कसे जमावे ह्यासाठी निश्र्काम कर्मयोग करा असे सांगितले आहे.

**म्हणुनच तुकाराम महाराज ह्या अभंगाद्वारे उपदेश देताहेत की भगवंतास अनन्यभावे शरण जावे. भगवंत अशा भक्तांची उपेक्षा कधीही करत नाही.**
हा विषयच एवढा सुंदर आहे की जितका विचार करावा तितका स्पष्टच नव्हे तर मनास आनंद व शांती देणार आहे असे आढळते.

ॐ

****************

**अभंग :- भगवद्नाम स्मरावे**

रात्री दिवस आम्हा युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ॥१ ॥
जीवाही अगोज पडती अघात । येऊनिया नित्य नित्य वारू ॥ २ ॥
तुका म्हणे तुझ्या नामाचिये बळें । अवघियांचे काळें केलें तोंड ॥ ३ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

आम्हाला रात्रंदिवस मन व बाह्य परिस्थितीशी युद्ध करण्याची वेळ प्रसंग आहे.॥ १॥

जिवावर अकस्मात आघात होत असतात व त्यांचे सतत निवारण करावे लागते.॥ २ ॥
तुका म्हणतो की ह्या सर्वांचे तोंड मी हे देवा, तुझ्या नामाच्या साह्याने केले आहे.॥३॥

**अर्थस्पष्टीकरणासाठी घेतलेला नामदेवमहाराजांचा अभंग .**

अमृताहुनी गोड नाम तुझे देवा । मन माझे केशवा कां बा न घे ॥ १ ॥
सांग पंढरीराया काय करू यांसी ।कां रूप ध्यानासि न ये तुझे ॥ २॥
कीर्तनीं बैसतां निद्रे नागविले । मन माझे गुंतले विषयसुखा ॥ ३ ॥
हरीदास गर्जती हरीनाम्‍च्या कीर्ती । नये माझा चित्ती नाम म्हणें ॥४।\

**अभंगाच्या मागची पार्श्वभूमिका :-**

जेंव्हा एखाद्या माणसाला संतांचा उपदेश "आपल्या नरजन्माचे सार्थक भगवद्‍भक्ती करून मोक्षप्राप्ती घेण्यात आहे" हे मनापासून पटते तेंव्हा तो मनापासून ह्या धेयाच्यासाठी प्रयत्न करू लागतो.

***हे प्रयत्न म्हणजे***

१) नवविधाभक्तीपैकी एखाद्या भक्तीद्वारे भगवंताची आराधना करणे

२) उपनिषदांनी सांगितलेल्या ज्ञानमार्गाने स्वत:च्या मूळ स्वरूपाचे करून घेणे

अशा स्वरूपाचे असतात.

परंतू त्यापूर्वी एवढी वर्षे मनाला लागलेल्या सवयी एकदम सुटत नाहीत. त्यामुळे अशा भक्ताचा स्वत:शीच संघर्ष सुरु होतो. अशा स्थितीमधून तुकाराम महाराज पण गेले होते. महाराजांनी ह्या संघर्षात कसा विजय मिळवला व विठ्ठलाला आपलेसे केले अर्थात जीवनसार्थक करून घेतले ते सांगणारा हा अभंग आहे. अर्थातच येथेपण आपल्याला मार्गदर्शनच मिळते हे स्पष्टच आहे. ***ह्या संघर्षाचे स्वरूप फार सोप्या व सुंदर रित्या नामदेव महाराजांचा एक प्रसिद्ध अभंग सांगतो म्हणुन तो अभंग घेऊनच तुकाराम महाराजांच्या अभंगाचा अर्थ स्पष्ट होतो. हाच प्रयत्न येथे केलेला आहे.***

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

असे हे प्रयत्न सुरू केले की आपल्या साधनेमधे अनेक विघ्ने येतात असा अनेकांना अनुभव येतो. सर्व विघ्नांच्या बद्दल कांही लिहिणे अशक्यच आहे. ह्यातल्या कांहींकडे प्रथम नामदेवमहाराजांच्या अभंगाप्रमाणे पाहणे सोपे होते.

१) आपण रोज एका ठराविक वेळि ध्यान करायचे ठरवतो. पण झोपेमुळे हे करणे जमतच नाही. फार काय ध्यानाला बसलो तरी मांडि घातल्यावर पाय मांड्या दुखू लागतात. मग ध्यान बाजूला राहते. कधी नको त्या आठवणी येतात व मन प्रक्षौभित होते व ध्यान बाजुलाच पडते.

२) आपणस जी कांही पद्धत ठरवलेली असते उदाहरणार्थ एखादा श्री साईबाबांची वा श्री गजानन महाराजांच्या पोथीतला एखाद अध्याय वाचण्याचे ठरवेल. दुसरा कोणी रोज ३-४ माळांचा संकल्प करेल.

ह्या ठरवलेल्या संकल्पात कोणि आजारी पडल्यामुळे, कधी घरी अचानक पाहुणे आल्याने , ईत्यादी कारणामुळे ठरविलेले करू शकत नाही.

३) जप किंवा ठरवलेले साधन करण्याच्या ऐवजी एखादा सिनेमा पहाण्याची ईच्छा होते व मग सर्व नंतर करू असे आपण ठरवतो. पण ती नंतरची वेळ दरवेळी पुढे ढकलली जाते. आळस झोप ही म्हणुनच परमार्थातले मोठे अढथळे समजले जातात.

आजकाल कीर्तन नसते पण नामदेव महाराजांच्या काळि कीर्तन रोज सायंकाळि असे व लोक त्यासाठी देवळामधे जात. तेथेही झोपणारे तेंव्हाही होते. बरेच वेळा सेमिनारमधे पेपर प्रेझेंटेशन होताना लोक झोपतात हे आजही दिसते.

४) निवृत्तीनंतर अनेकांना आपले पेंन्शन वा संचित ठेवीवरचे व्याज पुरेल की नाही ही काळजी करतात व जरी सुस्थितीत रहाण्याची सोय असली तरी परमार्थाकडे दुर्लक्ष होते.

५) ह्या प्रकारचे अनेक विचार मनामधे येतात , आपण त्यांच्यावर कांही कार्य करतो आपल्या पंचेंद्रियाना अनेक गोष्टींची कांहिना कांहि कारणाने आठवण होते व आपण मग त्यामागे लागतो. उदाहरणार्थ जुनी गाणी ऐकावीशी वाटतात. कधी खाण्याची ईच्छा होते. ईत्यादि. ह्या सर्वांना विषयसुख असे नामदेव महाराजांनी म्हटले आहे.

ह्याप्रमाणे विषयसुखाच्या मागे लागले की परमार्थसाधन अर्थातच मागे पडते हे कळत असते पण वळत नसते. .ही लढाई आपल्या स्वत:च्या भगवंताकडे नेलेल्या वृत्ती व मनाला येणारे हे विषयांचे आकर्षण ह्यामधे सतत चालु असते. आपल्याला त्यांवर तोडगा काढावाच लागतो. पण ह्या धावपळीत परमार्थ साधन अगदी सोपे देवाचे नांमस्मरण करणे सुद्धा जमत नाही, असे नामदेवमहाराज त्यांच्या अभंगात म्हणतात.

**ह्यालाच तुकाराम महाराजांनी सतत युद्धाचा प्रसंगाला सामोरे जाणे म्हटले आहे.**

येथे कोणी हा प्रश्न उपस्थित करेल की मग आपल्या कर्तव्याला तिलांजली द्यायची कां? हा तर पळपुटेपणाच होईल.
हे म्हणणे अगदी बरोबरच आहे असे म्हणावे तर मग परमार्थ साधन सोडणेच य़ोग्य म्हणता येईल. **ह्या मुद्द्यावर असे म्हणतायेते की तुकाराम महाराजांनी ह्यासाठी नामाच्या साह्याने ह्या सर्वावर विजय मिळवला हे सांगितले आहे. आपण ही तोच उपाय करावा हेच महाराजांनी सुचविलेले आहे.**
म्हणुनच पुनरावृत्तीचा दोष असूनही हे नामस्मरण कसे करायचे तो भाग लिहित आहे.

(ज्यांना विस्ताराने पहायचे असेल त्यांनी श्री.समर्थ रामदास स्वामींच्या दासबोधातील "नामस्मरणभक्तीचा समास पहावा. आणखी माहितीसाठी श्री. कामत यांचे "नामस्मरणाचे महत्व " प्रकाशक केश्‌अव भिकाजी ढवळे हे पुस्तक ( रु.५०/-) जरूर वाचावे.)

१) सततपणे ( जेंव्हा वेळ मोकळा असेल तेंव्हा) श्रीराम , ॐ नम:शिवाय ईत्यादी आवडीच्या नामाचे स्मरण करावे.
२) "आहे तितुके देवाचे" हे समजून घ्यावे. जर एखाद्या व्यवहारमधे कांही नुकसान झाले, तर ह्या विचाराने आपला उद्वेग नष्ट होऊ शकतो.
३) जे कांही आपल्या आयुष्यात घडते ते देवाने आपल्या भल्यासाठीच केले आहे ह्यावर श्रद्धा विश्वास ठेवावा व शांत रहावे.कोणी वाईट वागले , दुष्टपणे व्यवहार केला ; तर ह्या विचाराने आपला उद्वेग नष्ट होऊ शकतो.
४) आपला मी पणा टाकावा व त्यासाठी भगवंतच कर्ता करविता आहे हे स्वत:ला नेहमी सांगत रहावे. ह्यामुळे आपल्याला वाटणारा वृथा अहंकार कमी होतो.
५) रोजच आपला दिवस आपण कसा घालविला ह्याचा न चुकता आढावा घ्यावा.

ह्या आढाव्यामधे भगवंताची आठवण किती वेळा राहिली नाही हे पण पहावे. व मग पुढच्या दिवशी अशी चूक करणार नाही ह्याबद्दल स्वत:लाच सांगून पुढच्यावेळी तसे वागण्याचा प्रयत्न करायचा.

६) **मुख्य म्हणजे ह्या शिवाय भगवंतास मनापासून शरण जावे.** त्याची प्रार्थना करावी की मला योग्य ती बुद्धी दे . ज्यांनी आपल्याला दुखावले त्यांना पण क्षमा करावी,चांगली बुद्धी दे"अशी पण प्रार्थना असावी.

**समर्थांचे रघूनायका मागणे हेची आता " ह्या नावाचे करूणाष्टक "ही एक अत्यंत प्रभावी प्रार्थना आहे. स्तोत्रेपण आहेत.**

**अभंगाची शिकवण :- तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणे नामाची कांस धरल्यास आपल्याला अभंगात उल्लेखिलेली लढाई नक्कीच जिंकता येईल.**

ॐ

**************

अभंग :- **एकांतवासाचे महत्व**

काळ सारावा चिंतने। एकांतवासी गंगास्नानें। देवाचे पूजने।प्रदक्षिणा तुळसीच्या ॥१
युक्त आहार विहार। नेम ईंद्रियांसी सार । नसावी वासर । निद्रा बहू भाषण ॥ २॥
परमार्थ महाधन । जोडी देवाचे चरण । व्हावया जतन । हे उपाय लाभाचे ॥ ३॥
देह अर्पिजे देवा।भार कांहींच न घ्यावा । होईल आघवा । तुका म्हणे आनंद ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

ज्याला भगवद्भेट हवी असेल त्याने आपल्या ईंद्रियांना युक्त आहार द्यावा फार झोपू नये, फार बोलू नये. भगवंताचे पूजन , तुळशी प्रदक्षिणा घालाव्या. गांगे स्नान करावे. चिंतनात काळ

घालवावा. असे केल्याने परमार्थाचे सर्वोत्तम धन जोडले जाते. हे धन जपाण्यासाठी देवचे चरण धरून ठेवावे. देहा भगवंताला अर्पण करावा. स्वत:वर कांहीच भार घेऊ नये. असे वागले की सर्व जीवन आनंदमय होते.

**अभंगा मागची भूमिका :-**

तुकाराम महाराजांचे अभंग ऐकल्याने व त्यांवर मनन केल्याने अथवा इतर कोणत्याही संताचे वाङ्मय वाचल्याने किंवा इतर कांही कारणाने आपल्याला हे नक्कीच लक्षात येते की भगवंत आहेच व त्याची भेट झाली तर आपल्या सर्व दु:खांचा नाश होऊन शाश्वत सुख मिळेल. ह्यालाच मोक्ष मिळणे असेही म्हणतात. ह्यासाठी माणूस जेजे प्रयत्न करतो त्यालाच परमार्थ साधन म्हणतात.

धर्म, अर्थ, काम ह्या पुरुषार्थांनंतरच शास्त्रे मोक्षासाठी संसार सोडावा ह्याची परवानगी देतात.आपल्या संतांनी स्वानुभवावर हेच अत्यंत ठामपणे सांगितले आहे की सर्वसामन्यांनी भगवंतासाठी प्रपंच सोडायची मुळीच आवश्यकता नाही .

समर्थ रामदास स्वामी दासबोधामधे एके ठिकाणी म्हणतात की
"संसारत्याग न करिता । प्रपंच उपाधी न सांडिता ।परमाथात सार्थकता ।विचारेची होये।""

**तुकाराम महाराजांचा हा अभंग हेच कसे साधायचे त्याच्यावरच मार्गदर्शन देणारा आहे.**

एकूण मुख्य मुदा हाच आहे की आपण प्रपंचामधे राहून पण माणुस परमार्थसाधन करू शकतो.

**अभंगाचे सविस्तर अर्थस्पष्टीकरण :-**

स्पष्टिकरण करणे सोपे जावे म्हणून अभंगाच्या चरणाचे वाचन खाली दिलेल्या क्रमाने करता येते.

गंगास्नानें । देवाचे पूजने । प्रदक्षीणा तुळसीच्या ।
युक्त आहार विहार। नेम ईंद्रियांसी सार । नसावी वासर । निद्रा बहू भाषण ।
देह अर्पिजे देवा । भार कांहींच न घ्यावा । एकांतवासी काळ सारावा चिंतने ।
परमार्थ महाधन । जोडी देवाचे चरण । व्हावया जतन । हे उपाय लाभाचे । तुका म्हणे आघवा होईल आनंद ॥

**येथे पायरी पायरीने आपल्याला मार्गदर्शन आहे.**

**अगदी सुरवातीची पायरी** म्हणजे तीर्थयात्रा कराव्या. देवाची पूजाअर्चा तुळशीला प्रदक्षिणा घालाव्या. हे ज्याला शक्य आहे व ज्याची ह्यावर श्रद्धा असेल त्याने हे सर्व जरूर करावे.पण श्रद्धेविना हे सर्व करणे फक्त मनोरंजनच होईल.

**नंतरची पायरी** म्हणजे आपला आहार व विहार योग्य असावा.
ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की : जो रसनेंद्रियाचा अंकिला। कां निद्रेसी जीवें विकला । तो नाहींच एथ म्हणियेला । अधिकारिया ॥ म्हणजेच युक्ताहार महत्वाचा आहे.
योग्य आहार असेल तर शरीरास रोग होण्याची शक्यता कमी असते. विहार म्हणजे जगामधे वावर. जगांत वावरतांना आपल्या दृष्टीद्वारेच मुख्यत: निरनिराळे विषय मनामधे प्रवेश करून मनामधे भोगांची वासना निर्माण करतात. मग वासनापूर्तीच्या मागे जाणे घडते. वासनापूर्तीमुळे आनंद पण मिळतो पण तात्पुरताच वासनेचे बीज मात्र तयार होते व ह्यामुळे पुढच्या जन्माची तयारी नकळत होते.
म्हणून शक्यतो ज्यामुळे वासनांचे उद्दिपन होणार नाही हेच प्रयत्न असावे असा उपदेशच सर्व संत तसेच शास्त्रांमधे केलेला आहे.
**प्रत्यक्षांत असे सर्व कांही मनाप्रमाणे क्वचितच जमते. त्यामुळे मनात असले तरी परमार्थ साधन होत नाही . प्रपंचामधे वर लिहिलेली जीवनपद्धत ठेवणे सोपे नाही हेच खरे आहे.**

तसेच जर आकंठ भोजन केले तर झोप लागते. अशी निद्रा टाळावी असे अभंगात म्हटले आहे. येथे निद्रा म्हणजे बाह्य जगाला भुलणे. आपला देह फक्त विषयभोगांसाठीच आहे असे वाटल्यामुळे त्याच्या सुखासाठीच सर्व प्रयत्न करणे. करावे तसे भरावे लगेल हे विसरून जे करायला नको ते करणे म्हणजेच आकंठ जेवणे.
तसेच काही दांभिक मंडळी आपल्या ज्ञानाचा अभिमान बाळगून उपदेश करत असतात. ह्यांना भगवंताचा प्रत्यक्ष अनुभव शून्यच असतो. असे बहू भाषण टाळा असे अभंगात म्हटले आहे.

**म्हणूनच अभंगात पुढची महत्वाची पायरी सांगितली आहे .**

ह्यापुढची पायरी म्हणजे जड व चंचळ आत्मनिवेदनाची. " .देह अर्पीजे देवा" असे अभंगात येते. आपल्याला जे जे दिसते , ज्याचा ज्याचा अनुभव येतो ते सर्व कांही देवाचे आहे तसेच सर्व कांही भगवंताचीच रुपे आहेत हे भान ठेवणे शिकायला हवे. तसेच **"जे जे दिसते ते कधीतरी नष्ट होते " हा ह्या दृश्याचा गुणच आहे" हा सृष्टीनियम पण भगवंतानेच केला आहे**.

हे सर्व ध्यानात ठेऊन व समजून वागणे. ह्यालाच जड आत्मनिवेदन म्हणतात.

व्यवहारामधे ह्याविचारसरणीचा अभ्यास करून ती आचरणामधे आली तर सर्व प्रयत्न करून मिळवलेली संपत्ती जर गेली, मित्र किंवा नातेवाईक सोडून गेले तेंव्हा मनाला होणाऱ्या दुः:खाची तीव्रता कमी होते. परमार्थामधे ह्याचा फायदा म्हणजे जन्माचे कारण असणारी आसक्ती सुटते.

त्याच प्रमाणे जो सर्वांभूती भगवंत पाहील तो दुसऱ्याला कटू बोलून वा वाईट वागून दुखावणार नाही. " "वृक्षवल्ली आम्हा सोयरे वनचरे " ही भावना असल्याने पर्यावरणाचे नुकसान करणार नाही. तुळशी प्रदक्षिणा ह्या साठीच सांगितल्या असाव्यात.

आत्मनिवेदनाचा दुसरा भाग म्हणजे "सर्वकर्ता भगवंत" ह्याभावनेनुसार वागणे. ह्यालाच चंचल आत्मनिवेदन असे नांव आहे.

एकदा कां हे कळले की कर्ता करविता भगवंतच आहे. तोच आपल्याला योग्य ती ऊर्मी देतो व आपल्याकडून कांही कार्य करवून घेतो; की रोजच्या व्यवहारात जेंव्हा कार्याचे फळ ( results) अपेक्षेप्रमाणे मिळत नाहीत तरी त्याची खंत वाटणे कमी होते..परमार्थांत फलेच्छा नसल्याने पुढच्या जन्माची कारणेच उरत नाहीत. ासा दोन्हीकडून फायदाच आहे. ह्यालाच देह अर्पण करणे व भार न घेणे असे अभंगात म्हणलेले आहे.. ह्याच्यासाठी मनाने त्याचे स्मरण करत कार्य करणे , त्याच्या बरोबर राहणे हाच अभंगातला एकांतवास होय

**ह्या पायरीवर येणे म्हणजेच परमार्थ साधन होय. भगवंताशी जोडले जाण्यासाठी हाच एक उपाय आहे असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे.**

**असे वागणे घडले की काय मिळते तर शाश्वत समाधान व न मिटणारा आनंद अर्थात मुक्ति.हेच महाराजांनी शेवटी सांगितले आहे.**

**अभंगाची शिकवण :-**

**असे आपण वागतो आहोत कां हे प्रत्येकाने तपासून पाहावे व योग्य ती सुधारणा वागणुकीत करावी हेच आपण येथे शिकतो.**

ॐ

**************

**अभंग := भगवंतास कशी केलेली भक्ती आवडते**

हेचि थोर भक्ति आवडते देवा । संकल्पाची माया संसाराची ॥ १ ॥
ठेविले अनंते तैसेचि राहावे । चित्ति असो द्यावें समाधान ॥ २ ॥
वाहिल्या उद्वेग दु:खची केवळ । भोगणें तें फळ संचिताचे ॥ ३ ॥
तुका म्हणे घालू तयावरी भार । वाहूं हा संसार देवा पायी ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

संसार हा मायेचा खेळ आहे व भगवंताच्या संकल्पाची निर्मिती आहे . हे समजून ( संसारची आसक्ती सोडून) जो भगवंतची भक्ती करतो तीच खरी भक्ती, तीच भक्ती त्याला आवडते. ॥१ ॥॥

भगवंत जसे ठेवील तसे माणसाने ह्या संसारात मनामधे समजून समाधानाने रहावे ॥ २ ॥

आपल्याला जी दु:खे उद्वेग चिंता लागतात ते सर्व आपलेच संचिताचे फळ भोग आहेत हे लक्षांत घ्यावे ॥ ३ ॥

तुका म्हणतो की भगवंताला शरण जाऊन त्याने सर्व संसाराची चिंता भार भगवंतावर ठेवला आहे ॥ ४ ॥

**अभंगामागची भूमिका :**

मागच्या एका अभंगामधे आपण हे पाहिलेच आहे की आपल्या सर्व दु:खांचे मूळ आपण स्वत:च आहोत. करावे तसे भरावे हा ह्य जगाच नियमच आहे. म्हणूनच जोपर्यंत अंगी वैराग्य बाणत नाही तोपर्यंत आपण जन्म-मृत्युच्या बंधनातच अडकलेले असणार आहोत.

जर ह्या सृष्टीचे सत्य स्वरूप आपल्याला समजले तर निदान वैराग्य आंगी बाणेल. वैराग्य ही मनाची अवस्था आहे ही आली की माणसाच्या सर्व भोगेच्छा नष्ट होतात.
मनात नव्या वासना निर्माण होत नाहीत.

संत तुकाराम महाराजांचे असे मत आहे की आपण हे जे जग अनुभवतो आहोत ते म्हणजे एक भास आहे.( जग भासरूप आहे) भास म्हणजे काय ते समजण्यासाठी अध्यात्मात सर्प-रज्जूचे उदाहरण दिले जाते. ते खालील प्रमाणे आहे.
समजा एक अपूरा प्रकाश असलेली खोली आहेव त्या खोलींत कोणितरी कांही कारणास्तव गेला . तेथे त्याला एक साप दिसला व तो खूप घाबरा झाला. नंतर खोलिमधे आणखी कोणी आले व त्याने दिवा लावला. दिवा लागल्याबरोबर स्पष्ट दिसले की खो्लीमधे साप नव्हे तर एक दोरीच तुकडा पडलेला होता. त्या दोरीच्या मुळे सापाचा भास झाला होता हे पण कळले.

पण खरे ज्ञान की ती "दोरीच आहे साप नाही" होईपर्यंत जी भीती वाटली ती ति साप असल्याच्या कल्पनेमुळे वाटली होती. कल्पना खोटी आहे हे समजल्याबरोबर भीतीची भावना नष्ट झाली.प्रकाशाच्या अस्तित्वामुळे खरे ज्ञान झाले व भीती नष्ट झाली. साप दिसला तो भास होता.

जर तेथे ती दोरी नसती व प्रकाश पुरेसा असता तर मग सापाचा भास झाला नसता. या उदाहरणांत दोरी हे सर्पाच भास होण्यासाठी लागणारे अधिष्ठान आहे.

जी मंडळी जीवनमुक्त झाली आहेत त्या सर्वांचा हाच अनुभव आहे की हे जग ज्याचा आपण अनुभव घेतो आहोत ते म्हणजे एक भासच आहे. हा भास होण्यासाठी जे अधिष्ठान आहे तेव म्हणजेच परब्रह्म होय. अज्ञाना मुळे परब्रह्माच्या अधिष्ठनावर दृश्य जगाचा भास होत असतो.

म्हणून आपंण असे तात्पर्य काढू शकतो की सर्व दृश्य हा भासच असल्याने आपल्याला आलेली अनुभव , आपल्याला वाटणारे भय, जन्म-मृत्यु चक्रांत आपले फिरत राहाणे, निरनिराळया नाशवंताची जसे ऐहीक संपत्ती, भाऊबंद नातेवाईक , आपले जवळचे व ज्यांच्याबद्दल प्रेम असते

असे आपले आईवडील, पत्नी वा पती, मुलेबाळें इत्यादी सर्वांची आपली आसक्ती इत्यादी . जेंव्हा खर ज्ञान होते तेंव्हा हे सर्व्रच असून नसल्यासारखे होतात. ह्या सर्वांच्या संपर्कात आल्यामुळे होणारी सुखदु:खे ही पण भासच हे समजल्यामुळे त्यांपासून आपण मोकळे होतो, मुक्त होतो. हेच सर्वच संतांचे स्वानुभवाधिष्ठित मत आहे.

पण असे जे ज्ञान ज्याला आत्मज्ञान म्हणतात म्हणजे "मी कोण? माझे खरे स्वरूप काय आहे ? तें होणे तसे सोपे नाही; कारण आपल्यामधला अहंभाव "मीच कर्ता-भोक्ता आहे असे वाटणे " हा नष्ट झालेला नसतो. एकच मार्ग ह्या अहंभावाला संपविण्याचा आहे तो म्हणजे भगवंतास संपूर्ण शरण जाणे .

हा विचार पाहिल्यावर आता अभंगाचा अर्थ कळणे सोपे होते.

अभंगाचा अर्थ व शिकवण :
आपण हे पाहिलेच की जेंव्हा " हे दृश्य जग हा भास आहे " ही जाणीव अंत::करणामधे स्थिर होते तेंव्हा आपण सुख दु:खाच्या भीती, उद्वेगा ह्यांच्या पलिकडे जातो. मग त्यांचा आपल्यावर बंधनकारक परिणाम होत नाही.

तुकाराम महाराज म्हणतात की सगळयांत सोपी पध्धत म्हणजे भगवंतास अनन्यभावे शरण जाणे. त्याला शरण जावे व जे जेहोते ते त्याच्याच मर्जीनुसार होत आहे हे समजूनन घ्यावे. असे केले की तोच आपल्या शरणागत भक्ताचा योगक्षेम पाहातो.
महाभारतामधे द्रौपदी वस्त्रहरणाच्या प्रसंगानंतर द्रौपदीन कृष्णास विचारले की तू यायला एवढा उशीर कां केलास? भगवान कृष्ण म्हणाले " पांचाली तुला जो पर्यंत वाटत होते की आजूबाजूची पांडव, वगैरे मंडळी मदतीस येतील. तू जेंव्हा मला अनन्यभावाने मला बोलाविलेस त्याच क्षणी मी आलो"

तुकाराम महाराजांचा हा अभंग हेच आपल्याला सांगतो की " भगवंताला अनन्यभावाने शरण जाऊया . तोच ठरवेल की आपल्यासाठी काय योग्य आहे व काय अयोग्य

आहे.श्री. रामकृष्णपरमहंसाच्या शब्दांत ( संदर्भ The gospel of Sri.Ramakrishna - कथाचरीतामृत ") सांगायचे झाले तर " भगवंत कसा अहे हे कॊण जाणू शकेल? मी त्याला माझी आई म्हणूनच हांक मारतो. माझ्या आईलाच ठरवू दे की माझ्या आयुष्यात काय घडावे. माझी भुमिका मांजरीच्या पिला सारखी आहे. पिल्लू फक्त आईला म्याव म्याव म्हणून हाक मारते. बाकी सर्व त्याची आईच करते. कधी ती त्याला स्वयंपाक घरामधे ठेवते , तर कधी आणखी कोठेतरी घरमालकाच्या खाटेवर गादीवर ठेवते.

**पिलाला फक्त त्याची आई हवी असते. त्याला माहीत असते " मला आई आहे , मग मी इतर कसली काळजी कशाला करायची !**

**अभंगाची शिकवण**

अभंगाच्या शेवटच्या ओळीमधे तुकाराम म्हणतात की अशी भगवंतावर भक्ती करण्याची मनास शिकवण द्या . मग तो तुमची सर्व काळजी घेईल.

ॐ

*************

अभंग :- मानसपूजा करावी.

करावी तें पूजा मनेचि उत्तम । लौकिकाचे काम काय असें ॥ १ ॥
कळावें तयासी कळे अंतरिचे । कारण ते साचे साच अंगीं ॥ २॥
अतिशयाअंतीं लाभ किंवा घात । फळ देते चित्त बीजाऐसे ॥ ३ ॥
तुका म्हणे जेणे राहे समाधान । ऐंसे ते भजन पार पावी ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

माणसाने उत्तम पद्धतीने मानसपूजा करावी. त्या साठी कसलीही सामग्री वगैरे लागत नाही ॥ १॥

भगवंताला तुमच्या मनात काय आहे ते सर्व कळते. तो अंतर्यामी आहे. तुम्ही पुजा कां करता आहोत त्याचे खरे कारण पण तो जाणतो. ॥ २॥
जसे चित्तामधे असेल त्या बिजरूपाप्रमाणे कर्माचे फळ मिळते. अतिशय लोभाचा अंत शेवटी घातच करतो॥ ३॥
तुका म्हणतो की असे भजन करा की जेणेकरून तुमच्या मनामधे समाधान राहील. असे भजनच तुम्हाला भवसागरातून पार नेईल. ॥ ४ ॥

**अभंगामागची भूमिका व अर्थ स्पष्टीकरणासाठी लागणारी माहिती :**

जेंव्हा माणसाला भगवंताच्या कांही मुख्य गुणांचा म्हणजे सर्वज्ञ, सर्वशक्तीमान, व सर्वव्यापी ह्या गुणांचा अर्थ कळतो तेंव्हाच त्याला हे पटते की भगवंताच्या बरोबर आपण कांही नाते जोडून त्याची भक्ती करावी. मग माणूस त्याच्या स्वभावानुसार भगवंताशी व्डील, आई, सखा, प्रियकर असे कोणतेतरी नाते ठरवतो व भगवंताला त्याभावाने पाहातो व हळूहळू हे नाते दृढ होत जाते. भगवंत हा खरेतर निर्गूणच आहे. पण तो सगूणही आहे. सगून रुपाशीच आपण प्रथम नाते जोडू शकतो.( श्रीराम, श्रीकृष्ण, लक्ष्मीदेवी,स्वस्तिकचिन्ह, ॐकार ईत्यादी सर्व भगवंताची सगूण रुपे आहेत.) श्री. रामकृष्ण परमहंस म्हणतात की जसे शरीर व सावली ही एकाचीच रूपे आहेत तसेच.

सगूणाची भक्ति करण्याचे नऊ प्रकारा आहेत. त्यांनाच नवविधा भक्ति म्हणतात. ह्या नवविधाभक्तिंपैकी एकीचे नांव आहे अर्चनभक्ती. ह्या प्रकारामधे भक्त देवाची पूजा करतो. पूजेमधे देवाला ते ते सर्वकांही अर्पण केले जाते जे आपल्याकडे एखादी अत्यंत महत्वाची व्यक्ति पाहूणा म्हणून येते तेंव्हा अशा पाहूण्याला अर्पण केले जाते. येथे आपण भगवंताला त्याच्या मूर्तीमधे पाहतो.
अर्चनभक्ती हा मूर्तीपूजेचा सर्वांत लोकमान्य व सर्वांना आवडणारा असा प्रकार आहे.

कांही ठिकाणी भगवंताच्या मूर्ती ऐवजी ॐकाराचे चित्र, शालिग्राम, शिवाची शाळुंका शिवलिंग, अशी चिन्हरूपेपण देव म्हणुन पूजेला घेतात.

आपल्या देशांत बरच जण रोजच देवपूजा करतात. पूजा केलीजाते तेंव्हा कमीतकमी त्यावेळेपुरते काम होईना भगवंताची आठवण , स्मरण घडते.

आपल्या शास्त्रांनी पुजेच दोन प्रकार पद्धती सांगितल्या अहेत. १) षोडशोपचार पूजा . ह्या पुजेमधे भगवंताला १६ उपचारानी (आवाहन आसन, आचमन , स्नान, अभिषेक धूप, दीप नैवैद्य, विडा देणे इत्यादि ) पूजिले जाते. २) पंचोपचार पूजा. ह्या पुजेच्या दुसऱ्या पद्धतीत फक्त ५ उपचार केले जातात.

पण दोनही पुजा करायच्या तर निरनिराली साधन सामग्री जसे गंध, फुले, दीप, उदबत्ती, विड्याचे पान व सुपारी, कपडे, इत्यादी व शिवाय नैवेद्यासाठई फळे, व भोजनसामग्री हे सर्व लागते. अर्थात पैसा पण खर्च करावा हा लागतो.

ह्या बाह्य उपचारांच्या पुजेच मुख्य फायदा हा आहे की मन भगवंताकडे एकाग्र होते. म्हणूनच जेंव्हा मनाची एकाग्रता ह्या सर्व बाह्य उपचारांविना होऊ लागते तेंव्हा साहजिकच बाह्य उपचारांनी पूजा करणे बंद होते.

**ह्या नंतर आपण मनानेच सर्व उपचार करून पूजा करू शकतो. अशा अंतर्यामी केलेल्या पूजेला " मानसपूजा " असे नांव आहे. ध्यान करणे ही पण एक वेगळया पद्धतीची मानसपूजाच असते असे म्हणता येईल.**

अभंगामधे संत तुकाराम महाराज ह्या मानसपूजेचेच कौतुक करीत आहेत.

**अभंगाचा स्पष्टिकरण करुन अर्थ :**

**अभंगाच्या सुरवातीलाच तुकाराम महाराज म्हणतात की मानसपूजा करणेच खरतर उत्तम पूजा करणॆ होय. ह्या पूजेसाठी कांहिही बाह्य सामग्री लागत नाही .लागते ते भगवंताचे ध्यान .**

पुढे महाराज म्हणतात की भगवंतास तुमच्या मनामधे काय विचार चालले आहेत ते कळते. तुम्हाला काय पाहिजे आहे ते पण कळते. तो नक्कीच तुम्हाला जे काय आवश्यक असेल ते ते सर्व देईलच ह्याची खात्री बाळगावी. **(पण हे ही लक्षांत घेणे आवश्यक आहे की त्याला**

**अनन्यभावे शरण जायला हवे. अशी शरणागती पत्करली असेल तरच तुम्हाला हे पण पटेल की तो जे जे कांही करतो ते तुमच्या भल्यासाठीच करत आहे.) ह्या शिवाय अशी पूजा तुम्हाला मोक्षा कडे पण नेते हा मोठा फायदा आहेच.**

अभंगाचा तिसरा व चौथा चरण दोन्ही अत्यंत मह्त्वाचे आहेत. येथे तुकाराम महाराज म्हणतात की जेंव्हा कोणी भगवंताची अत्यंत तीव्रभावाने प्रार्थना करत्तो , तेंव्हा त्याला कांहितरी फायदा हा नक्कीच अनुभवास येतो पन कधीकधी कांहीच फायदा न होता उलट नुकसान झाल्यासारखे भासते.फायदा काय वा नुकसान काय दोनही अशाश्वतच, फार काळ न टिकणारे असतात.

त्यापेक्षा वरच्या दर्जाची पूजा म्हणजे भगवंतास कांहीच न मागंणे , त्याच्याकडून कसलीच अपेक्षा न धरता करणे व फक्त त्याच्यावरील प्रेमामुळे, त्याच्या सर्व निर्मितीचे कौतुक म्हणून करणे ही होय. भगवद्गीतेमधे ह्यालाच निष्काम भाव म्हटलेले आहे.

जर पूजा कांही फळाशा धरून केली तर त्या लोभाचे फळ हे मिळेलच पण हा फलाशेचा भावच आपल्याला जन्म-मृत्युच्या फेऱ्या मधे अडकवतो व जन्मोजन्मी दु:खे भोगायला लावतो हे विसरू नये हे अभंगाच तिसरा चरण सांगतो.

असा भाव भक्ताला शाशवत समाधानचा अनुभव देतो. असा भक्त त्याच्यावरआलेल्या कोणत्याही संकटांमुळे, विचलीत होत नाही. ट्याचे भगवंतावरचे प्रेम सर्व स्थितींमधे कायमच राहते, कमी होते नाही.

श्रीमद्भगवद्गीते मधे भगवंतांनी ही खात्री दिली आहे की भगवंत अशा भक्ताचा योगक्षेम स्वत: चालवतात. ह्या कारणास्तव तुकाराम माहाराज अभंगाच्या शेवटच्या कडव्यांमधे अशा आंतरिक मानसपूजेचाच सर्वोत्तम पूजा म्हणुन स्विकार करताहेत.

अभंगाची शिकवण :-

**अशी मानसपूजा करावी  कारण  हा एक पर्मार्थ साधनेचा महत्वाचा भाग आहे.**

ॐ

**************

**अभंग :- ज्यांचा विश्वास नसतो अशा लोकांना परमार्थ  करण्यास सांगू नये.**

**अभंग :-**

सोनियाचे ताट क्षीरीने भरले । भक्षावया दिले श्वानालागी ॥१ ॥
मुक्ताफळाहार खरासी घातला । क्स्तुरी सुकराला चोजविली ॥ २॥
वेदपरायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची तें खूण काय जाणे ॥ ३ ॥
तुका म्हणें ज्याचें तोचि एक जाणे । भक्तीचें महिमान साधू जाणें ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ**

जर स्वादिष्ट खीरीने सोन्याचे ताट कुत्र्यासमोर खायला ठेवले , किंवा जर गाढवाला उत्तमोत्तम फळांचा आहार खायला ठेवला, अथवा डुक्कराला कस्तुरीने माखले ; तर हे सर्व व्यर्थ आहे. तसेच जर एखाद्या वेदपरायण व्यक्तीने बहिरे असलेल्या माणसापुढे ज्ञानपूर्ण प्रवचन केले तरी हया सर्व क्रिया म्हणजे पालथ्या घड्यावर पाणी ओतण्याप्रमाणे व्यर्थच होतात. ह्याच दृष्टांताप्रमाणे जो साधू सज्जन असतो तोच भक्तीचा महीमा समजू शकतो.

अभंगाचे अर्थ स्पष्टीकरण :-  तुकाराम महाराजांनी ह्या अभंगाद्वारे हेच सांगितले आहे की आपल्याला जरी मनापासून पटले असेल की भगवंताची भक्ति करावी तरि ते इतर लोक ज्यांना त्यामधे रस नसेल अशांना सांगण्याच्या भानगडीत पडू नये. जो साधू सज्ज्न असतो त्याला भगवद्भक्ती म्हणजे काय व भक्तिचा महीमा काय आहे हे सहज समजते त्याला वगळे सांगावेच लागत  नाही..

तुकाराम महाराजांनी एका अभंगामधे म्हटलेच आहे की " बहुत सुकृतांची जोडी म्हणून विठ्ठली आवडी " अर्थात जर अनेक जन्मांचे पुण्य पदरी असेल तरच विठ्ठलाविषयी (भगवंताविषयी ) प्रेम भक्ती निर्माण होते व्यवहारामधे हीच शिकवण जवळजवळ सगळीकडे लागू होते.

**अभंगाची शिकवण**:- ज्याला भगवंत अमधे रस विइश्वास नसेल अशा व्यक्तीला परमार्थ सांगायच्या भानगडीत पडू नये.

ॐ

*************

# भाग ६.४



**सत्संग, भाव व श्रद्धा यांचे महत्व सांगणारे अभंग ह्या भागात आहेत.**

**अभंग :- भगवंत आहेच ह्या भावाने विचार करा.**

शुकसनकादिकीं उभारिला बाहो । परिक्षिती लाहो दिसां सातां॥ १॥
उठाउठी करी स्मरणाचा धांवा । धरवत देवा नाहीं धीर ॥ २ ॥
त्वरा जाली गरुडा टाकियलें मागें । द्रौपदीच्या लागें नारायणा ॥ ३॥
तुका म्हणें करी बहुत तांतडी ।प्रेमाची आवडी लोभा पूर ॥ ४॥

**अभंगाच शब्दार्थ :-**

परिक्षिताने सात दिवसांत जेंव्हा शुकसनकादिकांनी सांगितलेले भागवत पुराण ऐकले तेंव्हा त्याला सातव्या दिवशीच मोक्षलाभ झाला ॥ १॥
जेंव्हा भक्ताकडुन सतत भगवंताला आळविले जाते तेंव्हा त्याला (अशा भक्तावर कृपाकरण्यासाठी) धीर धरवत नाही ॥ २॥
घाई झाल्याने तो गरुडालाही मागे सोडुन अशा भक्ताकडे धावत येतो, तो द्रौपदीच्या रक्षणासाठी असाच धावला होता ॥ ३॥
तुका म्हणतो की भगवंत नेहमीच तांतडिने भक्तावरच्या प्रेमापोटी धावून येतो ॥ ४॥

**अभंगामागची भूमिका :-**

मोक्ष केंव्हा मिळतो हे ह्या अभंगात स्पष्ट केले आहे. येथे **वेळ** ह्या दृष्टिने वेळेचा अर्थ घ्यायचा नाही तर मनामधे काय भाव असावा लागतो ते येथे महत्वाचे आहे. हा भाव कसा असावा ते ह्या अभंगावरून समजते.

आपण सर्वांनाच मोक्षाची आंस आहे. पण त्यासाठी आपल्याला घाई झालेली नाही. आपले सर्व व्यवहार झाल्यानंतर कधीतरी आपल्याला वाटते की आता मोक्षासाठी कांहितरी करावे. थोडक्यांत म्हणजे आपल्यामधे मुमुक्षत्व आहे पण ते तीव्र नाही.

पण जर मुमुक्षत्व तीव्र स्वरूपाचे असेल तर अशा माणसाला दुसरे कांहीही सुचत नाही. त्याचे सर्व प्रयत्न फक्त व फक्त मोक्षासाठीच असतात. ह्या अभंगामधे तुकाराम महाराजंनी भागवतामधील उदाहरणे देऊन हा मुद्दा स्पष्ट केला आहे..

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण** :-

.राजा परीक्षीताजवळ फक्त सात दिवसांचे आयुष्य शिल्लक आहे हे कळल्यामुळे ;आता मला मोक्ष कसा मिळेल ह्याचीच काळजी वाटत होती. सुदैवाने शुकाचार्य तेथे ईतर मुनिजनांसह आले. त्यांनी सात दिवसांत परिक्षिताला भागवत पुराण ऐकवले. तीव्र मुमुक्षत्वाचा उदय झाल्यामुळे राजाच्या मनामधे फक्त भगवंताचेच स्मरण राहिले व ईतर कोणत्याही वासना मनामधे राहिल्या नाहीत. ह्यामुळे तो मुक्त झाला.

.

जेंव्हा एखादा भक्त अत्यंत तळमळीने भगवंताला स्मरतो , तेंव्हा भगवंताला अश्या भक्ताची काळजी लागते. मग तो क्षणाचाही विलंब न लावता अशा भक्तासाठी धाव घेतो. द्रौपदीने असाच धावा वस्त्रहरणाच्यावेळी केला तेंव्हा तो असाच तिला सोडविण्यासाठी धावून गेला होता.

अभंगात तुकाराम महाराज हेच सांगताहेत की जर तुम्ही अशा प्रेमाने व अनन्यभावाने भगवंताचा धावा कराल तर तो तुमच्यासाठीपण असाच धावून येईल.

**अभंगाची शिकवण :-**

ह्या अभंगामुळे आपल्या आपली स्वत:ची खरी काय मनस्थिती आहे , आपल्याला खरेच कां मोक्ष ह्याच जन्मी हवा आहे कां? हे तपासता येते. ही तपासणी केली की काय करायचे तेही आपण ठरवू शकतो. हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.

.

ॐ

*******************

**अभंग :- प्रेम व भाव हाच भक्तीचा पाया होय.**

चित्ती नाही ते जवळी असोनि काय । वत्स सोडी माय तेणे न्याये ॥ १ ॥
प्रीतीचा वायू गोड लागे मात । जरी जाय चित्त मिळोनिया ॥ २ ॥
तुका म्हणे अवघे फिके भावाविण । मीठ नाही अन्न तेणे न्याये ॥ ३ ॥

शब्दार्थ : जेंव्हा पिल्ले मोठी होतात तेंव्हा ती आपल्या आईला सोडून जातात. ( हे आपण पक्षी व इतर प्राण्यांच्या बाबतित घडतांना नेहमी पाहातो.) खरेच आहे, जर मनांमधे जिव्हाळाच उरला नसेल तर एकत्र राहण्याच उपयोगच काय? ॥ १ ॥
तसेच जर मने मिळाली असतील तर मग त्या व्यक्तींच्या मधे जणू प्रेमाचे वारेच वाहत असते. मग आपल्या प्रिय व्यक्तीचे कोणतेही बोल गोडच वाटतात. ॥ २ ॥
जर जेवणात पुरेसे मीठ घातले नसेल तर जेवण अळणी लगते. ( जेवण जेवले जात नाही ); तसेच जर मनामधे प्रेमभाव नसेल तर सर्व कांही फिकेच वाटते ॥ ३ ॥

**हा अभंग समजण्यासाठी लागणारी पार्श्वभूमी :**

तुकाराम महारजांनी मोक्षाचे ध्येय प्राप्त करण्यासाठी नेहमीच देवाची भक्ति प्रतिपादित केली आहे. भक्ति करण्यामधे देवाबद्दल प्रेमभाव हाच सर्वात महत्वाचा असतो , हेच दृष्टांतांच्या द्वारे ह्या अभंगामधे सांगितले आहे.थोडक्यांत हा अभंग भक्ती करण्याच्या नव्हे घडण्याच्या क्रियेतला एक मुख्य पदर उलगडुन दाखवतो.

**हा अभंग आत्मपरीक्षणासाठी नक्कीच खूप उपयोगी आहे.**

**अभंगाचे अर्थ स्पष्टीकरण :-**

आपण जर माणसाव्यतिरिक्त इतर पक्षी व प्राण्यांचे जीवन जगण्याची पद्धत पाहिली तर असे आढळते की मोठे झाल्यानंतर सर्व प्राण्यांची पिल्ले आपल्या आईपासून दूर जातात.

ह्याचे कारण म्हणजे त्यांच्यामधे आईबद्दलचे प्रेम आटून गेलेले असते. पण जेंव्हा प्रेम व जिव्हाळा दोघांमधे असतो तेंव्हाचि स्थिती काय असते ह्याचा आपण सर्वांनाच अनुभव कधीना-कधी आलेला असतो. प्रेम असले की दुसरी व्यक्ती कशीही वागली , कांहीहि बोलली ( अगदी कटू शब्द जरी बोलली ) तरी ते शब्द प्रेमांत पडलेल्या माणसाला गोडच वाटतात. प्रेमाचा आविष्कार हा असा आनंददायी असतो.उदाहरणार्थ आई व मुलाचे प्रेम, किंवा पतिपत्नींचे

प्रेम . ह्या प्रेमभावनेमुळेच सर्व कांही गोडच वाटते. मग भांडणे वादविवाद हे चहाच्या कपामधील वादळाप्रमाणे तत्पुरते होतात.
पण जेंव्हा मने दुरावतात तेव्हा सर्व कांही उलटे असते. असे झाले की व्यक्ती एकमेकांपासून दुर होतात. .

येथे श्री.रामकृष्ण परमहंसाचे एक वचन आठवते. ते म्हणतात : “ व्याकुळता आली की अरुणोदय झाला म्हणून समजा. त्यानंतर लवकरच सूर्य उगवेल.
तीन प्रकारच्या ओढींची शक्ती एकत्र झाल्यास ईश्वर दर्शन देतो- १) विषयी माणसाची विषयासंबंधीची ओढ २) आईची बाळाबद्दल असणारी माया ३) सतीची पतीसाठी असणारी प्रीती. ह्या तिन्ही जर एखाद्यांत एकाचवेळी उद्भवतील तर त्या जोरावर ईश्वर दर्शन करून घेणे शक्य आहे.
( संदर्भ : कथाचरीतामृत पान ११-१२ अध्याय २ )

वल्लभाचार्याचे " मधुराष्टक नावाचे स्तोत्र आहे. त्यामधे बालमुकुद श्री.कृष्णाचे वर्णन आहे. रामकृष्ण म्हणतात तसे हे असे प्रेम उतन्न झाले की भक्ताच्या मनामधे ( जो भगवंताला (बालगोपालकृष्ण (लहान मूल)) म्हणून पाहतो व त्याची भक्ती करतो) भगवंताच्या प्रत्येक लीलेला , क्रियेला तो कसे पाहातो त्याचे समर्पक वर्णन आहे
असे प्रेम जर भगवंतासाठी मनात उत्पन्न झाले नसेल तर अर्थातच भक्तिचा पाहिजे तेवढा उपयोग होणार नाही. कदाचित आणखी एक जन्म घ्यावा लागेल.

**अभंगाची शिकवण :**

प्रेम सहवासाने वाटू लागते. अगदी साधे घर असेल ,त्यात कितीही गैरसोयी असल्या तरी असे घर बदलताना मनास खूप दु:ख होते हा अनुभव विचारत घेता येईल. मग सतत नामाच्या सहवासांत राहिल्याने नामचे प्रेम कां बरे येणार नाही? येथे शिकवण हीच आहे की असे

पराकोटिचे प्रेम भगवंतावर करा. त्याच्या भेटिसाठी व्याकूळ व्हा . असे व्हा. असे प्रेम मनात निर्माण झाले की भगवंत भेटणारच असे हा अभंग आपल्याला सांगतो आहे.

ॐ

*************

**अभंग :- भक्तीमार्गच सोपा आहे.**

अवघ्या वाटा जाल्या क्षीण । कळीं न घडे साधन ॥ १ ॥
उचित विधिविधान । न कळें न घडे सर्वथा ॥ २ ॥
भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नागवे वा पापा ॥ ३॥
येणें जाणें खेपा । येणेंचि खंडती ॥ ४॥
उभारोनि बाहे । विठो पालवित आहे ॥ ५॥
दांसा मीच साहे । मुखे बोले आपुल्या ॥ ६॥
भाविक विस्वासी । पार उतरिलें त्यासीं ॥ ७॥
तुका म्हणें नासी । कुतर्क्यांचें कपाळीं ॥ ८ ॥

## अभंगाचा शब्दार्थ :-

ह्या कलीयुगामधे कोणालाच योग्य ते विधिविधान माहीत नाही. त्यामुळे साधना होत नाही.जणू कांही सर्व वाटा हरवल्या आहेत. भक्तीमार्ग सोपा आहे व त्यामुळे पाप खंडते, पुण्य पदरी पडते, जन्ममृत्युच्या खेपा संपतात.विठ्ठल सर्वांना हात वर करूण बोलावतो आहे व सांगतो आहे की मीच तुमचा तारणारा आहे. पन ह्याव फक्त भाविक  लोक विश्वास ठेवतात , जे कुतर्क करणारे असतात त्यांच्या कपाळि मोक्ष कधीच नसतो.

**अभंगामागची भूमिका :-**

अध्यात्म शास्त्रामधे ईश्वर प्राप्तीसाठी अनेक मार्ग सांगितले आहेत. त्यातले मुख म्हणजे योगमार्ग, ज्ञान मार्ग, व भक्ती मार्ग हे होत. जर ह्या मार्गांची माहिती आपण पाहिली तर असे

आढळते की योगमार्गामधे यम, नियम आसन इत्यादि सर्व येतात. हे सर्व माहीत असलेला गुरुपण त्यासाठी लागतो. जर कांही चुका झाल्यातर नुकसानच होते. तसेच ज्ञान मार्गाचे पण आहे. आंगी प्रखर वैराग्य, सर्व आसक्तीचा त्यागघडावा लागतो. मुख्य म्हणजे अहंकाराच समूळ नष्टव्हावा लागतो. प्रपंच करणे कठीण जाते त्याचा त्यागच करावा लागतो.शरीराने नसला तरी मनाने तरी हा त्याग व्हावाच लागतो. ऐकूण योगमार्ग काय वा ज्ञान मार्ग काय दोन्ही चालणे सर्वसामान्य माणसाला कठीणच असते.

ह्याच कारणास्तव सर्व संतांप्रमाणे तुकाराम महाराजांनी पण भक्तीमार्गच चांगला आहे; तोच चोखाळावा असे ह्या अभंगात सांगितले आहे..

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :--**

**अभंगाच्या १ ल्या व २ ऱ्याच** चरणांमधे तुकाराम महाराज म्हणताहेत की सध्याच्या ह्या कलीयुगामधे माणसाला भगवंताची प्राप्ती होण्यासाठी साधा करणे कठीण झाले आहे. त्यामुळे जरी ईतर अनेक मार्ग आहेत तरी त्या मार्गांचे आचरण करण्याची क्षमताच माणसात उरलेली नाही य़ोग्य ते विधिविधान करणे जवळजवळ अशक्यच झाले आहे.

आपल्यापैकी अनेकांचा हा अनुभव आहे की साधी सत्यनारायणाची पूजासुद्धा साग्रसंगीत कशी करायची याचे आपल्याजवळ ज्ञान नाहि. विधीविधानच माहित नसण्याचा ह्यावरून अर्थ काढता येईल. असो.
तरीही निराश होण्याचे कारण नाही.
**महाराज तिसऱ्या व ४ थ्या** चरणात हे स्पष्ट करताहेत की भक्तिमार्ग सोपाच आहे.
आपण सर्व हे जाणतोच आहोत की पापामुळे फळे भोगण्यासाठी जन्ममृत्यूचक्रामधे जीव गुंततो व अनेक जन्मासाठी यातना भोगत राहतो. पुण्यजरी केले तरी स्वर्गामधे सुखे भोगण्यासाठी जातो. पुण्यक्षय झाला की पुन: जन्म घेतो व जन्म मृत्यूचक्रामधे अडकतो. दोन्ही हानीकारकच आहेत. पण भक्तीमुळे माणसाचे पाप जसे नष्ट होत तसेच पुण्याचाही क्षय होतो व म्हणुनच माणसाल मोक्ष मिळतो.

अर्थात ४थ्या चरणात म्हटल्याप्रमाणे भक्तिनेच हे साध्य होते.

**अभंगाच्या ५ व्या चरणामधे** तुकाराम महाराज म्हणताहेत की भगवंता निरनिराळया खुणांद्वारे भक्ताने आपल्याकडे लक्ष द्यावे हेच सुचवित असतो. पण आपण त्याच्याकडे लक्षच देत नाही.

हा मुद्दा समजण्यासाठी थोदेसे विवरण आवश्यक आहे. ते खाली देत आहे.

आपल्याला ह्या जगामधे अनेक ताप होत असतात. कांही स्वत:च्याच मुळे होतात तर कांही दुसऱ्या वस्तू वा जीवांकडून होतात. ह्या सर्वातून भगवंताशिवाय कोणीही सुटका करू शकणार नाही असे जेंव्हा लक्षांत येते तेंव्हाच माणूस ईश्वरभक्ती करू लागतो.

**पण शाहाणा विवेकी मात्र एवढे होण्याची वाट पाहात नाही . असो.**

**अभंगाच्या ५ , ६ व ७ व्या** चरणामधे तुकाराम महाराजांनी आपल्याला भगवंताच्या वचनाची आठवण करून दिलेली आहे. हे भगवद्गीतेमधील प्रसिद्ध वचन खालील प्रमाणे आहे.

**अनन्याश्चिंतयंतो माम् ये जना: पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानाम् योगक्षेमं वहाम्यहम् ।**

जो मला अनन्यभावे शरणागत आहे त्याचा योगक्षेम मीच वाहातो . त्याची सर्व काळजी मी घेतो असा ह्या वचनाचा शाब्दिक अर्थ आहे.

**येथे भगवंताला संपूर्णपणे शरण जाणे एवढेच अपेक्षित आहे.**

अभंगाच्या शेवटच्या चरणामधे महाराजांनी एक सुचना दिलेली आहे. महाराज येथे म्हणतात की ज्यांनी ह्या भगवद्वचनावर विश्वास ठेवून आचरण केले आहे तेच भवसागर तरले आहेत. जो कुतर्क करत राहील त्याच्या कपाळीचे दुख:भोग कधीच संपणार नाहीत. अध्यात्मात ह्या श्रद्धेचे फार मोठे महत्व आहे. ज्याची अशी श्रद्धा असते त्यालाच ह्यातुकाराम महाराजांच्या वचनाचा अनुभव येईल.

**अभंगाची शिकवण :-**

शिकवण हीच आहे की व्यर्थ० वेळ न घालवता भगवद्भक्तीला लागावे..
०

ॐ

**************

**अभंग :- भाव असला की माणूस नक्कीचमुक्त होतो.**

अन्नाच्या परीमळे जरी जाय भूक। तरी कांहे पाक घरोघरी ॥ १ ॥
अपुलाले हीत तुम्ही करारें स्वहित। वाचे स्मरा नित्य रामराम ॥ २॥
देखोनि जीवन जरी जाय तहान। तरिं कां साठवण घरोघरिं ॥ ३॥
देखोनिया छाया सुख न पविजे। जंव न बैसिजे तया तळीं ॥ ४॥
हित तरी होय गाता आइकतां। जरी राहे चित्ता दढ भाव ॥ ५ ॥
**तुका म्हणे होसी भावेचि तू मुक्त।** काय करिसी युक्त जाणिवेची ॥ ६॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

जर जेवणाच्या सुवासाने भूक भागली असती तर घरोघरी पाकाची काय गरज ?॥ १॥

नित्य रामराम स्मरण करून तुम्ही आपापले हित साधून घ्या ॥ २॥

जर पाणी पाहून तहान भागती तर मग त्याची साठवण करण्याची गरजच नाही.॥ ३॥

जोपर्यंत झाडाच्या छायेखाली मनुष्य बसला नाही तोपर्यंत त्याला सावलीचे सुख कळणार नाही ॥ ४॥

जर चितामधे दृढ भाव असेल तर (भगवंताचे गुण) गाऊनव ऐकून हित होते ॥ ५॥

तुका म्हणतो की फक्त भाव पुरेसा आहे. दृढ भावानेच तू मुक्त होशील ॥ ६॥

**अभंगाच्या मागची भूमिका :-**

आत्मज्ञान व्हावे म्हणजेच देवाची भेट व्हावी म्हणुन लोक अनेक प्रकारची उपासना करत असतात. कोणी अनेक पूजा अर्चा करतात. कोणी तीर्थयात्रा करतात. होमहवन करतात. कोणी सर्व सोडून संन्यास घेतात व वनामधे जाऊन तपश्चर्या करतात. उपास करतात. निरनिराळया देवळांत जाऊन देवाचे दर्शन घेतात. य़ोगसाधना करतात. ध्यान करतात. पोथ्यांची पारायणे करतात. नामसप्ताह , भागवत सप्ताह ईत्यादी अनेक प्रयत्न करतात.

पण तरीही हातीं कांहीच पडले नाही असाच अनेकांना अनुभव असतो. ह्याचा अर्थ हाच की साधनेमधे कांहितरी कमतरता राहीली असते. ही कोणती त्रुटी असते तेच ह्या अभंगात तुकाराम महाराज आपल्याला सांगत आहेत.

**तुकाराम महाराजांनी पहिल्या, तिसऱ्या व चौथ्या चरंणांत तीन दृष्टांत ह्या अभंगात देऊन ; माणसाने काय प्रयत्न करावे ते दुसऱ्या चरणात सांगितले आहे. हे सांगून मग काय कंमी पडते त्याचाही उलगडा ५ व ६ व्या चरणांत केलेला आहे**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

महाराज म्हणतात की जर उत्तम सुवासिक जेवणाच्या वास घेण्यानेच जर भूक शमली असती तर मग स्वयंपाकाची आवश्यकताच पडली नसती. किंवा जर पाणी पाहून तहान भागली असती तर कोणीच पाण्याचा साठा केला नसता. प्रखर उन्हामधे चालल्यावर झाडाची छाया दिसल्याने उपयोगाचे नाही. आपण जर सावलीचे खाली बसलो तरच थंड सावलीचे सुख मिळेल. थोडक्यांत म्हणजे योग्य तो प्रयत्न हा हवाच. तो केला म्हणजेच अन्न खाले, वा पाणी साठा करून मग वापरले, सावली पाहून ती खाली जाऊन बसले ; तरच ह्या सर्व केलेल्या प्रयत्नांचे योग्य ते फळ मिळते.

तद्वतच ईश्वराचे दर्शन अर्थात भगवताची भेट ( म्हणजेच आत्मज्ञान ) होण्यासाटी माणसाने जरूर प्रयत्न करात रहावे. हे प्रयत्न कोणते ते महाराज अभंगाच्या दुसऱ्या चरणांत सांगताहेत.

ते प्रयत्न म्हणजे:-

सतत ( नित्य ) रामनामाचे स्मरण करावे. असे स्मरण करून तुम्ही स्वत:चे हित करून घ्या.

येथे हे स्पष्ट करावेसे वाटते की रामनामस्मरण म्हणजे राम राम म्हणणॆ नव्हे. स्मरण कोणत्याही नामाने करता येते. स्मरण करणे म्हणजे भगवंताचे कर्तृत्व लक्षांत घेणे. तोच खरा कर्ता आहे हे समजणे. काम नीट व्हावे म्हणुन योग्य ते सर्व प्रयत्न करणे. तो आपल्या प्रयत्नांचे जे फळ देईल ते आनंदाने स्विकारणे. कोणतेही काम करताना सतत ह्या मुद्द्यांचे

स्मरण ठेवणे. सर्वांमधे तोच विराजमान आहे हे ध्यानांत ठेवून सर्वांशी प्रेमानेच वागणे. असे वागणे तुकाराम महाराजच नव्हे तर सर्वच संतांना अपेक्षित आहे.

**पण जर खरा अनन्य भक्तीभाव देवाच्या ठायी नसेल तर सर्व व्यर्थ होते.** हा भावच अत्यंतमहत्वाची कामगिरी बजावतो. हा भाव येण्यासाठी आपल्याला भगवंत नेहमीच आईच्या मायेने सांभाळतो आहे ही जाणीव जागी होणे आवश्यक आहे. त्यासाठी अगदी सोपी पद्धत म्हणजे आपल्या आयुष्यांत होऊन गेलेल्या घटना आठवता येतात. किंवा एका डायरीमधे अश्या छोट्या मोठ्या घटनांची नोंद ठेवता येते. ह्या सर्व घटनांचे सिंहावलोकनच भगवंत आपल्यावर कशी माया व प्रेम करतोआहे त्याची जाणिव करून देते. अशी जाणीव झाल्यावर आपोआपच भगवंताठायी प्रेमभावाचा उदय होतो. तोच सर्वकर्ता हे मनापासून पटते. असो.

जर भगवंताठायी खरा अनन्य भाव असेल तर तुझ्या प्रयत्नांचे फळ नक्की तुला मिळेल अशीग्वाहीच महाराजांनी अभंगाच्या शेवटच्या चरणांत दिलेली आहे..

**अभंगाची शिकवण:-**

आपण असे अनन्य भावाने आपली साधना व प्रयत्न करतो आहोत कां? हा प्रश्न आपण स्वत:च स्वता:ला विचारायचा आहे. जे उत्तर मिळेल त्यावरून आपण स्वता:चे भले होण्यासाठी काय करायचे ते ठरवून तसे वागावे हीच माझ्यामते अभंगाची शिकवण आहे.

ॐ

**************

अभंग :_ साधनेचे मर्म

सरते माझं तुझें। तरि हें उतरते ओझें ॥ १॥
नलगे सांडावे मांडावे । आहे शुद्धचि स्वभावें॥ २॥
घातला तो आशा। मोहोजाळें गळां फांसा ॥ ३॥
सुखाचा तो मान । दु:खाचा तो शीण ॥ ४ ॥
करितां नारायण । एवढें वेचितां वचन ॥ ५ ॥
तैसा मान अपमान । लाभा हानि हे समान ॥ ६॥
तुका म्हणें याचे नांव सोवळें साचें ॥ ७ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

जर तुझे माझे हा द्वैतभाव नाहिसा झाला असता तर जीवात्म्यावरचे सर्व ओझे उतरले असते ॥ १ ॥ यावाचून कोणतीही गोष्ट करायला किंवा सोडावयाला नको . स्वस्वरूप स्वभावत: शुद्धच आहे ॥ २ ॥ प्रपंचाच्या मोहामुळे सर्व जीवांच्या गळयात आशेने एक पाश घातला आहे ॥ ३ ॥ स्वरूपामधे सुखाचा मान आहे व दु:खाचे श्रम नाहीत ॥ ४ ॥

सर्व कांही नारायणच आहे ,एवढे शब्द बोलावेत. ॥ ५ ॥

लाभ व हानी , मान व अपमान हे तो समान लेखतो ॥ ६ ॥ तुका म्हणतो की ह्यालाच खरे सोवळे म्हणतात ॥ ७ ॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठी मागची भूमिका :**

**हा अभंग साधकाने जी साधना करायची असते त्या साधनेची मर्म सांगणारा आहे .**

अभंगामधे चार मुद्दे येतात.

१) साधनेचे मर्म २ ) आत्मस्वरूप कसे आहे त्याचे वर्णन ३) आत्मस्वरूपाचे ज्ञान म्हणजे आत्म ज्ञान झाल्यावर मनाची काय स्थिती होते त्याचे वर्णन ४) ह्या साठी कोणते प्रयत्न करायला लागतात त्यांची दिशा सारांश रुपे काय आहे ? .

साधना करण्याचे मुख्य उद्देश्य कोणते? हे पाहायचे झाले तर खालील प्रमाणे म्हणता येते.

**जो ज्ञानमार्गी साधक आहे** त्याच्यासाठी आत्मज्ञान अर्थात माझे खरे स्वरूप काय आहे? मी कोण? हे जाणणे होय. तसेच **जो भक्तीमार्गी साधक आहे** त्याच्यासाठी भगवंताची भेट होणे ही साधनेचे उद्देश्य आहे.

दोन्ही ठिकाणी ( पहिल्या अभंगात पाहिले होते त्याप्रमाणे ) खरा देव म्हणजे परब्रह्म. हेच आहे दोन्ही मार्गांमधे त्याला आपलेसे करून घेण्यासाठी प्रयत्न करायचे असतात.

**ह्या भूमिकेच्या पायावरच ह्या अभंगाचा अर्थ खालील प्रमाणे लागतो.**

**अभंगाचा अर्थ :**

वर लिहिलेल्या चार मुद्द्यांसाठी स्पष्टीकरण म्हणजेच अभंगाचा अर्थ आहे व तोच ह्यापुढच्या विवरणांत लिहिला आहे.

**१) आत्मस्वरूप कसे आहे ?** ह्याचे वर्णन अभंगाच्या **शेवटच्या व दुसऱ्या** चरणांमधे येते. परब्रह्म म्हणजेच भगवंताचे स्वरूप किंवा आत्मस्वरूप . हे कसे आहे ते महाराजांनी सांगण्यासाठी अभंगाच्या शेवटचा पदामधे ( तुकाराम महाराज) "सोवळे" हा शब्द वापरला आहे सोवळे म्हणजे शुद्ध. ज्याला कसलाही डाग , विकार नाही असे. अर्थात हा शब्द परब्रह्मालाच उद्देशून आहे हे स्पष्टच आहे. आत्मस्वरूप हे शुद्ध आहे. त्याच्याठिकाणी कसलाही विकार नाही असा ह्याचा अर्थ घ्यायचा आहे.

शास्त्रांमधे परब्रह्माची १४ नांवे आहेत. जसे ॐ इत्याक्षर ब्रह्म , खंब्रह्म इत्यादि. **पण शेवटी शब्द हे जडांतले. त्यांना मर्यादा आहेत.** ब्रह्माला नाहीत. वेदांनी नेति-नेति म्हणजे कळत नाही असे म्हणले आहे. साखरेची गोडी जशी शब्दांनी वर्णन करून सांगता येत नाही तसेच. **" परब्रह्माचे वर्णन करता येत नाही हेच त्याचे खरे वर्णन आहे.**” म्हणूनच तुकाराम महाराजांनी "सोवळे = शुद्ध" हा शब्द अभंगात म्हटलेला आहे.

**२)ह्या आत्मस्वरूपाचे ज्ञान झाले की अशा व्यक्तीच्या मनाची काय स्थिती असते? तिचे वर्णन अभंगाच्या ४ , ६ व ७ ह्या चरणांमधे येते.**

ह्या परब्रह्माशी एकरूपता झाली की द्वैत संपते. द्वैत म्हणजे आपण व भगवंत ( परब्रह्म) यांच्या मधे वेगळेपण. जो ब्रह्मानुभव घेतो तो नेहमीकरता द्वैत भावातून सुटतो. सर्व विश्वच मग त्याला आपणच आहोत हे स्पष्टपणे सतत जाणवत राह्ते. असे झाले की कोणी कोणाचा मान ठेवायचा ? ज्याचा मान ठेवायचा व ज्याचा अपमान होतो ते दोन्ही एकच . तसेच कॊणी कोणाकडून काय घ्यायचे? ज्याचा फायदा होतो तो व ज्याचे नुकसान होते तो दोघेही एकच ज्याला सुख होते तो व ज्याला दु:ख होते तो तेही वेगळे नाहीत. म्हणुनच आत्मस्वरूपाचे ज्ञान झाले की ह्या सर्वांना अर्थच उरत नाही. म्हणूनच आत्मज्ञान झाले की जन्माचे साफल्य झाले असे म्हणतात जन्म-मॄत्यु चक्रांतून सुटका होणे हे आत्मज्ञान झाल्यानेच घडते. **हाच शरीरांत चैतन्य असतानाच म्हणजे ह्याच जन्मामधे मिळालेला मोक्ष होय.**

**३) साधनेचे मर्म कोणते काय आहे ? ४) ह्या साठी काय प्रयत्नांची काय दिशा आहे?**

अभंगाच्या पहिल्याच चरणांमधे महाराज म्हणाताहेत की जर तुझे माझे पण संपले तर जीवाच्यावरचे सर्व ओझे उतरले असे म्हणता येते. हे ओझे कोणते पहायचे झाले तर जन्म-मृत्युच्या चक्रामधे अडकल्याने जी सुखे व दु:खे भोगावी लागतात ती सर्व म्हणजेच हे ओझे आहे. महाराज पुढे म्हणतात की आत्मस्वरूप शुद्धच आहे. ते प्रगट व्हायला कांहीही व्यवहार सोडावे लागत नाही.

**ह्या ज्ञानमार्गातला भाग आहे.** ह्या मार्गामधे " अहं ब्रह्मास्मि " म्हणजे मीच ब्रह्मस्वरूप आहे ही धारणा सतत जागृत रहायाला हवी. मग तुम्ही संसारतली कामे करून जीवन व्यतीत करा किंवा संन्यास घेऊन वनांमधे जाऊन ध्यान करा . कांही फरक पडत नाही. सतत ही **जाणीव मात्र जागी हवी की मी ब्रह्मस्वरूपच आहे.**

**अशी जाणीव सतत जागी असणे हे; व ही मनाची स्थिती साधता येणे हे ज्ञानमार्गाच्या साधनेचे मर्म आहे.**

**भक्ती मार्गामधे** सुरवातीला भगवंत व भक्त हे वेगवेगळे असतात. . म्हणूनच भक्त भगवंताशी कांही नाते जोडू शकतो. सखा, प्रियकर, , स्वामी , आई , बंधू असे कोणतेही हे नाते आपापल्या वृत्तीनुसार हे नाते तयार होते. ह्या नात्यामधे भगवंतच आपला सर्व कांही आहे व दुसरा कोणीही नाही हा अनन्य भाव पण असावा लागतो. **. असा भाव साधणे , अशी मनाची स्थिती होणे हे भक्तिमार्गातल्या साधनेचे मर्म आहे.**

**दोन्ही मार्गामधे दृश्याचे प्रेम आसक्ती सुटायला हवी . हेच** अभंगाच्या " आशेने गळयांत मोहाचा फासा घातला " ह्या तिसऱ्या चरणांत तुकाराम महाराजांनी सांगितले आहे.

**ज्ञानमार्गी साधक ह्या साठी " सार-असार " “ शाश्वत – अशाश्वत " हा विचार करुन आसक्ती सोडण्याच प्रयत्न करत असतो.**

**जो भक्तिमार्गी असतो तो " सर्व करणारा नारायण " हे समजून जगामधे वावरत असतो.**

**<u>अभंगाचा ५वा चरण हेच सांगतो आहे.</u>**

ह्या स्पष्टीकरणामधे अभंगाचा अर्थ पुढे आलेला आहे असे मला वाटते.

**अभंगाची शिकवण  : आत्मज्ञान व्हावे यासाठी प्रयत्न काय करायचे ह्याची फक्त दिशा येथे आढळते. महाराजांच्या इतर अभंगात विस्ताराने ह्या प्रयत्नांचे वर्णन करणारे अभंग आहेत. आपण ते नंतर पाहणारच आहोत.**

ॐ

*******************

अभंग :- संगतीचा परिणाम

ढेकणाचे संगें हिरा जो भंगला । कुसंगे वाढला साधू जैसा ॥ १ ॥
ओढाळाच्या संगे सात्विक नासती । क्षण एक नाडली समागमे \\ २ ॥
डांकाचे संगती सोने हीन झाले । मोल ते तुटले लक्ष कोटी ॥ ३ ॥
विषानें पक्वान्नें गोड कडू झाली । कुसंगाने केली तैसी परी ॥ ४ ॥
तुका हा सत्संग हा बरा । कुसंग हा फेरा चौर्यांशीचा ॥ ५ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

हिरा हा अत्यंत कठीण पदार्थ आहे पण जर त्याला ढेकणच्या रक्ताचा स्पर्श झाला तर मात्र तो फुटति.. तसेच जर साधूला कुसंगती लागली तर तो परमार्थमार्गावरून घसरतो.

बैलाच्या मागे लागल्याने सात्विक गाय नासते तिला ओढाळ म्हणतात.. शुद्ध सोन्यचे मोल किंमत खूप असते पण तेच सोने त्यामधे हलक्या दर्जाचे धातू मिसळले की त्याची किंमत खूप कमी होते. उत्तमोत्तम पक्वान्नामधे विष मिसळले की ते कॊणीही खाऊ शकत नाही जणु ते कडू होते.हा सगळा वाईट संगतीचा परीणाम होय.

म्हणुन तुकाराम महार्राज म्हणतात की चौऱ्याएंशी लक्ष योनिंमधे जन्म मरणाचा फ़ेरा चुकवायचा असेल तर सत्संग धरावा

**अभंगाच अर्थ समजण्यासाठी आवश्यक माहीती :**

आपल्या व्यवहारीक तसेच पार्मार्थीक जीवनामधे मनाची शुद्धता फार महत्वाची असते. जर मन शुद्ध व शांत असेल तर आपण हाती घेतलेले कार्य नीट पणे पुर्ण होते कारण आपण योग्य रीत्या विचार करुन ते कार्य करतो. कोठेही कोणचेही कार्य करतांना सावधानता राखणे आपल्याला

मदतच करते. सतर्क माणुसच नीट योजना आखू शकतो. याशिवाय अखंड चाळणा म्हणजे काम योग्य दिशेने होते आहे की नाही हे वेळोवेळि तपासणे हा सुद्धा सावधानतेचाच एक भाग आहे.

**ह्या अभंगामधे आपण आपल्या आयुष्यात निवडलेल्या संगतीचे परीणाम वर्णन करून आपल्याला परमार्थामधे कशी संगत धरावी ह्या मुद्द्यावर तुकाराम महाराजांच उपदेश आहे.**

संग म्हणजे आपले नातेवाईक व आजूबाजूची मंडळींचा सहवास एवढाच अर्थ घ्यायचा नाही. आपले निरनिराळे विचार हे सुद्धा आपल्या संगाचाच अविभाज्य भाग आह्वे हे पण लक्षांत घ्यायचे आहे.

एकदा गौतम बुद्ध त्यांच्या एका शिष्याबरोबर प्रवास करत होते. रस्त्यात एक नदी पार करून पुढे जायचे होते. दोघे तेथे आले तेंव्हा तेथे एक सुंदर तरुणी काठावर उभी होती. तिलापण नदीच्या पलीकडच्या काठवरच जायचे होते पण पाण्यामधे प्रवेश करण्यास ती घाबरत होती.पाणीपण तसे खोलच होते. बुद्धांनी तिला विचारले की ते तिला (जर ती त्यांच्या खांद्यावर बसयला तयार असेल तर ) पलीकडे नेऊ शकतील. तरुणी तयार झाली व बुद्धांनी तिला नदीपलीकडे नेले. त्यांना धन्यवाद देऊन तरुणी निघून गेली. रस्त्यामधे पुढे जाताना शिष्याने विचारले की तुम्ही संन्यासी असूनही त्या स्त्रीला असे कसे नेले? संन्याश्याला स्त्रीस्पर्श वर्ज्य असतो. बुद्ध म्हणाले की संन्यास्याने स्त्रीबद्द्ल मनामधे विचार करणे पण वर्ज्य आहे. ती तरूणी नदिपलिकडे उतरल्यावर मी तिला विसरलो पण तू अजूनही तिचाच विचार करतो आहेस. तू अजूनही तिच्याच संगतीत आहेस. सोड ही संगत.

**संगत ही अशी वैचारिक पण असू शकते नव्हे असते. कारण आपली स्मरणशक्ती.** आपल्या अनेक कार्यांचे मूळ कारण हे मन आहे व त्यामधील स्मरण. मनामधे विचार आल्यानंतरच आपण कोणतेही काम करतो. चांगले विचार असतील तर उत्तमच पण बरेच असे विचार असतात ज्यांमुळे आपण नको ते करून बसतो व नंतर पश्चातापाची वेळ येते. म्हणुन आपण आपल्या विचारांच्या संगाबद्दल; आपण सावध असायला हवे.

**अभंगाचे अर्थ स्पष्टीकरण :-**

संगतीचे महत्व पटावे म्हणून तुकाराम महाराजांनी अनेक (रोजच्या जीवनामधले) दृष्टांत दिले आहेत.

१) ढेकणाच्या रक्ताच्या संगामुळे अत्यंत कठीण हि सुद्धा फुटतो.

२) कुसंगामुळे सात्विक साधू रसातळाला जातो.

विश्वामित्र ऋषींचे उदाहरण प्रसिद्धच आहे. गायत्री मंत्राचा हा द्रष्टा ऋषी मेनका ह्या अप्सरेच्या प्रेमामधे पडला व त्यांची तपस्या भंग झाली.

३) शुद्ध सोन्यामधे हिणकस धातू मिसळले की त्याची किंमत कंमी होते.

४) एखादी चांगली गाय बैल व चारा यांच्या ओढीमुळे बिघडते.

५) पक्वांनांमधे विष मिसळले की ते खाण्यालायक रहात नाही.

ही व अशी अनेक उदाहरणे हेच स्पष्ट करतात की चांगली संगत असणे नेहमीच महत्वाचे आहे.

आपल्या काळतलेव उदाहरण श्री. रामकूष्ण परमहंसांच्या चरित्रात वाचायला मिळते.
एकदा ते एका व्यापारी गृहस्थाकडे गेले होते. तेथे जेवण झाल्यानंतर त्यांना तेथील चांदीची भांडी बरोबर न्यावी ही ईच्छा झाली. त्याक्षणी त्यांना कळले की तो व्यापारी गैरमार्गाने संपत्ती मिळवत होता म्हणून असे विचार मना मधे आले आहेत,.

चंदनाची पावडर असलेली थैली जर आपण आपल्या वस्त्रांत ठेवली तर वस्त्रांना चंदनाचा सुगंध लागतो .

असे संगतीचे महत्व आहे. असो.

**सत्संग म्हणजे काय ?**

**एक अर्थ हा आहे की :** चांगल्या शिकलेल्या सुसंस्कृत माणसांच्या साधूंच्या सहवासात राहणे ही सर्वोत्तम संगत होय.

**दुसरा अर्थ असा आहे की** : आपल्याला नेहमीच वर म्हटल्याप्रमाणे संगतीचा लाभ होणे तसे कठीणच असते. पण आपण चांगली पुस्तके , सद्ग्रंथांचे वाचन करणे, प्रवचने , कीर्तने ऐकणे, जे ऐकले त्यावर विचार मनन करणे व आचरणामधे आणणे ही पणउत्तम संगत होय.

**आणखी एक अर्थ हा आहे की** : नामस्मरण करणे . भगवंताचे कोणतेही नांम स्मरण केले की मनामधे त्या त्या देवतेची प्रतिमा तयार होते. ह्यामुळे आपण भगवंताच्या संगतीत राहतो. आपण आधीच्या अभंगामधे पाहिलेच आहे की मनामधे स्मरण करत आपण व्यवहारामधे राहू शकतो व्यवहारातली कामे करू शकतो.

**अभंगाची शिकवण :**

असे हे सत्संगतीचे महत्व आहे व ज्याला मोक्ष हवा आहे त्याने वेळ न घालविता सत्संगत धरावी हेच येथे सांगितले आहे.

ॐ

**************

**अभंग :- कोणाची संगत धरावी.**

अखंड जयां तुझी प्रीती । मज दे बा तयांची संगति ।
मग मी कमळापति तुज बा नाणीं कंटाळा ॥ १ ॥
पडून राहेन तये ठायीं । उगीच संतांचिये पायीं ।
न मागे न करी कांहीं । तुझी आण गा बिठोबा॥ २॥
तुम्ही आम्ही पीडों जेणें । दोन्ही वारतीं एकाने ।
बैसलों धरणें । हाका देत दाराशीं ॥ ३ ॥
तुका म्हणें या बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ।
न पाहिजे केला । अवघा माझा आव्हेर ॥ ४॥

**शब्दार्थ** :- हे कमळापती ( लक्ष्मीपति) भगवंता , तुझ्याविषयी ज्यांच्या मनामधे प्रीती आहे , अशांची संगत मला द्यावी , मग मी आणखी कांही मागून तुम्हाला माझा कंटाळा येईल असे वागणार नाही ॥ १ ॥

मी अशा संतांच्या पायाजवळ पडून राहेन , दुसरे कांही मागणार नाही, हे तुमची शपथ घेऊन सांगतो. ॥ २॥

हे विठठला मी तुझ्याजवळ नेहमी मागत राहतो व तुला असे वागून पीडा देतो . असे करण्याने मला पण पीडाहोते व तुला पण पीडा ( त्रास) होतो. माझे वर म्हटल्याप्रमाणे जे एकच मागणे आहे ते जर तू दिलेस तर दोघांना होणारा त्रास संपेल. म्हणूनच ते मिळावे ह्यासाठी मी तुझ्या दाराशी धरणे देत तुला हांका मारीत आहे ॥ ३॥
तुका म्हणतो ,हे विठ्ठला माझ्या ह्या बोलण्याकडे तू लक्ष दे व माझा त्याग करू नकोस॥ ४॥

**अभंगाच्या अर्थस्पष्टीकरणासाठी असणारी पार्श्वभूमी :-**

**अध्यात्मामध्ये** सत्संगतीला अत्यंत महत्व दिलेले आहे. ह्याचे कारण कदाचित हे असेल की अध्यात्माचे ध्येय (म्हणजे परब्रह्माशी एकरूपता साधणे, आत्मज्ञान अर्थात मोक्ष ) साधायचे असेल तर ज्याला ते साधले आहे त्याचेच मार्गदर्शन घेणे सर्वांत उत्तम होय हा विचार

आपण व्यवहारात सुद्धा अशाच कारणामुळे योग्य त्या गुरुंकडून मार्गदर्शन घेत असतो. जसे Phd साठी त्याच योग्यतेची व्यक्ती मार्गदर्शक म्हणुन लागते.

अध्यात्म शास्त्र तर अव्यक्त परब्रह्माचा शोध घेण्याचे शास्त्र आहे . त्यासाठीपण ज्याला असा शोध करणे जमले आहे तोच योग्य असणार हे सहज समजू शकते. असे आत्मज्ञान झालेल्या व्यक्तीलाच संत म्हणतात. आत्मज्ञान होणे हे करोडो मधे एकालाच झालेले असते व अशी व्यक्ती शोधणे महाकठीण काम असते.

परंतु संतानी त्यांची वाङ्मयमूर्ती ते जरी ब्रह्मरूप होऊन गेले असले तरी आपल्यासाठी मागे ठेवली आहे. ह्याबद्दल समर्थ रामदासांच्या चरीत्रामधला प्रसंग पुष्टी देणारा आहे.

**समर्थांनी समाधी घेण्याच्या आधी शिष्यांना सांगितले की**

माझी काया गेली खरे। परि मी आहे जगदाकारे ॥ ऐका स्वहित उत्तरे सांगेन ती ॥
नका करू खटपट । पहा माझा ग्रंथ नीट । तेणे सायुज्याची वाट ठायी पडे ॥
आत्माराम दासबोध । माझे स्वरूप प्रसिद्ध । असता न कराव खेद । भक्तजनी ॥.

हेच बाकीच्या संतांच्या साठी पण खरेच आहे.
असे ग्रंथ वाचणे व त्यात लिहिलेले समजून त्याप्रमाणे आचरण करणे ही सत्संगतच होय.

सत्संग, सत्कर्म व स्वधर्मपालन ही बहिरंग म्हणजे देहाचे आचरंण ; ह्याबरोबरच साधना करणे, सद्‌वासना व सदुपासना ह्या अंतरंग साधना करण्याने अर्थात अशा जीवनपद्धतीने राहूनच आत्मज्ञान होण्यास माणूस पात्र होतो.

***ह्या पार्श्वभूमीवरून अभंगाचा अर्थ स्पष्ट होतो तो पुढे लिहित आहे.***
***अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-***
तुकाराम महाराजांना पण हे माहीत आहे की सत्संगत लाभणे कठीणच व म्हणूनच ते **पहिल्याच कडव्यामधे;** भगवंताकडे हेच मागणे करताहेत की मला सत्संगत घडो. म्हणजे मग माझ्या कडून नि:ष्काम भक्ती घडेल.

येथे महाराजांनी भगवंताला कमलापती म्हणजे विष्णू संबोधले आहे. सर्व सृष्टीचे लालन पालन करणारे विष्णुभगवानच आहेत. म्हणजेच ते अखिल विश्वाचे राजे आहेत. त्यांच्या मनाप्रमाणे च सर्व होत असते. म्हणून महाराजांनी भगवंताच्या ह्या रूपाला उद्देशून अभंगाच पहिला चरण सांगितला आहे.

साधारणत: माणसे भगवंताकडेव सुख , संपत्ती, दीर्घायुष्य, आरोग्य , व सर्व मला हवे तसेच होऊ दे हीच मागणी करत असतात. त्यासाठीच व्रतेवैकल्ये, पूजा ईत्यादी करत असतात. हे मागणे म्हणजे कल्पवृक्षाकडे कवड्या मागण्यासारखे आहे.
तसेच जर कोणी आपल्याकडे सतत कांहितरी मागत असेल तर आपण सुद्धा अशा माणसाचा कंटाळा करतो व त्याला टाळतो. ***खरा भक्त हे समजून असतो की भगवंताकडे असे मागंणे अयोग्य आहे.*** **म्हणुनच महाराज पुढे म्हणतात** की मी असे मागून तुला माझा कंटाळा येईल असे करणार नाही.

**अभंगाच्या दुसऱ्या कडव्यामधे म**हाराज देवाकडे मागतात की मला अशा संताची भेट घडू दे मग मी त्यांच्या पायाशी आनंदाने राहीन. **सत्संगतच किती महत्वाची हे येथे पुन: एकदा स्पष्ट झाले.** अशी संगत मिळाली की मी ईतर कांहीही मागण्या करणार नाही हि शपथ पण महाराजांनी घेतली आहे.

**तिसऱ्या कडव्यांत** व्यवहारातल्या दृष्टांताचा आहे. महाराजांची हा अभंग लिहितानाची अवस्था तीव्र मुमुक्षूची आहे. अ्सा मुमुक्षू फक्त भगवंताचीच कामना करत असतो. पण कामना अजून पूर्ण झालेली नसते. त्यामुळे ह्या भावनेनेच सर्भव भक्ती होत असते.
व्यवहारात आपण पहातच असतो की जर एखादी व्यक्ती सारखे कांही मागत असेल , पिच्छा सोडत नसेल तर अशामुळे ज्याच्याकडे मागणे केले जाते तो माणुस त्रासतो. मागणारा व देऊ शकणारा दोघांना त्रास पीडा होत असते. ही पीडा तेंव्हाच संपते जेंव्हा मागणी पूर्ण होते.

महाराजांना हे माहीत आहे व आपण भगवंतला सतत मागण्या करून त्रासच देतो आहे असे त्यांना मनापासून वाटल्याने त्वायाचे वाईट पण वाटते आहे. म्हणून ते येथे भगवंताला म्हणताहेत की देवा एकदाची माझी सत्संगतीची मागणी पुरी करा. मग आपला दोघांना होणारा त्रास संपेल.

अभंगाच्या चौथ्या कडव्यामधे भगवंताची प्रार्थनावजा जणू क्षमायाचनाच आहे. येथे महाराज म्हणतात की देवा माझे वर लिहिले ते म्हणणे ऐकावे व मला दूर लोटू नये.

**अभंगाची शिकवण : -**

शिकवण हीच आहे की माणसाने सत्संगत धरावी व स्वत:चे भले करून घ्यावे.

ॐ

**************

**अभंग जोडी :- पांडुरंगाचे स्मरण ठेवा.**

**अभंग १ :-**

**ज्याचें जया ध्यान । तेंचिं होय त्याचें मन ॥१॥ म्हणूनी अवघे सारां । पांडुरंग दृढ धरा ॥ २ ॥**
**सम खूण ज्याचें पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥३॥ म्हणें नभा । परता अणूचाहि गाभा ॥ ४ ॥**

**अभंग २ रा:-**

**गोविंद गोविंद । मना लागलिया छंद॥१॥ मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ २॥**
**आनंदले मन । प्रेमें पाझरती लोचन॥ २॥ तुका म्हणें आळी । जेंवी नुरेंचि वेगळी ॥ ४**

**अभंगांचा शब्दार्थ :-**

**अभंग १ ला** :- ज्याला ज्या वस्तूचे ध्यान लागते , तसे त्याचे मन होते. म्हणून ( हे प्रापंचिक जनहो तुम्ही ) मनाने पांडुरंगाचे स्मरण दृढभावाने करा. तो सर्वव्यापी असूनही समचरण जोडून ( तुमच्यासाठी ) विटेवर उभा आहे व ही त्याची खूण लक्षांत असू द्या. तुका म्हणतो की तो भगवंत आकाशापेक्षाही थोर असून शिवाय अणुरेणूंच्याही मधे आहे

**अभंग २ रा** :- गोविंदाच्या नावाचा छंद मनाला लागला की मग अशा माणसाठीसाचा ( भक्ताचा ) देह पण गोविंद स्वरूपच होतो. त्याच्यामधे व भगवंतात कांहिच फरक राहात नाही. त्याचें मन आनंदित होते व भगवंतावरच्या प्रेमामुळे त्याच्या नयनांतून अश्रू वाहायला लागतात. जसे कुंभार माशीचा ध्यास घेतलेली आळी कुंभार माशीच होते. ( तसेच असा भक्त देवापेक्षावेगळा रहात नाही.)

**अभंगाची पार्श्वभूमी :-**

संत ज्ञानेश्वरमहाराजांनी एका ब्राह्मणास तुकाराम महाराजांकडे पाठवले होते. त्याला तुकाराम महाराजांनी जो उपदेश केला त्यातले हे दोन अभंग आहेत. संत हे कालातीत असल्याने असे होणे अशक्य नाही . परमहंस योगानंदांच्या “ओटोबायोग्राफी ओफ अ योगी " ह्या पुस्तकात म्हटल्याप्रमाणे प्रत्येकाचा गुरू कोण हे पण ठरलेले असते. म्हणजेच त्या ब्राह्मणाला ज्ञानेश्वर महाराजांचा दृष्टांत झाला असेल व तो तुकाराम महाराजांना भेटायला आला असेल.. असो. पण ह्या घटनेमुळे आपला फायदाच झाला आहे. कारण आपल्याला हे मार्गदर्शनपर अभंग मिळाले. तसेच खरा देव कोणता व मोक्ष म्हणजे काय हे समजून जर भक्ती घडेल तर भक्त

विहंगम मार्गाने जाऊ शकतो. कारण देवाबद्दलच्या प्रेमा बरोबरच सर्व दृश्याचे नाशवंतत्व कळल्याने त्याची दृश्यामधून आनंद ( विषयभोगांच्या मुळे मिळणार तात्पुरता क्षणीक आनंद ) मिळेल ही गैरसमजूत पण दूर होईल. परमार्थात असे आसक्तीरहीत होणे महत्वाचे आहे. विषयसक्तीच जीवाला जन्म-मृत्यूच्या बंधनात गुंतवते हे आपण सर्वजन जाणतोच. तुकाराम महाराजांचे दोनही अभंग ह्या भूमीकेवरच त्यांनी लिहिले आहेत.

**अभंगाच्या अर्थस्पष्टीकरणासाठी लागणारी कांही माहिती :-**

१) सर्वसाधारणत: आपण सर्वचजण, देव म्हणजे मंदिरातली अथवा देवघरामधली मूर्ती असे समजत असतो. अशी मूर्ती हे देवाचे सगूण पण अत्यंत मर्यादित रूप आहे. बाह्य दृश्याकडे पाहिले की असे आढळते की सर्व ग्रहतारे हे पण सगूणच आहे . ईशोपनिषद म्हणते त्याप्रमाणे हे सुद्धा भगवंताचे विराट रूप आहे. पण भगवंत ह्या दृश्यापेक्षा वेगळाच आहे.

हे भगवंताचे वेगळेपण स्वप्नाच्या दृष्टांताने समजू शकते. आपल्या स्वप्नसृष्टीतलॆ सर्व विश्व आपल्यामधूनच निर्माण झालेले असते व आपण त्यापेक्षा वेगळेच असतो . म्हणुन तर सुषुप्तीत म्हणजे गाढ झोपी गेल्यावर स्वप्नातील विश्व नष्ट होते. पण आपल्यावर त्याचा परीणाम होत नाही.

तसे खरा भगवंत पण आपण पाह्तो त्या विराट स्वरूपाच्या पेक्षा वेगळाच आहे. तोच विश्वनिर्माता आहे. भगवंताचे वर्णन तीन शब्दांमधे करायचे झाले तर " तो सर्वज्ञ , सर्वशक्तीमान, व सर्वव्यापी आहे.” असे करता येते.

भगवंतासच आपण ईश्वर असे पण संबोधत असतो. सूर्याचे प्रतिबिंब जसे सर्व पाण्याच्या सर्व तुषारांमधे असते तसाच तो पण सर्व चेतन व अचेतन पदार्थांना व्यापून आहे व आपल्या पंचेंद्रियांच्या पलीकडचा असल्याने आपल्याला तो दिसत नाही ,अनुभवास येत नाही.

म्हणून भगवंताच्या अनेक मूर्तींमधे आपण त्याला पाहतो. अनेक रूपे असल्याने त्याची अनेक नांवे पण आहेत. थोडक्यांत सर्व सगूणाचे अधिष्ठान म्हणजेच ईश्वर,,भगवंत, परब्रह्म हाच आहे.

२) सर्व संत व उपनिषदे हेच सांगतात की आपला मनुष्यजन्म भगवंताची भेट घेण्यासाठीच खरेतर आहे व अशी भेट होणे म्हणजेच मोक्ष होय. मोक्षाचे दुसरे नांव

सायोज्यमुक्ती . ह्यामुक्तीमधे आपण भगवंताशी ऐक्य पावतो व भगवंतासारखेच जन्ममृत्यातीत होतो. कोणत्यातरी भक्तीद्वारे हे साधते.

३) ह्या शिवाय तिसरा मुद्दा पुढीलप्रमाणे आहे.
वेदांतातली ज्ञानाची प्रक्रिया असे सांगते की " जेंव्हा माणुस एकादी वस्तू पाहतो तेंव्हा प्रथम तो त्यावस्तूशी एकरूप होतो. मग परत येतो व ह्याक्रियेमुळेच माणसाला वस्तूचे ज्ञान होते.

ह्या पार्श्वभूमीवरूनच आपल्याला अभंगाच्या अर्थ समजतो व असा समजलेला अर्थच आता पुढे लिहित आहे.

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

**अभंग १ चे स्पष्टीकरण:-**

**१ ल्या अभंगाच्या सुरवातीलाच "ज्याचें जया ध्यान । तेंचिं होय त्याचें मन।" ह्या चरणामधे** तुकाराम महाराजांनी वर लिहिलेल्या माहितीतल्या वेदांताप्रणित ज्ञान होण्याच्या क्रियेचेच वर्णन केले आहे. महाराज येथे म्हणताहेत की जर तुम्ही भगवंताचे ध्यान कराल तर तुम्ही त्याच्याशी त्यावेळी ऐक्य पावाल ध्यान करण्यासाठी भगवंताचे सगुण रूपाचे आलंबन आवश्यक असते. आपण जेंव्हा ह्यासगूण रूपाचे ध्यान करतो तेंव्हा आपले मन आपोआपच भगवंताशी ऐक्य पावते. पण ही अवस्था क्षणकालच टिकणारी आहे. त्यामुळे आपण पुन: दृश्याच्या भानावर येतो व एकदा कां दृश्याकडे आलो की दुसर्या विषयाकडे मन लगेच धाव घेते. मग भगवंताशी घडलेले ऐक्य भंगते.
ह्यावरचा उपाय एकच जो सर्व शास्त्रे व संत सांगतात . तो असा की प्रयत्नपूर्वक आपण ह्या दृश्याच्या पसार्यामधून मनाला परत भगवंताकडे वळावायचे. हे मनाला वळवणे फक्त अभ्यासानेच करता येईल.

ह्या अभ्यासातला एक सोपा भाग म्हणजे सतत नामस्मरण करत रहाणे. म्हणुनच अभंगाच्या **पुढच्या चरणामधे " म्हणूनी अवघे सारां । पांडुरंग दृढ धरा॥२॥ "** तुकाराम महाराज आपल्याला पांडुरंगाला दृढ धरा अर्थात सतत भगवंताचे स्मरण करा असे सांगत आहेत.

हे स्मरण सतत कसे करायचे? जसे भक्त ध्रुवाने केले तसे कां ? पण मग त्यासाठी आपल्याला संसार सोडून वनातच जावे लागेल ! पण तरीही असे सतत स्मरणे कठीणच! खरेतर संतांनी आपल्याला आपली कर्तव्यकर्म करणे सोडा असे कधीही सांगितलेले नाही. गीतेमधे पण भगवंत अर्जूनास युद्ध कर हेच सांगतात.

असे विचार व प्रश्न अर्थातच मनाला पडतात. त्यांचे उत्तर पहाण्यापूर्वी अभंगाच्या खालील चरणांचा अर्थ पाहणे उचित ठरते.

***“सम खूण ज्याचें पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥३॥ म्हणें नभा।परता अणूचाहि गाभा॥४॥*** परमार्थाच्या आचरणामधे सतत भगवंताचे स्मरण आपल्यामधील अहंभाव जाऊन तेथे भगवंताविषयी अत्यंत नम्रभाव अनन्यता यायला हवी.

***जेंव्हा आपण भगवंताचे विराट रूप ध्यानी घेऊ तेंव्हाच असा भाव आपोआपचे उपजतो.***

येथे पांडुरंगाचे अर्थात भगवंताचे वर्णन करताना तुकाराम महाराज आपल्याला मर्यादित देवघरातल्या सगूण रूपाकडून, भगवंताच्या विराट सगूणाकडे व तेथून अव्यक्ताकडे नेत आहेत.

आपण वावरतो ती सर्व सृष्टी अवकाश (Space) म्हणजे नभामधे उभी आहे. भगवंत तिच्याहून विराट आहे. तसेच भगवंत अणू रेणूंपेक्षाही सूक्ष्म आहे. ***म्हणुन अभंगात " नभा परता व अणूचा गाभा " ह्या शब्दांनी तुकाराम महाराजांनी भगवंताचे वर्णन केले आहे.***

असा हा खरा भगवंतच सर्व विराटाचे तसेच सूक्ष्म सगूणाचे म्हणजेच सर्व सृष्टीचे मुख्य व एकमेव अधिष्ठान होय. भगवद् गीतेमधे भगवान म्हणुनच सांगतात की परब्रह्माच्या एका अंशावर हे विश्व उभे आहे. तोच खरा कर्ता करविता आहे.

**आता आपल्याला अशा भगवंताचे स्मरण सतत कसे ठेवता येईल ते पाहता येते. ह्यासाठी तीनच मुख्य मुद्दे आहेत.**

१) भगवंत सर्वव्यापी आहे म्हणून सर्वांशीच प्रेमाने वागावे. शक्यतो समाजातल्या सर्वाचे भले कसे करता येईल त्यासाठी आपला हातभार असावा.

२) आपण जे कांही काम करतो ते त्याची पूजा आहे ह्याभावाने नीटपणे करावे. काम करताना हा भाव असला की त्याचे स्मरण आपोआपच घडते. तसेच ह्या पूजेचे फळ काय मिळेल ही चिंता करावी लागत नाही. योग्य ते फळ भगवंत देतोच.

३) तसेच योजनापूर्वक भगवंताच्या कोणत्याही नामाचा जप करावा. ह्यामुळे आपल्याला त्याची आठवण सतत राहते.

असे वागणे हेच वाचिक व शारिरिक तप होय.

असे वागणे जमण्यासाठीच रोज नियमितपणे प्रयत्न करावे, वेळोवेळी आपण योग्य दिशेने जातो आहोत की नाही ह्याच आढावा पण घेणे महत्वाचे आहे. कॊणतीही गोष्ट सवयीने जमू शकते. सवयलागायला साधारणत: ६ ते ८ आठवडे लागतात. त्यानंतर मग सोपे जाते.

सवय़ीचा परिणाम कसा असतो ते मागे एका अभंगाच्या स्पष्टीकरणामधे येऊन गेले आहे म्हणून पुनरावृत्ती येथे केलेली नाही. वारंवार एखादी गोष्ट केली की शरीराला त्याची सवय लागते. नामास्मरणाची पण सवय स्वत:ला लावता येते. असो.

**अभंग २ चे अर्थ स्पष्टीकरण:**

हा अभंग वरील अभंगाप्रमाणे आचरण केले अर्थात भगवंताचे नामस्मरण केले व, त्याच्या भेटीचा ध्यास लागला की काय परिणाम होतात हे सांगणारा आहे. मुख्य होणारा म्हणजे भगवताविषय़ी प्रेमभाव निर्माण होतो. असा प्रेमभाव निर्माण होणे ही फार मोठी व उच्चदर्जाची स्थिती होय. अशी स्थिती झाली की फक्त भगवंताचेच रूप सर्वत्र अनुभवास येऊ लागते. अशा भक्ताच प्रपंच भगवंतच चालवतो. (योगक्षेमं वहाम्यहम् असे भगवान श्रीकृष्ण गीतेत सांगतात) )

ह्या अभंगात तुकाराम महाराजांनी "गोविंद गोविंद" ह्या नामाचे स्मरण करायला सांगित्रले आहे. ***जसे पांडुरंग, श्रीराम हे भगवंताचे नाम आहे तसे गोविंद आहे असे वरकरणी वाटते. पण गोविंद ह्यानावाचा अर्थ "जो इंद्रियांचे नियमन ठेवतो/ करतो तो" असा पण अर्थ आहे व हाच भाव मनामधे धरून जर भगवद्स्मरण केले तर भगवंतच आपली बाह्य विषयांकडे धावणारी वृत्ती आवरेल व मग दृश्याची आसक्ती आपोआपच कमी होईल.*** असा ह्या व आधीच्या अभंगाचा संबंध पण स्पष्ट होतो. भगवंताचा ध्यास कसा असावा हे समजावे म्हणुन "कुंभार माशीने आपल्या घरट्यात नेऊन ठेवलेल्या आळिचे" उदाहरण तुकाराम महाराजांनी दिले आहे. अशा आळिला कुंभारमाशीविना ईतर कांही दिसत नाही. शेवटी अशी ही आळि पण कुम्भार माशीच होते. तसेच भक्ताचे बाबतीत होते व भक्त आणी भगवंत एकरूप होतात. भक्ताला सायोज्यमुक्ती मिळते.

**अभंगांची शिकवण :-**

भक्ती कशी असावी व करावी ह्यासाठी ह्या अभंगांमधून आपल्याला तुकाराम महाराजांचे मार्गदर्शन मिळालेले आहे. त्यानुसार आपण आपले आचरण करायला हवे, स्वत:ला नमस्मरण करण्याची आग्रहाने सवय लावून घ्यावी; हीच अभंगाची शिकवण आहे.

ॐ

***************

**अभंग :- सावधानता महत्वाची**

**स्मरणाचे वेळें ।व्हावें सावधान कळें।| 1 || पडिलो विषयांचे ओढी । कोणी न दिसेसे काढी ॥ 2॥**
**भांडवल माझें । वेच झालेंभूमी ओझे || 3 || तुका म्हणें कळें। तू चि धावे ऐसें कळें ॥4 ॥**

**शब्दार्थ :-**

भगवंताचे स्मरण करताना माझी वृत्ती सावध ठेवावी हे मला कळत नाही. ॥ १॥
मी विषयांच्या तावडित सापडलेलो आहे, व मला यातून कोणी सोडवेल असे वाटत नाही ॥ २॥

माझे जे भांडवल होते ते सर्व खर्च झाले आहे आणी ह्या देहाचे भूमीला ओझें झाले आहे ॥ ३॥
तुका म्हणतो की हे देवा आता तूंच धावून यावे असे मला वाटते ॥ ४॥
अभंगाचा अर्थ समजण्यासाठी लागणारी माहिती :-

ह्या अभंगामधे तुकाराम महाराजांनी देवाच्या भेटीची आस लागलेल्या मुमुक्षू भक्ताच्या मनस्थितीचेच जणू वर्णन केलेले आहे. अशा भक्ताला हे कळलेले आसते की भगवंताच्या भेटी साठीच आपल्याला हा नरदेह मिळालेला आहे व त्यासाठी प्रयत्न पण त्याने सुरु केलेले असतात. परंतू जरी मुमुक्षत्वाचा मनमधे उदय झालेला असला तरी ती अगदी सुरवातीची अवस्था म्हणजे जवळजवळ बद्धावस्थाच असते. त्यामुळे मनात असूनही मन बाह्य भोगांकडे व विषयांकडे धावत असते. आपले प्रयत्न अपुरे पडत आहे हे कळत असते . थोडक्यात कळते पण वळत नसते. अशावेळी भक्ताला आपल्याला परमार्थसाधना जमत नाही याची खंत वाटत असते. आपण सर्वचजण साधारणत: सध्या मनाच्या ह्या अशा स्थितीत आहोत म्हणुनच आपल्यासाठी हा अभंग महत्वाचा आहे.

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

अभंगाच्या पहिल्याच चरणामधे तुकाराम महाराजांनी "सावधान व्हावे "असे शब्द लिहिले आहेत. सावधान व्हायचे ते भगवंताच्या भेटीच्या प्रयत्नांमधे यश मिळावे म्हणून. पण आपण असे खरेच सावधान आहोत कां ? हा प्रश्न प्रत्येकाने स्वत:स विचारायला हवा .असो. ”

**अर्थात जर आपल्याला आपल्या बेसावध असण्याचे मूळ कारण कोणते आहे हे कळले तर मग योग्य तो उपाय करणे शक्य आहे.**

**तुकाराम महाराजांच्या खालील अभंगात आपल्याला महाराजांनी हे मूळ कारण सांगितले आहे.**

पडिली हें रूढी जगा परिचार । **चालविती वेव्हार सत्य म्हणुनि** ॥ १॥
**मरणाची कां रे नाही आठवण** । संचिताचें धन लाभ ठेवा ॥ २॥
देहाचें भय तें काळांचे भातुकें । ग्रासुनी तें एकें ठेविलेसें ॥ ३ ॥
तुका म्हणें कांही उघडां रें डोळें । जागोनिं अंधळे होऊं नका ॥ ४ ॥

**ह्या अभंगात "मृत्यू आपल्यावर केंव्हाही झडप घालेल (नरजन्माची अमोल संधी व्यर्थ जाईल) ह्या सत्याचा विसर पडणें " हेच मूळ कारण सांगितले आहे.**

हे जगतच व ह्यातील पदार्थ विषय तसेच त्यांच्या भोगाने मिळणारा आनंद हेच खरे आहेत असे समजून जवळजवळ सर्वच लोक जगाच्या व्यवहारात गुंतून राहतात. स्वत:वर मृत्यूची झडप कधीही पडू शकते हे विसरूनच सर्व व्यवहार करत असतात.अभंगात तुकाराम महाराज ह्या कटू सत्याची आपल्याला आठवण करून विचारताहेत की हे कसे विसरलात? तुम्ही जे सत्कर्म केले त्यामुळे ह्या जन्मात तुम्हाला सुखे मिळाली. पण हा ठेवा संपल्यावर मग परत जन्म घ्यावा लागेल. पुन: दु:खे भोगावी लागतील. क्षणोक्षणी देह मृत्यूकडे धावतो आहे. आता तरी डोळे उघडा. कळत असूनही आंधळे होऊ नका.

हाच मुद्दा समर्थ रामदासस्वामी खालील ओव्यांमधे सांगतातहेत.

**संसार म्हणजे सवेचि स्वार । नाही मरणास उधार। मापी लागले शरीर । घडिने घडी ॥**
**सरता संचिताचे शेष । नाही क्षणाचा अवकाश । भरता न भरता निमेष । जाणे लागे ॥**
**देह परमार्थी लावले। तरीच याचें सार्थक जाले।नाही तरी तें वेर्थची गेले।नाना आघाते मृत्यपंथे ॥**

***म्हणुन आपण आपला प्रत्येक क्षण भगवंताच्या प्राप्ती करता खर्च करतो आहोत ह्या बाबत सावधानता ठेवली पाहिजे. नामस्मरणद्वारे भगवंताची आठवण सतत ठेवता येते.***

तसेच जर शरीराला रोगांनी ग्रासले तर आपले सर्व लक्ष शरीराकडेच राहते व भगवंताचा मग विसर पडतो. म्हणून ***शरीराला तंदुरुस्त ठेवण्याविषयी पण आपण सतत सावध रहायला पाहिजे.***

***त्यासाठी योग्यते व्यायाम, जीभेवर ताबा हा हवाच.***

शेवटचा मुद्दा :- ***आपल्या शरीर व मनाला जर एखादी सवय लावायची असली तर ती गोष्ट वारंवार करावी लागते. म्हणून स्वत:ला सतत सावधान रहण्याची सवय लावून घ्यावी लागेल.***

**अभंगाच्या दुसऱ्या चरणामधे** महाराज म्हणतात की आढळते हेच की फक्त विषयभोगांकरताच सर्वसाधारणत: लोक सावध असतात. तसेच सावध करायला दुसरे कोणीही मदत करत नाही.

**अभंगाच्या तिसऱ्या चरणामधे** तुकाराम महाराज स्वत:ला अशा लोकांसारखे कल्पून म्हणताहेत की असे वागून मी माझे सर्व भांडवल ( येथे भांडवल म्हणजे देह, मन व विचार करणारी बुद्धी व

वेळ ) आता खर्च झाले आहे व आता मी भूमीला भारभूत झालो आहे.थोडक्यांत म्हणजे सर्वनाश झाला आहे.एक भगवंतच तो आपल्याला सध्याच्या वर्णन केलेल्या स्थितीतून बाहेर काढू शकतो हे समजल्यामुळे , **अभंगाच्या शेवटच्या चरणामधे महाराज भगवंतालाच हांक मारताहेत. ह्यालाच शरणागत भाव म्हणता येईल.**

असा ह्या अभंगाचा अर्थ मला समजला आहे व तोच येथे लिहिला आहे.

**अभंगाची शिकवण :-**

**ज्याला भगवद्भेटीची तळमळ लागली असेल त्याने आपला प्रत्येक क्षणी वर लिहिल्याप्रमाणे सतत सावध राहण्याचा प्रयत्न केला पाहिजे. अशा व्यक्तीला समर्थ "सदेव " म्हणतात.**

समर्थांची एक ओवी येथे आठवली ती लिहित आहे.

ऐक सदेवपणाचे लक्षण । रिकामा जाऊ नेदी एक क्षण । प्रपंच वेवसायाचे ज्ञान। बरें पाहें॥.

सदेवपणाचे लक्षण हेच की सदेव व्यक्ती स्वत:चा एकही क्षण वाया न घालविता प्रपंच व परमार्थ दोन्ही नीटपणे करते. असे ही ओवी सांगते.

**असे सदेव होण्याच आपण प्रयत्न आपण करायला हवा हेच महत्वाचे.**

ॐ

**************

अभंग :- मनुष्य भक्ती कां करतो

कुमुदिनि काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगितसे ॥ १॥
तैसे तुज ठावें नाहीं तुझे नाम । आम्हीच तें प्रेमसुख जाणों ॥ २॥
माते तृण बाळा दुधाची ते गोडी । ज्याची नचे जोडी त्यासी कामा ॥३॥
तुका म्हणें मुक्ताफळ शिंपीपोटी । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

कुमुदिनीला स्वत:च्या सुगंधाची जाणीव नसते , पणे भुंगा त्याचा आस्वाद घेतो ॥ १॥ त्याच प्रमाणे भगवंता तुझे नाम आहे. नामघेण्याचे प्रेमसुख आम्हालाच माहित आहे ॥ २॥

गाय बेचव गवतखाते व गोड दुध देते. आईला( गाईला) आपल्या दुधाची गोडी काय आहे ते अनुभवता येत नाही. ते दूध अमृतासारखे गोड आहे हे बाळालाच कळते. ॥ ३॥

तुका म्हणतो की मोत्याचा जन्म ज्या शिंपल्यात होतो त्याला त्याचे मोल कळत नाही ॥ ४॥

**अभंगाच्या मागची भूमिका :-**

**तुकाराम महाराज हे स्वत: पांडूरंगाचे अनन्य भक्त आहेत. ह्या भगवंताला जाणणारे आहेत. ते आपल्याला स्वानुभवाव रून नामाचे महत्व ह्या अभंगाद्वारे स्पष्ट करताहेत.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

भगवंत कसा आहे ते आपल्याला माहीत नाही . त्याचे नामच त्याच्याशी आपल्याला जोडणारा दुवा आहे. नामस्मरण करणारा भक्तच भगवंताच्या नामाची गोडी अनुभवत असतो.

**हाच मुद्दा स्पष्ट करण्यासाठी तुकाराम महाराजांनी तीन दृष्टांत ह्या अभंगात दिले आहेत.**

**पहिल्याच चरणामधे** महाराजांनी कुमुदिनि म्हणजे कमळाच्या फुलाचे व भुंग्याचे उदाहरण दिले आहे.

साधारणता: हा दृष्टांत विषय व त्यांच्यामागे धावणारे मन ह्यांसाठी दिलेला आढळतो. कुमुदिनी म्हणजे चंद्राच्या दर्शनामुळे उमललेले शुभ्र रंगाचे कमळ अर्थात दृष्य विश्व. व त्यामधे असणारे विषय असा अर्थ घेणे येथे सोईचे होते.. आपल्या पंचेद्रियांना आकर्षित विषयांकडे आपले मन धाव घेत असते. मनाला भुंग्याची उपमा आहे. मन एकाविषयाकडून दुसऱ्याकडे सतत जात असते.

**पण हाच दृष्तांत येथे वेगळया अर्थाने घेतलेला आहे. येथे कुमुदिनी म्हणजे सगूण भगवंत व भुंगां म्हणजे ज्याला उपरती झाली आहे असा साधक. भक्त . भगवंताचे नाम हाच परीमळ , कमळाचा सुगंध ह्या अर्थाने हा दृष्टांत महाराजांनी येथे दिलेला आहे**

कमळामधे सुगंध व मकरंद दोन्ही आहेत. खरेतर कमळाचा सुगंध त्याच्यापासून वेगळा नाही. भगवंत व त्याचे नाम पण तसेच एकच आहेत. कमळाला स्वत:च्या सुगंधाच्या ताकदीची मात्र यत्किंचितही जाणीव नसते. पण भुंग्याला हाच सुगंध दूर अंतरावर कळतो व तो कमळाकडे येऊन मकरंदाचा आस्वाद घेतो.

अगदी असेच भगवंताचे नाम आहे. जेथे नामसंकीर्तन सुरू असेल तेथे भक्त धाव घेतात व त्या नामसंकीर्तनाचा आस्वाद घेतात आणी ब्रह्मानंद भोगतात.

**अभंगाच्या तिसऱ्या चरणामधे दुसरा दृष्टांत येतो.**

येथे आई म्हणजे गाय. गाय गवत खाते व त्या बेचव गवताचेच गोड दुध तयार होते. अर्थात गाईला
( तुकाराम महाराज म्हणतात तसे) त्या दुधाची गॊडी तिला कळत नाही. पण तिच्या बाळाला म्हणजे वासराला मात्र ह्या गॊडीची जाण असते. तद्वतच नामाला स्वत:ची गोडी भक्तांच्या भगवंतावरच्या अनन्य प्रेमभावामुळे येते.

**अभंगाच्या चौथ्या चरणांत** तिसरा दृष्टांत आहे. या ठिकाणी महाराजांनी शिंपल्यात तयार होणाऱ्या मोत्याचे उदाहरण दिले आहे. स्वाती नक्षत्रावर पाऊस पडला व अशा पावसाचा थेंब जर शिंपल्यात पडला तरच त्याचा मोती तयार होतो. सापाच्या मुखांत तोच थेंब पडला तर त्याचे विष होते. असा हा मोती तयार होण्याचा योग तसा दुर्मीळच असतो. पण शिंपल्याला आपल्या जवळच्या मोत्याची किंमत कळत नाही . जिला दागिने घालण्याची हौस आहे , त्या रसिक स्त्रीलाच मोत्याची खरी किंमत कळते.

**ह्या तिनही दृष्तांतांमधे एक धागा आहे. तो म्हणजे "ज्याची नये जोडी त्यासी कामा ".** वैशिष्ठ्य हेच की ज्याला ज्याची जोडी आहे त्याला स्वत:ला त्याचा कांहीच उपयोग नाही. स्वता:मधल्या वैशिष्ठयाचे महत्व , गोडी कळत नाही.

भुंगा जसा सुगंधासाठी दुरून धावून येतो तसाच भगवंत आपल्या भक्तांसाठी अवतार घेतो , अव्यक्तामधून सगुणात येतो. असे त्याचे भक्तांवर प्रेम आहे.

तुकाराम महाराज हे संत आहेत. ते भगवंताशी ते संवाद साधू शकतात. म्हणून वरील दृष्टांताद्वारे ते संतांचे महत्व पण सांगताहेत. ते म्हणतात की हे पांडूरंगा असाच तुझ्या नामाचा महीमा आहे. तू कदाचित जाणत नसशील पण आम्ही संत नामचा महिमा जाणतो. तसेच जर आम्ही संत नसलो तर हे भगवंता तुझ्या नामाचे महत्व , महीमा कोणाला कळले नसते.

**अभंगाची शिकवण :-**

हा अभंग नामाचे तसेच संतांचे महत्व सांगणारा आहे. जसे अभंगातल्या सर्व उदाहरणा मधे दिलेले सुगंध, गोडी, मोल हे त्या त्या वस्तूमधील ( कमळाचे, दुधाचे, मोत्याचे ) वैशिष्ठ्य आहे. त्याचे आकर्षण भुंगा, वासरू व जाणत्या स्त्री ह्यांना आहे भगवंताचे नाम हे असेच आहे. त्याच्या नामाचे प्रेम भक्तालाच असते. अर्थात शिकवण हीच की नामस्मरण करावे व संतांच्या सारखा नामस्मरणाची गोडी अनुभवावी .

ॐ

*************

**अभंग जोडी :- नामस्मरण कसे करावे.**

**अभंग १ ला :-**

काये करूनि करी धंदा । चित्त गोविंदा तुझे पायी ॥ १ ॥
ऐसा संकल्पाचे संधी । माझे बुद्धी धीर द्यावा ॥ २ ॥
कुटुंबाचा तुम्हा भार । मज व्यवहार निमित्त ॥ ३ ॥
तुका म्हणे करिता काम । हृदयी नाम धरीन मीं ॥ ४ ॥

**अभंग २ रा :-**

एक धरिला चित्तीं । आम्ही रखुमाईचा पती ॥ १॥
तेणें झाले अवघें काम । निवारला भवश्रम ॥ २ ॥
परद्रव्य परनारी । झाली विषाचिया परी ॥ ३ ॥
तुका म्हणें फार । नाही लागत व्यवहार ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

अभंग १ ला :- मी माझ्या शरीराने जगातले सर्व व्यवहार करेन. ( पण) माझे चित्त हे गोविंदा तुझ्या पायाशी ठेवेन.असा हा संकल्प केला आहे ह्या संकल्पासाठी मला दोन्ही

पातळिंवर ( शाररिक व मानसिक ) एकाच वेळी रहायचे आहे. ते करता येणे मला कठीण वाटते व तूच बुद्धी दे. असा व्यवहार करणे हे फक्त एक निमित्त आहे.
तुका म्हणतो की ( मी तुझ्या चरणी सर्व अर्पण केले आहे म्हणून माझ्या कुटुंबाचा भार ( योगक्षेम चालवणे) तुझ्यावरच आहे. मी काम करताना तुझे नाम अंत:करणात धरूनच सर्व कामे करेन.

अभंग २ रा:-
मी रखुमाईचा पती ( विठ्ठल ) ह्याचाच ध्यास मनामधे धरलेला आहे.त्यामुळे माझे सर्व काम झाले व ह्या भवसागरांत जगताना जे श्रम होतात त्यांचे निवारण झाले. माझ्यासाठी परद्रव्य व परनारी दोन्ही विषासमान आहेत. तुका म्हणतो की असे वागायला व्यवहार आडवा येत नाही.

**अभंगच्या अर्थासाठी असलेली पार्श्वभूमी :-**

ह्या आधिच्या अभंगात , तुकाराम महाराजांनी स्वत: सतत भगवंताचे अनुसंधान कसे ठेवले होते तो अभंग आपण पाहिला. ह्या दोनहि अभंगात तोच विषय पुढे नेलेला आहे.

***ह्यातला पहिला अभंग भगवंताला संपूर्ण शरणागत भक्ताचे वर्णन करणारा***
***तर***
***दुसरा त्यामुळे घडलेले परिणाम सांगणारा असे आहेत.***

नामस्मरण करणारी भक्ती पुढे पुढे सख्यभक्तीमधे रूपांतरित होते.हे पण ह्या अभंगामुळे स्पष्ट होते. ज्याचा सखा प्रत्यक्ष भगवंतच आहे त्याला ह्या संसारात काय मिळवायचे राहिले? उत्तर हेच की कांही नाही. त्याला भगवंताचे सख्य मिळाले की सर्व कांही मिळते.
महाभारतात अर्जूनाला , गोपींना, उद्धवाला हे भाग्य लाभले होते. मीराबाईंचे उदाहरण पण आहे.

भगवंताने गीतेच्या विश्वरूप दर्शन अध्यायाच्या शेवटी शरणागत भक्ताचे ह्या लोकात कसे वर्तन असते ते खालील श्लोकामधे साघितले आहे.

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्त: सङ्गवर्जित: ।
निर्वैर: सर्वभूतेषू य: स मामेति पाण्डव ॥ ११-५५॥

जो पुरुष सर्व कर्मे माझी म्हणजे परमेश्वराची होत ह्या बुद्धीने कर्म करतो,मत्परायन होऊन राहतो, माझी भक्ति करतो, आसक्तीरहित असतो व कोणत्याच भूताचे ठायी वैर करीत नाही; तो मलाच येऊन मिळतो.

ह्या अभंगांचा अर्थ पाहिला की हेच समोर येते की तुकाराम महाराजांनी वरील प्रमाणे जगामधे कसे जगायचे ते सोप्या शब्दांद्वारे आपल्याला सांगितले आहे.

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

पहिल्याच ओळित हे स्पष्ट होते की आपण आपले सर्व व्यवहार सोडायचे नाही आहेत , पण त्यां मागची आपली मानसिकता बदलायची आहे.

जोवर आपण म्हणतो की मी करणारा आहे , मी हे केले ते, करीन तेंव्हा आपण सर्व कर्तृत्व कळत व नकळत स्वत:कडे घेत असतो. शिवाय मी जे करतो आहे त्याचा परिणाम अस-असा व्हावा ही अपेक्षा पण आपल्या मनामधे असते.जर मनाप्रमाणे झाले तर सुख होते व मनाविरुद्ध झाले तर दु:ख होते. अर्थातच केलेल्या कर्माची फळे आपल्यालाच भोगावी लागतात.

ह्याशिवाय जर केलेल्या कर्माचे फळ ह्या जन्मामधे भोघणे झाले नाही तर ते भोगण्यासाठी पुन: जन्म घ्यावा लागतोच.
ह्यावरचा उपाय म्हणजे भगवंतालाच शरण जाणे व त्याच्याकडे प्रार्थना करणे जी सर्व कांही तुझ्यामनाप्राणे माझ्याकडून करवून घ्यावे. असा जो वागेल त्याला भगवंत धीर देतो. फार काय स्वत: दिलेल्या वचनाप्रमाणे ( भगवद्गीतेत हे वचन आहे)भगवंत स्वत: अशा भक्ताचा योगक्षेम चालवतो.

शरणगेल्यावरती जर आपण भगवंतालाच स्मरून आपली कामे केली तरच असे घडते हे तुकाराम महाराज समजून आहेत व म्हणूनच अभंगाच्या शेवटि ते म्हणताहेत की भगवंताचे स्मरणकरूनच ते सर्व व्यवहार करतील.

पुढचा अभंग वरील प्रमाणे भगवंताचे स्मरण करत सर्व कार्ये केल्याने काय परिणाम झाले ते सांगताना पुढच्या अभंगात महाराज म्हणताततहेत की त्यांना आता पांदुरंगाचाच ध्यास लागला आहे. त्यामुळे त्यांची वर्तणुक वागणे सर्वकांही पहिल्या अभंगात लिहिल्याप्रमाणे होते आहे.

सर्वकर्ता सर्वभोक्ता पांडुरंगच झालेला अहे त्यामुळे मनात होणारी सुखदु:खांची आंदोलने अर्थात हवेनकोपणाने होणारी सुखाची वा दु:खाची जाणिव आता होत नाही आहे. मनास शांती मिळाली आहे मन निवले आहे

अभंगातल्या पुढच्या चरणांमधे परद्रव्य व परनारी हे शब्द तुकाराम महाराजांनी वापरले आहेत. त्यांचा अर्थ प्रथम लक्षात घेणे आवश्यक आहे.

परद्रव्य ह्या शब्दाचा अर्थ पैशाची वासना व परनारी म्हणजे मनाकडे येणारे जे पांच प्रकारचे विषय ( १)सौंदर्य डोळ्याचा विषय, २)जीभेचा विषय चव, ३)त्वचेचा स्पर्श, ४)नाकाचा विषय सुवास ,५) कानांचा विषय गोड आवाजात होणारे स्संभाषण, गाणे )त्यांचाकडे पाहण्याची द्रूष्टी असा घेणे योग्य ठरते. सर्वसाधारणत: पैसा असला की माणूस व्यसनांकडे म्हणजे विषयोपभोगांच्या आधीन होण्याचि शक्यता जास्त वाढते.

तुकाराम महाराज अभंगामधे पुढे असे म्हणताहेत की (भगवताचा ध्यास लागल्यामुळे सर्वत्र तोच आहे हे कळले आहे व म्हणुनच ) आता मनाला परद्रव्य व परनारी हे सर्व विषासमान म्हणजेच आपला घात करणारे आहेत असे वाटायला लागले आहे. अर्थात त्यांची आसक्ती आता उरलेली नाही.

हे परिणाम वर्णनकरून झाल्यावर महाराज शेवटी स्वत:चा अनुभव हाच सांगताहेत की "असे वागायला जगातला व्यवहार आड येत नाही" अर्थात भगवद्भक्तीच्या आड व्यवहार येत नाही.

**अभंगाची शिकवण :**

संत जो कांही उपदेश करतात तो प्रथम स्वत: अनुभव घेऊन मग नंतरच करतात.महाराजांचा अभंग तर हे स्पष्टच करतो की त्यांनी ह्या अभंगामधे जे सांगितले आहे त्याप्रमाणे त्यांचा स्वत:चाही अनुभव आहे. स्वत:चे अनुभवाचे बोल सांगून महाराजांनी आपल्यावर उपकारच केले आहेत.

अभंगाची शिकवण :-

ह्या उपकाराचे उतराई होण्यासाठी आपण त्यांच्या उपदेशाप्रंमाणे वागून भग्वंताची भेट होण्यास म्हणजेच मोक्षाचे अधिकारी व्हावे हीच येथे शिकवण आहे.

ॐ

***************************************

अभंग :- हनुमंताची स्तुती ( हनुमंत हा एक सर्वश्रेष्ठ नामस्मरण करणारा भक्त आहे)

**१) हनुमानाची स्तुतीपर अभंग :-**

शरण शरण जी हनुमंता । तुज आलो रामदूता ॥ १॥
काय भक्ताच्या त्या वाटा । मज दावाव्या सुभटा ॥ २॥
शूर आणि धीर । स्वामिकाजीं तू सादर ॥ ३॥
तुका म्हणें रुद्रा । अंजनीचिया कुमारा ॥ ४॥

शब्दार्थ :- हे हनुमंता ,रामदूता,  अकराव्या रुद्रा, अंजनीकुमारा ; मी तुला शरण आलो आहे. भक्ती कशी करावी ते मला सुलभ करून सांग. तू शूर ,धैर्यवंत व तुझा स्वामीच्या काजासाठी सतत तत्पर असतोस.

**रामनामावर असलेला अभंग :-**

राम म्हणें वाट चालीं। यज्ञ पाऊली पाऊली ॥ १॥
धन्य धन्य तेंशरीर । तिर्थव्रतांचे माहेर ॥ २॥

राम म्हणे करिता धंदा । सुखसमाधी त्या सदा ॥ ३॥
राम म्हणें ग्रासोग्रासी । तोचि जेविला उपवासी ॥ ४॥
राम म्हणें भोगीं त्यागीं । कर्म न लिंपे त्या अंगी ॥ ५॥
ऐसा राम जपे नित्य । तुका म्हणें तोचि जीवन्मुक्त ॥ ६ ॥

शब्दार्थ :- जो वाटचाल करताना, रामनाम जपतो, तो प्रत्ये पाऊलावर यज्ञ करत असतो. असे भक्ताचे शरीर धन्य आहे.तेच सर्व तीर्थांचे माहेर म्हणता येते. जो रामनाम धंदा करतान म्हणतो तो सहजसमाधीतच असतो. रामनाम म्हणत केलेले जेवण सुद्धा भगवंताचे जेवण असेल. जो राम नामाच जप सर्व भोग घेतान क्रतो त्याची कर्मे निष्कामच होतात. असा नित्य रामनाम जपणार जीव्न्मुक्तच असतो.

**अभंगाच्या अर्थ समजण्यासाठी अवश्य ती पार्श्वभूमिका :-**

तुकाराम महाराजांचे कांही अभंग श्रीराम व हनुमानाचे स्तुतीपर आहेत त्यातलेच हे दोन अभंग रामनवमी निमित्त येथे घेतले आहेत ह्या अभंगांचे वैशिष्ठ्य हेच आहे की येथे नामस्मरण कसे करावे ते तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. तसेच दास्यभक्ती कशी करावी ह्यावर पण प्रकाश देणारे आहेत.

अगदी असेच सांगणे समर्थांचे पण आहे. समर्थ रामदास स्वामींच्या नामस्मरण निरुपण समासामधे अगदी हीच पद्धत नामस्मरणासाठी सांगितलेली आढळते.

श्री अरोबिंदो आश्रमाच्या माताजी सांगतात " जेंव्हा आपण ध्यान करतो तेंव्हा मनाला शांतीचा अनुभव मिळतो. पण ध्यान संपले की मन परत पूर्वीच्या अस्वथ अवस्थेत येते. असे अनेक साधकांच्या बाबतीत घडते. मन व शरीराला पूर्ण शांतीचा सतत अनुभव तेंव्हाच येतो जेंव्हा तुमचे सर्वकांही भगवंतास अर्पण होते. अर्थात जेंव्हा तुम्ही स्वत:चे असे कांहिहि आहे असे म्हणू शकत नाही ( ह्यात सर्व भौतिक संपत्ती तर येतेच शिवाय अगदी तुमचे शरीरसुद्धा, तसेच तुमचे विचार, भावना, ईत्यादी सर्व कांही ), तेंव्हा सर्व योगक्षेमाची जबाबदारी भगवंत स्वत:वर घेतो. मग तुम्ही काळजी करावी असे कांही रहातच नाही.( संदर्भ :- Sayings of Mother page 27)

सर्व संत एकच उपदेश करतात तो कसा हे पण येथे स्पष्ट होते.

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

**सर्वप्रथम हनुमानाचा अभंग** ह्यासाठी घेतला आहे की अत्यंत शक्तिमान , शूर व ज्ञानी असूनही हनुमंत स्वता:ला श्रीरामरायांचे सेवक दास म्हणवून घेण्यातच धन्यता मानतात. **दास्यभक्ती कशी करावी हे आपल्याला हनुमंताच्या चरित्रावरून कळते**. हनुमानाने बुद्धी व चातुर्याने सीतेला शोधले.

रामरावण युद्धामधे राक्षसांनी राम-लक्ष्मणांना मायेने पाताळंत नेले होते तेथून सोडवीन आणले. लंकादहनाच केले. भर दरबारांत स्वत:ची छाती फाडून तेथे रामच असल्याचे सर्वांना श्रीरामरायांच्या पट्टाभिषेकाच्या प्रसंगी दाखवून दिले. हनुमान म्हणजे रुद्राचाच एक अवतार होय. त्यांचेच आणखी एक नांव म्हणजे " अंजनीसुत" अर्थात अंजनीचा मुलगा हे आहे. असे हे हनुमान श्रीरामरायांचे पुढे नेहमी आदराने हात जोडुन उभे असतात.

अभंगामधे अश्या हनुमंताच्या कडे तुकाराम महाराज हेच मागणें मागताताहे की " हे हनुमंता मी तुला शरण आलो आहे. कृपया मला देवाची भक्ती कशी करावी हे समजाऊन सांगा "

नामस्मरण कसे करावे हे पुढचा अभंग सांगतो.

**अभंगाच्या १ ल्या चरणाचा अर्थ** :-

व्यवहारामधे जातायेता नाम जपावे असे पहिल्याच ओळित सांगून महाराज हे पण म्हणतात की असे करणे म्हणजे पाऊलोपावली यज्ञ करण्यासारखे आहे. यज्ञामधे आपण आहुती देतो व म्हणतो की "अमुक देवताय स्वाहा इदं न मम " म्हणजेच ही आहुती अमुक देवतेला समर्पित असो. ज्याची आहुती दिलेली आहे ती माझी नाही " थोडक्यांत आपले प्रत्येक कर्म हे देवास केलेला यज्ञ समजून करा असेच ह्या पहिल्या ओळीत सांगितले आहे.

**अभंगाच्या तिसऱ्या चरणाचा अर्थ :-** आपल्याला रोजीरोटीसाठी कांहितरी कामधंदा करणे आवश्यकच आहे. हे करतांना रामाचे स्मरण ठेवले तर ती सुखाची समाधीच होय असे अभंगाचा तिसरा चरण सांगतो. अर्थात प्रत्येक कार्य भगवंताचे आहे असे समजून करावे हाच ह्याचा अर्थ घेता येईल.

**अभंगाच्या ४थ्या चरणाचा अर्थ :-** जर जेवतांना प्रत्येक घास घेताना मी जे जेवतो आहे ते भगवंताला अर्पण करून मग त्याचा प्रसाद आहे हे समजून घ्यावे असे महाराज अभंगाच्या ४थ्या

चरणामधे सांगत आहेत. खरेतर आपल्या पाचही इंद्रियांकडून जे देहाला मिळते ते सर्व आपले भोजनच असते. जे जे मिळते तो देवाच प्रसादच आहे हे समजून घ्यावे असेच येथे सांगितले आहे.

**अभंगाच्या ५व्या चरणाचा अर्थ:-** अशापद्धतीने जो सर्व भोग भोगतांना रामाचे स्मरण करतो , सर्व कर्मे रामार्पण बुद्धिने जो करतो; त्याला त्याकेलेल्या कर्मांचे फळ बाधक होत नाही असे येथे सांगितले आहे.
एकूणच कर्मयोग जगण्याचे रहस्यच ह्या अभंगात जणू तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. तसेच कर्मयोग व नामस्मरण भक्तिची सांगड ( संबंध) पण येथे स्पष्ट झाला आहे.

**अभंगाचे २,व ६वे चरण हेच स्पष्ट करतात की** जो असे जीवन जगतो त्याचे मानवी शरीरात जन्म घेण्याचे सार्थक होते व तो जीवन्मुक्तच होतो.

**अभंगाची शिकवण** :- येथे शिकवण स्पष्टच आहे की अभंगाप्रमाणे वर्तन ठेवा अर्थात
हनुमंताप्रंमाणे भक्ती करून आपल्या नरजन्माचे सार्थक करून घ्या.

ॐ

***************

**अभंग : - नामस्मरण करून आत्मनिवेदन कसे साधावे ते सांगणारा अभंग**

**राम म्हणें वाटचालीं । यज्ञ पाउलापाउली। धन्य धन्य ते शरीर । तिर्थव्रतांचे माहेर ॥ १ ॥**
**राम म्हणें धंदा करितां।सुखसमाधि त्या सदा। राम म्हणें ग्रासोग्रासी।तोचि जेविला उपवासी॥२॥**
**राम म्हणें भोगी त्यागी। कर्म न लिंपे त्या आंगी। ऐसा राम जपे नित्य । तुका म्हणे तोचि जीवमुक्त ॥ ३ ॥**

**अभंगाचा शब्दार्थ :-**

राम राम म्हणत मी माझे सर्व कर्म करतो आहे त्यामुळे पाऊलोपाऊली माझ्या हातून यज्ञ घडतो आहे. ह्या क्रियेमुळे शरीरच तीर्थरूप झाले आहेव धन्य झाले आहे॥ १॥
सर्व कामे करताना मी रामनाम म्हणतो म्हणुनच ह्याक्रियेमुळे मी सतत समाधीसुख भोगतो आहे. प्रत्येक घासाला तुझे नांव घेतल्यामुळे जेवण करूनही उपवास घडतो आहे. ॥ २॥

सतत भोग भोगताना, त्याग करताना ;रामाला स्मरल्यामुळे कर्मबंधन उरत नाही. तुका म्हणतो की असे रामनाम जपणारा जीवन्मुक्तच असतो. ॥ ३॥

**अभंगाच्या मागची पार्श्वभूमी :-**

ह्या आधीच्या अभंग "झाली होती काया बहूत मळीण" च्या शेवटी असे म्हटले होते की पुढच्यावेळी तुकाराम महाराजांची साधना कशी झाली त्याचे वर्णन करणारा अभंग पाहू व म्हणुनच असे वर्णन करणारा अभंग येथे घेतलेला आहे.

सर्व परमार्थसाधनाचे वर्म स्वत:मधील " अहंभाव – मी पण " लयास जाण्यात आहे. अहंभाव संपला की मन उन्मन होते व जीव मुक्त होतो असेच सर्व संत तसेच शास्त्रे सांगतात. हे आत्मनिवेदन भक्तीमुळे घडते. " आत्मनिवेदन भक्ती म्हणजे काय ही माहिती प्रथम खाली थोडक्यांत दिली आहे..

ज्याला मुक्ती हवी आहे त्याच्याकडून नवविधा भक्तींपैकी कोणतीहि भक्ती झाली की असा साधक शेवटी भक्तीच्या शेवटच्या पायरीवर पोहोचतो. ही शेवटची पायरी म्हणजे " आत्मनिवेदन भक्तीची पायरी " होय.**निवेदन करणे म्हणजे समर्पण करणे, शरणागत होणे.**
ही भक्ती तीन स्तरांवरून घडते/ केली जाते. जड आत्मनिवेदन, चंचळ आत्मनिवेदन व निश्चळ आत्मनिवेदन.

**जड आत्मनिवेदन**:- साधारणत: आपण वस्तू व व्यक्ती यांच्यावर आपला मालकी हक्क समजतो. जसे माझे घर, माझा मुलगा ईत्यादी.त्यामुळे आपल्याला ह्या गोष्टींबद्दल आसक्ती निर्माण होते. अशी आसक्तीच बंधनाला कारण असते हे आपण आधीच्या अनेक अभंगांवरील विवरणात पाहिले आहे. **ह्या आसक्तीमधून बाहेर येण्याचा सोपा उपाय म्हणजे विरुद्ध विचार करणे होय अर्थात आपण ह्या सर्वाचे विश्वस्त आहोत हे समजून वागणे.** विश्वस्ताला वस्तूंची सर्व

काळजी घ्यावी लागते. तसे संसारामधे वागणे असणे; म्हणजेच **" आहे तितुके देवाचे " अर्थात जे जे आहे त्याचा मालक भगवंतच आहे हे समजून जगामधे वागणे, म्हणजे जड आत्मनिवेदन.**

**तर्क वापरून आपल्याला एवढे नक्किच समजते की सर्वांभूति भगवंताचा वास , अस्तित्व आहे. अनुभव नसतो पण संतवाक्यांवर विश्वास ठेवल्याने सर्वांभूति भगवंत आहे हे पटलेले असते. अशा व्यक्तीला आहे त्याचा मालक भगवंत हे पण समजलेले असते.**

**चंचळ आत्म निवेदन:-** आपण जर हे समजून घेतले की " जे जे घडते ते खरेतर भगवंताच्या ईच्छेप्रमाणेच होत असते." तर आपल्या मनाप्रमाणे जर कांही घडले नाही तर मन दु:खी होणार नाही .

उदाहरणार्थ : आपल्याला कधीच आजारी पडावेसे वाटत नाही तरीही प्रत्येकजण कधीना कधी आजारी पडतोच. ह्याचे कारण म्हणजे भगवंताची इच्छा सर्वांच्या अंतर्यामी राहून तोच सर्व कार्य करवून घेत असतो.

विषय तसा मोठा आहे. म्हणुन **एवढेच येथे सांगता येते की " कर्ता करविता भगवंत" हे समजून जगात वावरणे म्हणजे चंचळ आत्मनिवेदन.**

*वर वर्णन केलेल्याप्रमाणे वागणे घडू लागले की अहंकार कमी व्हायला लागतो. श्री.रामकृष्ण परमहंस म्हणतात तसा सर्वांचाच अहंकार नष्ट होत नाही पण ठाकुरजी म्हणुनच म्हणतात की त्यापेक्षा स्वत:ला " मी भगवंताचा दास आहे असे समजायला काय हरकत आहे." अशी दासवृत्ती असणे म्हणजेच जड व चंचळ आत्मनिवेदन भक्ती करणे होय.*

**निश्चळ आत्मनिवेदन ही भक्ताची होणारी मानसिक स्थितीआहे** व ही स्थिती सद्गुरूकृपेचा वर्षाव झाल्याबरोबर होते. ह्या स्थितीलाच मोक्ष म्हणता येते. **ही स्थिती येई पर्यंत भक्त जड व चंचल आत्मनिवेदन स्वत:च्या जीवनात करू शकतो. ह्या अशा वागण्यालाच साधना करणे असे म्हणता येईल.**

**ह्या पार्श्वभूमिकेवरून आपल्याला अभंगचा अर्थ समजणे सोपे जाते.**

**अभंगाच्या अर्थाचे विवरण:-**

**अभंगाचे चरण जर वेगळया क्रमांकाने घेतले तर आपल्याला कांही महत्वाचे मुद्दे हाती लागतात.**

राम म्हणें वाटचालीं । यज्ञ पाउलापाउली ।
राम म्हणें धंदा कररितां। सुखसमाधि त्या सदा ।
राम म्हणें ग्रासोग्रासी । तोचि जेविला उपवासी ।
धन्य धन्य ते शरीर । तिर्थव्रतांचे माहेर ॥ १ व २ ॥

अभंगाच्या ह्या चरणांमधे महाराज म्हणतात की ते सतत रामनाम जपत असतात व संसाराची वाटचाल करत असतात. तसेच त्यांच्या हातून यज्ञ घडतो आहे. ह्याचा अर्थ हाच की त्यांच्या मनमधे ही जाणिव सतत आहे की त्यांच्याकडून रामच सर्व कर्मे (धंदा) करवून घेत आहे. थोडक्यांत त्यांचे सर्व कर्म निष्काम भावाने होते आहे. असे कर्म करणे म्हणजेच यज्ञ करणे होय.

ह्याचा मुख्य फायदा हाच आहे की आपल्याला कर्म फळाची आशा नसल्याने फळ चांगले मिळाले तरी चालते व मनाप्रमाणे झाले नाही तर वाईट वाटत नाही. एकूण सतत शांतीच्या भावनेमधे आपले मन राहील व ह्यालाच महाराजांनी " सुखसमाधी" ह्या विशेषणाने संबोधले आहे.

अभंगातल्या "जेवण" ह्या शब्दाचा अर्थ "पंचेंद्रियांद्वारे शरीराला मिळणारे भोग असा घ्यायचा आहे. जसे कानांना गोड गाणे आवडते. जीभेला सुग्रास जेवण आवडते. दोळयांना सौन्दर्य तर नाकाला सुगंध, त्वचेला स्पर्शसुख आवडते.

ज्याचे मनी सतत " रामच सर्व देणारा " ही भावना असेल त्याला गॊडाचा जसा आनंद मिळेल तसाच कडू खावे लागले तरीपण होईल. **त्याचे समाधान कधीही भंग होणार नाही. ह्यालाच तुकाराम महाराजांनी जेवून न जेवणे म्हटले आहे.**

कर्म करताना जर "कर्ता करविता राम" हे जर सतत ध्यानी ठेवून केले तर हा पण एक यज्ञ होईल. ह्या यज्ञाचे फळ भगवद्‌भेट हेच आहे. असे वागणारा सर्व तीर्थांप्रमाणेच पवित्र असतो हे येथे सांगितले आहे. अशा सद्‌गुणी व्यक्तीचा सहवास आनंद देणाराच असतो सर्वांनाच अशी व्यक्ती हवीहवीशी वाटते.

अभंगाचे शेवटचे चरण वरील मुद्देच वेगळया शब्दांत थोडक्यात सांगणारे आहेत.

राम म्हणें भोगी त्यागी । कर्म न लिंपे त्या आंगी ।

ऐसा राम जपे नित्य । तुका म्हणे तोचि जीवमुक्त ॥ ३॥

**"जो कोणी सर्व कर्ता, करविता व तसेच भोक्ता भगवंत आहे मी नाही हे समजून ह्या जगामधे वागेल; तोच ह्याची देही ह्याची डोळा मुक्त होईल " ; अशी ग्वाहीच अभंगाच्या ह्या चरणांमधे तुकाराम महाराजांनी येथे दिलेली आहे.**

**अभंगाची शिकवण : -**

संत कोणतेही असोत,जसे तुकाराम महाराज, समर्थ रामदास, कबीर, मीराबाई ईत्यादी. सर्व संतवचनाचे वैशिष्ठ्य हेच असते की प्रथम त्यांनी स्वत: अनुभव घेतला व नंतरच आपला अनुभव शब्दांकित केला आहे.

संतांच्या वचनांवर विश्वास ठेवून वागल्याने जीवाचे कल्याणच होते हे आपण सर्वच समजू शकतो. म्हणुनच आपण सुद्धा महाराजांच्या वरील उपदेशाप्रमाणे वागून आपल्या जीवनाचे सार्थक करून घ्यावे. हीच शिकवण येथे मिळते.

ॐ

***************

**अभंग :- नामस्मरणाचे कांही मुख्य फायदे.**

बोलावा विठ्ठल पहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ १॥
येणें सोस मन झालें हांवभरी । परत माघारी येते नाही ॥ २॥
बंधना पासूनी उकलली गांठी । देत आलो मिठी सावकाश ॥ ३॥
तुका म्हणें देह भरला विठ्ठलें । कामक्रोध केलें घर रितें ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

माझी मनस्थिती अशी झाली आहे की फक्त विठ्ठलाचेच नांव घ्यावेसे वाटते. विठ्ठल हाच माझा जीवभाव आहे, ॥ १॥

हीच माझ्या मनाला लागलेली हाअ आहे. व ह्या ईच्छेमुळे मनाला दुसरे कांहिहि नको आहे ॥ २॥

विठ्ठलाला घातलेल्या मिठीमुळे माझी सर्व बंधनांतून सुटका झाली आहे ॥३॥

सर्व देह विठ्ठलमय झाला आहे व त्यामुळे काम व क्रोध ह्या विकारांनी हे शरीर सोडले आहे ॥ ४॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाठीचि पार्श्वभूमी :- ह्या अभंगाचा अर्थ दोन प्रकारांनी लावता येतो.**

१) तुकाराम महाराजांची साक्षात्कारानंतर( ब्रह्मज्ञान झाल्यावर) झालेली स्थिती ह्या अभंगामधून प्रगट होते.

२) ब्रह्मज्ञान झाल्यावरच सर्व दु:खामधून सुटका होते हे आपण जाणतोच.म्हणुन आपल्याला ही स्थिती येण्यासाठी काय करावे लागेल त्याचे मार्गदर्शन ह्याच अभंगाद्वारे मिळते.**म्हणून येथे हे मार्गदर्शन काय असावे ह्यावरच जेवढे समजले ते लिहित आहे.**

येथे श्री नामदेव महाराजांचे दोन अभंग पाहणे उचित ठरेल. तुकाराम महाराजांचा अभंग ह्याच स्वरूपाचा आहे व मागे आपण पाहिला आहे.( संदर्भ : - अभंग **"कां रे नाठविसि कृपाळू देवासी"** म्हणुन येथे नामदेव महाराज यांचे अभंग घेतले आहेत.

तुझिया सत्तेने वेदांसी बोलणे। सुर्यासी चालणे तुझिया बळे॥
ऐसा तू समर्थ ब्रह्मांडाचा धनी । वर्म हें जाणुनि शरण आलो ॥
मेघांनी वर्षावें पर्वती बैसावें । वायूने विचरावे सत्ते तुझे ॥
नामा म्हणें कांही न हाले साचार । प्रभू तू निर्धार पांडूरंगा ॥ १ ॥

अच्युता अनंता श्रीधरा माधवा । देवा आदि देवा पांडुरंगा ॥
कृष्णा विष्णु गोविंदा वामना । तूचि नारायणा नामधारी ॥
मुकुंदा मुरारी प्रद्युम्ना केशवा । नाम सदाशिवा शांतरूपा ॥
रूपातित हरी दाखवीं सगूण । निरंतर ध्यान करी नामा ॥ २ ॥

अभंगाची भाषा व अर्थ सरळच आहे. **पहिल्या अभंगात** नामदेव महाराज हेच सांगताहेत की सर्व सृष्टीचे व्यवहार भगवंताच्याच सत्तेखाली होत असतात. अगदी झाडाचे पान सुद्धा त्याच्या ईच्छेविना हालत नाही.

**पुढच्या दुसऱ्या अभंगामधे** ह्यादेवाचे स्वरूप कसे आहे ते सांगितले आहे.

पण असा हा खरा देव ( आदिदेव) खरेतर तो अव्यक्तच आहे पण आपल्यासाठी सगूण रूपांमधे आलेला आहे. (समर्थाचा प्रभू श्रीराम, तुकाराम, नामदेव , ज्ञानेश्वरादि संतांचा

पांडुरंग, मीराबाईचा श्रीकृष्ण ) . अभंगामधे नामदेवमहाराजांनी त्याची ईतर नांवे जशी अच्युत, अनंत, श्रीधर, माधव वानगीदाखल सांगितली आहेत.

ह्या देवाचेच निरंतर ध्यान नामदेव महाराज करताहेत असे ते अभंगाच्या शेवटी म्हणत आहेत.

**अभंगच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

**हेच निरंतर म्हणजे सतत अखंड ध्यान कसे करायचे ते तुकाराम महाराजांचा अभंग सांगतो.**
अभंगाचे चरण :- बोलावा विठ्ठल , पहावा विठ्ठल .....:ह्यात आपल्याला हेच सांगितले आहे की आपण जे जे कांही पहात असतो ते सर्व कांही भगवंतच आहे. हे समजण्यासाठी खालील विचार उपयोगी आहे.

मातीचा घडा करण्यास करणारा कुंभार, माती , पाणी तसेच शक्ती पण लागते. व ह्याच संदर्भात सृष्टीनिर्मितीचा विचार थोडक्यांत खालील प्रमाणे आहे.

**अत्यंत प्राचीन अशा नासदिय सुक्तामध्ये सूक्तकर्ता म्हणतो तसे सुरवातीला भगवंताशिवाय ईतर कांहीच नव्हते.** सृष्टी निर्मिती कशी झाली हे सांगताना आपली शास्त्रे पुढे म्हणतात की " एकोहं बहुस्याम " असा आदिसंकल्प निर्माण झाला व त्यातून त्रिगूण सत्व, रज, तम) व पंचभूते निर्माण झाली. भगवंताने आपला अंश त्यात घातला व अनेक प्राणिमात्र निर्माण झाले.

एकूण काय तर भगवंतच सृष्टीनिर्मितीसाठी लागणारे सामान, शक्ती ,ज्ञान सर्वकांही झाला. ह्याचा अर्थ हाच की तो सगूण रूपाने प्रगट झाला. सर्वांभूती तोच वसतो आहे.

**हे समजून सर्वांशी गोड बोला , सर्वांमधे भगवंत आहेच व म्हणूनच सतत त्याचेच आपल्याला दर्शन होतेच आहे, हे लक्षांत घ्यावे.** त्यासाठी आपल्या मनामधे भगवंताच्या भेटीचीच आंस असायला हवी. तोच आपल्याला सर्व दु:खांमधून कायमचा सोडवणारा आहे हे जर ध्यानी घेतले तर अशी आंस आपोआपच मनामधे निर्माण होते. ह्यालाच भक्तीचा उदय म्हणता येते.अभंगात तुकाराम महाराजांनी हेच म्हटले आहे की अशी हांव ( आस) त्यांच्या मनामधे आहे.

मन असे भगवंतमय झाले, सर्वांभूती तोच आहे हे मनापासून पटले की मग मुख्यत: मनामधले कामाचे विचार प्रथम नष्ट होतात. काम म्हणजे कामना करणे-हवे-नको हे सर्व उरत नाहीत. ह्याचे कारण हेच की मनाची संपूर्ण खात्री झालेली असते की जे कांही मिळते ते त्याच्याच ईच्छेप्रमाणे व तोच माझी सर्व काळजी करतो आहे. ह्यामुळे जर कांही मनाप्रमाणे झाले नाही तरी वाईट वाटत नाही. कोणी कसेही बोलले तरी आपली वाचा कठोर होत नाही. तरीही क्रोधाचा आविष्कार जर झाला तरी तो ताब्यात ठेवता येतो.

अर्थात हे एका दिवसांत होत नसते. त्यासाठी सतत प्रयत्नच हवे. **हे प्रयत्न म्हणजेच भगवंताचे स्मरण ठेवणे. ह्यासाठी सर्वांत सोपे साधन म्हणजे नामस्मरण करणे. त्याची आठवण सतत जागी ठेवणे. ह्यासाठी आपल्याला कोठेही वनामधे जायची गरज नाही.मनाची ही स्थिती यावी म्हणून न कंटाळता ; वर म्हटले तशी वागणूक आहे कां हे सतत स्वत:चीच परीक्षा करून पहाचे आहे व नंतर स्वत:ला सुधारायचे .**

**अभंगाची शिकवण :-**

अभंगात म्हटल्याप्रमाणे असे प्रयत्न आपण करावे हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.

ॐ

***************

**नामस्मरणाचे कसे करावे , स्मरणाचे महत्व सांगणारा अभंग :-**

नाम संकीर्तन साध पै सोपे। जळतिल पापे जन्मांतरिची ॥ १॥
नलगे सायास जावे वनांतरा । सुखे येतो घरा नारायण ॥ २॥
ठायीच बैसोनी करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा॥ ३॥
रामकृष्ण हरी विठ्ठला केशवा। मंत्र हा जपावा सर्व काळ ॥ ४ ॥
याविण आणिक नाही पै साधन । वाहतसे आण विठोबाची ॥ ५॥
**तुका म्हणे सोपे आहे सर्वांहूनि । शाहाणा तो धणी घेतो येथे ॥ ६॥**

**अभंगाचा शब्दार्थ :-**

नामसंकीर्तन करणे हेच सर्वांत सोपे साधन आहे, हे केले की जन्मजन्मांतरीची पापे जळतात. हे साधन करण्यासाठी माणसाला वनवनांतरास जावे लागत नाही. सायास करावे लागत नाहीत व ,भगवंत सहज हृदयांत येतो. नामसंकीर्तान करण्यासाठी मन एकचित्त करावे व अनंताला आळवावे. त्यासाठी रामकृष्ण, हरी, विठ्ठल, केशवा, अशा कोणत्याही नामांचा मंत्र जप सर्व काळ करावा. तुका म्हणतो की हे असे एकमेव साधन त्याला भेटण्यासाठी आहे, व हेच खरे आहे हे सांगण्यासाठी मि प्रत्यक्ष विठ्ठलाचीच स्पथ गेऊन हे सांगतो आहे.

**अभंगा मागची भूमिका :-**

नामस्मरणाबद्दल मागच्या अनेक अभंगांमधे उल्लेख आला होता. ह्या अभंगामधे नामस्मरणाची पद्धत व महत्व स्पष्ट केलेले आहे

**हरीपाठाच्या शेवटी हा अभंग म्हणण्याची वारकरी संप्रदायामधे पद्धत आहे.**
**ज्याला प्रपंचात राहून परमार्थ साधना करायची आहे त्या प्रत्येकासाठी हा अभंग मार्गदर्शक आहे.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

ह्या साठी आपल्याला अभंगाच्या प्रत्येक चरणाचा अर्थ पाहाणे आवश्यक आहे. म्हणून चरणा प्रमाणे अर्थाचे स्पष्टीकरण केलेले आहे.

**१ ला चरण :-**

***नाम संकीर्तन साध पै सोपे। जळतिल पापे जन्मांतरिची ॥ १॥***

नामस्मरण करणे , भगवंताच्या निरनिराळया गुणांचे वर्णन करणे हा भगवद्प्राप्तीचा अत्यंत सोपा मार्ग आहे. खरे पापकर्म कोणते तर मी कर्ता असे समजून कार्य करणे हेच होय.. असे झाले की भगवंताचा विसर पडतो. मी पणाने कर्तृत्व स्वत:कडे घेण्यानेच माणसाला केलेल्या कर्मांची बरी वाईट फळे भोगण्याकरिता पुन:पुन: जन्म घ्यायला लागतो. **म्हणून भगवंताला विसरणे हेच अत्यंत मोठे पापकर्म होय**. आपण गेले अनेक जन्म हेच केले व त्यामुळे अनेक जन्मांमधील पापे भोगण्या साठी पुन:पुन: जन्म घेतले.

पण आता चांगली वेळ आली आहे. **भगवंताचे स्मरण ठेवून तोच कर्ता व करविता आहे हे ध्यानांत ठेऊनच सर्व कांही करावे** म्हणजे ही जन्मजन्मांतरीचे पापे नष्ट होतील असे हा चरण सांगतो.

ह्या साठी कसे वागायचे तो भाग आता पुढच्या चरणांमधे येतो आहे.

***२ रा व ३ रा चरण:-***

***नलगे सायास जावे वनांतरा । सुखे येतो घरा नारायण ॥ २॥***
***ठायीच बैसोनी करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा॥ ३॥***

नामस्मरण करण्यासाठी कांहीही सायास म्हणजे पराकोटीचे प्रयत्न करावे लागत नाहीत. आपले व्यवहार संसाराची कामे सोडून जंगलामधे संन्यासी होऊन रहावे लागत नाही. एकच गोष्ट करावी लागते ती म्हणजे हरीचे स्मरण अत्यंत प्रेमाने करावे लागते. सुरवतीला जरी हरीनामस्मरण प्रेमने झाले नाही तरी पण कडू औषधे जरी नावडिने घेतली तरि रोग बरा करतात तसेच होते. पूर्वी केलेली पापे नष्टच होतात व नवी निर्माण होत नाहीत.

येथे कोणी असे विचारेल की ***नामस्मरण केंव्हा , कसे*** व किती वेळ ***करायचे***. ह्या प्रश्नाचे उत्तर समर्थ रामदास स्वामींनी दासबोधामधे नामस्मरण भक्ती ह्या समासांत दिले आहे. त्याचा सारांश खालील प्रमाणे आहे.

नामस्मरण सर्व काळी करावे म्हणजे सतत करावे. सुखाचे भोग अथवा दु:खाचे ताप सहन करत असतान , कोणतेह्रो काम करताना , नामस्मरण स्मरावे. जीवनामधे कशीही परिस्थिती आली असली तरीही नामस्मरणाची कांस सोडू नय. **थोडक्यांत म्हणजे भगवंताला न विसरता सर्व कांही करावे.**

***नामस्मरण किती करावे ?*** ह्या प्रश्नाचे उत्तर पण मिळते.ते खालील प्रमाणे आहे.

समर्थांच्या अंत:काळच्या रचलेल्या अभंगामधे तसच २१ समासी जुन्या दासबोधामधे समर्थांनी १३ कोटी ही संख्या सांगितली आहे. सकाळी जागे झाल्यापासून ते रात्री झोपी जाईपर्यंत जर सतत नामस्मरण जो कोणी करत असेल त्याच्या कडून १३ कोटी संख्येचा जप साधारणत: १२ वर्षांत होतो असे अनुमान आहे. असो. एवढी मोठी संख्या ह्याच साठी सांगितली आहे की क्षणभर सुद्धा भगवंताचा विसर पडायला नको.

**४था चरण:-**

*रामकृष्ण हरी विठ्ठला केशवा। मंत्र हा जपावा सर्व काळ ॥ ४ ॥*

स्मरणासाठी भगवंताचे कोणतेही नाम घेता येते. हेच हा अभंगाचा चरण सांगतो. ज्या देवावर भक्ताची श्रद्धा आहे ते नाम घेतले चालते. आकाशातून पडलेले सर्व पाणी जसे शेवटी सागरलाच मिळते तसेच नाम कोणतेही घेतले तरी भगवंतालाच पोहोचते. असा ह्याच अर्थ घेता येतो.

**५वा चरण :-**

**याविण आणिक नाही पै साधन । वाहतसे आण विठोबाची ॥ ५॥**

वरच्या चरणामधे तुकाराम महाराज हेच म्हणतात की : मी माझ्या प्रिय विठ्ठलाची शपथ घेऊन सांगतो की वर सांगितल्याप्रमाणे जर तुम्ही परमार्थ साधना केली तर पुरे आहे. दुसरी कोणतीही साधना करावी लागणार नाही " आपण ४९ व्या अभंगात पाहिलेच होते की परमार्थामधे संतवचनांवर विश्वास ठेवणे अत्यंत महत्वाचे आहे. " येथे तर महाराजांनी आपल्याला ही ग्वाहीच दिलेली आहे की माझ्यावचनांवर विश्वास ठेवा व नामस्मरणाला लागा..

**शेवटचा चरण:-**

*तुका म्हणे सोपे आहे सर्वांहूनि । शाहाणा तो धणी घेतो येथे ॥ ६॥*

म्हणुनच शेवटी पुन्हा महाराज म्हणताहेत की असे हे नामस्मरणाचे साध हे सर्वांत सोपे साधन आहे. जो शाहाणा आहे तोच माझे बोल समजून स्वत:चा फायदा करून घेईल.

**अभंगाची शिकवण :-**

अशा पद्धतीने नामस्मरण करून तुम्हाला मिळालेल्या ह्या अनमोल मनुष्यजन्माचे सार्थक करून घ्यावे हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.

ॐ

***************

प्रार्थनापर  अभंग १ल:

पूर्वी आपल्याकडे सकाली भूपाळया म्हणण्याची प्रथा होती. ट्या प्रथेत बसणारा हा अभंग आहे.

उठा सकळ जन उठले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥ १॥
करा जयजयकार वाद्यांचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥ २ ॥
जोडोनिया कर मुख पहा सादर । पायांवरि शिर ठेवूनिया ॥ ३॥
तुका म्हणे काय पढियेतें मागा । आपुलालें सांगा दु:ख सकळ ॥ ४॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

नारायण उठले आहेत आता जागे व्हा . (नारायणाचे दर्शन झाल्याने ) तिन्ही लोकांमधील मुनिजनांना आनंद झाला आहे. ॥ १॥

भगवंताचा जयजयकार करा व मृदुंग , वीणा , टाळ इत्यादि वाद्यांचा गजर करा .॥ २॥

भगवंताचे श्रीमुख दोन्ही हातांनी नमस्कार करून आदराने पाहा. त्याच्या पायी डोके ठेवा ॥ ३॥

तुका म्हणतो की तुम्हाला जे दु:ख होते आहे ते त्याला सांगा व काय हवे ते त्याच्याकडे मागा। ४॥

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण** :-

**तसे वरवर पाहिले तर अभंगाचा अर्थ अगदी सोपा वाटतो** व आहे पण .**अभंगाच्या पहिल्याच चरणामधे** महाराज म्हणतात की भगवंत आत जागा झाला आहे. तेंव्हा आता तुम्ही झोपू नका . त्याचे दर्शन झाल्याने सर्व मुनिजन आनंदित झाले आहेत.

**पण खरेच भगवंत झोपला होता कां ? मुळीच नाही** पण भक्ताला त्याच्यावरच्या प्रेमामुळे वाटते की त्याला पण आपल्यासारखीच झोपेची गरज असणार व तो पण रात्री
झोपतो. ह्याविचारामुळेच आपल्याकडे सकाळी कांकड आरति, तसेच रात्री शेजारती म्हणतात. **ज्यावेळेला माणसाला कळते की आतापर्यंत त्याने सर्व वेळ काळ उगाचच ऐहिका वस्तूंच्या मागे धावण्यात व्यर्थ घालविला आहे ती वेळ म्हणजे खरी जागे झाल्याची वेळ आहे.** ह्यावेळिच

भगवंताचे दर्शन व्हावे ही ईच्छा मनामधे जागृत होऊन माणूस भगवंताची भक्ती करू लागतो. मग त्याला देवाच्या नावाने जयजयकार करावासा वाटतो. त्यचे भजन टाळ मृदंग इत्यादी वाद्ये वाजवून करावेसे वाटते.
जे असे आधीच जागे झाले आहेत व ज्यांनी नवविधाभक्ति, योग किंवा कोणत्याही मार्गाने जाऊन भगवंताची भेट घेतली आहे असे संतजन म्हणुनच नेहमी भगवंताच्या दर्शनाची अनुभूति घेत आनंदामधे मग्न असतात.

ह्याच स्थितीचे वर्णन अभंगाच्या पहिल्या व दुसऱ्या चरणामधे महाराजानी केलेले आहे. **अभंगाच्या ३ व ४ चरणामधे** तुकाराम महाराज म्हणतात की भगवंताचे दर्शन घ्या , त्याच्या पायांवर डोके ठेवा व असे शरण जाऊन जे काय मागायचे ते मागा.

खरे तर भगवंत सर्वत्रच आहे.म्हणजेच आपल्या हृदयांतील अंतरात्मा पण तोच आहे. मायेच्या अंमलाखाली आपण असल्याने आपल्याला ह्याचा अनुभव नाही. म्हणुनच अनुभव येईपर्यंत द्वैतामधे राहूनच भगवंताची भक्ती करावी त्याला अनन्य शरण जावे हाच सर्व संतांचा उपदेश आहे. असो. तसेच भगवंत हा सगूण आहे तसाच निर्गूण अव्यक्त पण आहे. सर्वसामन्यांसाठी सगूण रूपी भगवंताचे भजन करणेच सोपे व योग्य असते.

आपण आपले डोके ज्याच्या पायांशी आपण ठेवतो त्याला आपण पूर्ण शरण गेलेलो असतो. असे शरण जाणे ह्यामधे **"आपले सर्वस्व तोच आहे, त्याला सर्व कांही ठाऊक आहे ,आपल्यासाठी योग्य काय व अयोग्य काय आहे ते त्याला माहीत आहे व म्हणुनच तो आपले सर्व संकटांमधून रक्षण करेलच "** ही खात्रीची भावना असणे महत्वाचे असते.

म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात की अशा तुमच्या प्रिय भगवंताच्या प्रतिमेचे दर्शन घ्या. त्याच्या पायांशी डोके ठेवून त्याला शरण जा. दोन्ही हात जोडून त्याला प्रणाम नमस्कार करा तुकाराम महाराज पुढे हे पण म्हणताहेत की त्याच्याकडे जे काय मागायचे ते मागा.
**भगवंताकडे काय मागावे ? ह्या प्रश्नाचे उत्तर प्रत्येकासाठी वेगवेगळे आहे.**

समर्थांचा एक श्लोक येथे प्रस्तुत करता केला आहे.

**घरी कामधेनू पुढे ताक मागे । हरीबोध सांडूनी वेवाद मागें।**
**करीं सार चिंतामणी काच खंडे। तया मागतां देत आहे उदंडे ॥**

ज्याचे मन ऐहिकाकडे गुंतले आहे तो ऐहिक सुखाचीच मागणी करेल. तसे करणे म्हणजे चिंतामणी कडे काचेचे तुकडे मागण्यासारखे असते किंवा कामधेनूकडे ताकाची मागणी करण्यासारखे हे आहे..

भगवंत द्यायला तयारच असतो पण काय मागावे हे म्हणुनच विवेकाने ठरविणे उत्तम .मागायचेच आहे तर मग सर्व दु:खांपासून नेहमी करता मुक्ती कां न मागावी ?तुकाराम महाराजांचाच एक प्रसिद्ध अभंग आहे. त्याचा पहिला चरण " सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया " असा आहे.". ह्या अभंगात त्यांनी भगवंताकडे फक्त त्याची भक्ती घडावी एवढेच मागितले आहे. तो अभंग पुढे आपण पाहूच. **समर्थ रामदासांचे " रघूनायका मागणे हेची आता " हा शेवटचा चरण असलेले करूणाष्टक म्हणजे आपण काय मागावे ह्याचे उत्तम उदाहरण आहे.** असो.

***अभंगाची शिकवण :-***

***वर लिहिल्या प्रमाणे भाव ठेवून भगवंतास शरण जा. स्वत:ची सर्व दु;खे त्याला सांगा व जे काय हवे ते मागा . तुम्ही खरेच जर असे संपूर्ण शरगागत भावाने देवा कडे जाल तर तो तुमच्या सर्व ईच्छा पूर्ण करेल हे हा अभंग सांगतो. .आपल्याला*** **अशी जणू ग्वाहीच येथे मिळते आहे.** व ह्या दृष्टीने हा एक महत्वाचा अभंग आपण येथे पाहिला आहे.

ॐ

*******************

अभंग :- शरणागत भावाने केलेली प्रार्थना

सदा माझे डोळा जडो तुझी मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरीया ॥ १ ॥
गोड तुझे रूप गोड तुझे नाम । देई मज प्रेम सर्व काळ ॥ २ ॥
विठोबा माउलिये हाचि वर देई । संचरोनि राही हृदयामाजी ॥ ३ ।
तुका म्हणे कांही न मागो आणीक । तुझे पायी सुख सर्व आहे ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ :**

हे रखुमाईच्या पती पांडुरंगा माझ्या डोळयांनी मी तुझेच रूप पाहों ॥ १॥
तुझे रूप व नांव दोन्हीही गोड वाटतात. माझ्यावर तुझी कृपा तुझे प्रेम सतत राहों ॥ २॥
हे माझे विठुमाई मला हाच वर दे की तूं माझ्या हृदयामधे नेहमी राहशील ॥ ३॥
तुका म्हणतो की मला आणखी कांहिही नको आहे कारण तुझ्या चरणांपाशीच सर्वे सुखे आहेत। ४॥

**अभंगामागची भूमिका कोणती त्याचे माहीती :**

**ह्या अभंगामधे तुकाराम महाराज त्यांच्या आवडत्या दैवताशी विठ्ठ्ला बरोबर बोलत आहेत** व प्रार्थना करीत आहेत की मी जे वर मागणार आहे ते विठोबा माऊलीने द्यावे.

संत तुकाराम महाराजांची भक्त म्हणून जी स्थिति आहे ती अत्यंत तीव्र कोटीची आहे. अशा भक्तीला " परा भक्ती " असे नांव आहे. भक्ति करतांना आपण भगवंतास सगुण रूपा मधे पाहतो. भक्ती ह मनाचा भाव आहे व ह्याभावात भक्ताला भगवंताविषयी पराकोटीचे प्रेम वाटते, इतर कोठल्याही ऐहिक वस्तु आवडत नाहीत. ह्यामुळे ईश्वर भेट होते. असे भक्तपहायला मिळणे अत्यंत दुर्लभ योग असतो.

भगवदभक्तांचे तीन प्रकार आहेत. श्रीमद्भगवद्गीतेमधे ह्या तीन प्रकारच्या भक्तांचे वर्णन येते. असे म्हणता येईल की भक्तीच्या ह्या निरनिराळया पातळया आहेत.

१) अर्थार्थी भक्त: असे भक्त ऐहीक सुखे व ऐहीक जगामधे भोगावी लागणारी दु:खे यांच्या पासून मुक्त व्हावे , जगामधे आपले नांव व्हावे, प्रसिद्धि मिळावी , भरपूर पैसा संपत्ती मिळावी म्हणून भगवंताची भक्ती करतात. अश्या भक्तीला " सकाम भक्ती "म्हणतात.

२) जिज्ञासू भक्त: ह्यांना सत्य काय आहे हे जाणून घ्यायचे असते. म्हणून ते भगवंताची भक्ती करतात.

३) ज्ञानी भक्त : ह्या भक्तांना भगवंत आकळलेला असतो. तरीही ते भगवंताची द्वैतामधे द्वैतमय दृश्य जगात राहत असल्यामुळे भगवंताची भक्ति करतात. असे भक्त आपण कोणीएक भावामधे भगवंताशी नाते जोडून असलेले पाहतो. जसा अर्जुनाचा सख्यभाव होता, यशोदमातेचा वात्सल्याचा भाव होता, मीराबाईंचा मधुर भाव होता. कांही भक्त भगवताचे सेवक दास ह्या भावांत होते. जसे पुरंदरदास, रामदास स्वामी इत्यादी **तुकाराम महाराजांचा भाव लहान बाळासारखा आहे. ते आपल्या विठ्ठलाला आई ह्या भावांत पहात असत. अभंगामधे ते भगवंताला "विठोबा माऊली "म्हणत आहेत**.

ह्या सर्वच भक्तांची भगवंतावर निष्काम भक्ती प्रिती होती. भगवंताकडून कसलिही अपेक्षा न असणारी अशी ही भक्तिची सर्वोच्च पायरी आहे.

आपण सर्वच जण खरतर अर्थार्थी भक्त आहोत. आपल्याला देवाची भक्ती ह्यासाठी करण्याची बुद्धी झाली आहे कारण आपल्याला त्याच्याकडून कांहीतरी हवे आहे व तो ते देईल असा थोडसा विश्वास वाटतो आहे. कोणतीही पूजा जरताना तर आपण संकल्पच करतो व नंतरच पूजा करतो. पूजेचा संकल्प पण हाच असतो की भगवंताने सर्वांना क्षेम, स्थैर्य , आयुष्य , आरोग्य , संपत्ती इत्यादी सर्व द्यावे. इतरहि मागण्या म्हणजे चांगली पत्नि किंव पती, चांगली मुले , यादी न संपणारी होईल!

साधारणत: पूजा,यज्ञ, होम वगैरे करणारी मंडळी सकाम भक्तच करतात. प्रत्येकाची कांहितरी ईच्छा असते ती पूर्ण व्हावी म्हणून हे सर्व सकाम भक्त करतात.

***येथे हे लक्षांत घेणे आवश्यक आहे की अपूर्ण राहिलेल्या ईच्छा, वासना यांच्या पूर्ती साठीच जीवाला अनेक जन्म घ्यावे लागतात. ह्यामुळे वासना पूर्ती होते पण दुख:ही भोगावे लागणे चालू राहते. जन्म-मृत्युचक्रांत अडकण्याचे हे कारण आहे .।***

***फक्त खरी निष्काम भक्तीच ह्या कारणास्तव घडायला हवी.***

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :**
संत तुकाराम महाराज ह्या अभंगात पांडुरंगा कडे ही प्रार्थना करीत आहेत की त्याने अशी निष्काम भक्ती करण्याची बुद्धी द्यावी.

अभंगाच्या पहिल्याचरणांत ते मागतात की त्यांना पांडुरंगाच्या सुंदर रूपाचा व गोड नांवाच कधीही विसर होऊ नये. अभंगाची भाषाच तुकाराम महाराजांची परा भक्तीची स्थिती स्पष्ट करते.

श्री. गोंदवलेकर महाराज ( महाराष्टांतले एक अलिकडचे संत ) म्हणतात जेंव्हा भगवंताबद्दल असीम प्रेम वाटू लागते तेंव्हा त्याचे नाम गॊड होते. अभग लिहितांना त्यांना असा अनुभव प्रत्यक्ष येत होता हे पण स्पष्टच आहे. त्या शिवाय पांडुरंगाच्या मूर्तीचे खरे सौंदर्य व नामाची खरी गोडी चाखणेच शक्य नाही. त्याना भगवंताकडून फक्त प्रेम हवे आहे बाकी कांहीही नको आहे.

**अभंगाची शिकवण :**
हा अभंग हेच दर्शवितो की आपली देवावरची भक्ति निष्कामच असावी. व अशी भक्ती घडावी म्हणुन आपण भगवंताची प्रार्थना करूया कारण मग मोक्षाची वेळ दुर असणार नाही.

ॐ

**********************

**प्रार्थनापर अभंग : शरणागत भाव दर्शविणारा**

आता केशी राजा हेचि विनवणि । मस्तक चरणी ठेवितसे ॥ १ ॥
देह असो माझा भलतियें ठायी । चित्त तुझ्या पायीं असों द्यावें ॥ २ \\
काळाचें खंडण घडावें चिंतन । तनमनधन विन्मुखता ॥ ३ ॥
कफ वात पित्त देह अवसानीं । ठेवावी वारूनिं दुरुतें हिं ॥ ४ ॥
सावध तों माझीं इंद्रियें सकळ । दिली एक वेळ हाक आधीं ॥ ५ ॥
तुका म्हणी तूं या सकळाचा जनिता । येथें ऐक्यता सकळांसी ॥ ६ ॥

**अभंगाचा शब्दार्थ** :-

हे केशवा तुझ्या चरणांवर डोके ठेवून आता माझी हीच विनवणि आहे की माझा देह कोठेही असूदे, पण माझे चित्त तुझ्या चरणांपाशीच असूदे. माझे चिंतन हा देह, मन, द्रव्य ह्यांपासून विन्मुख होऊन होवो व ह्या चिंतनाच माझा सर्व काळ जावो. ह्या देहाच्या ठिकाणी कफ ,वात ,पित्त हे दोष आहेत त्यांचे तूच निवारण कर.आतापर्यंत माझी ईंद्रिये सावध आहेअ व म्हणुन मी ही हकिगत तुला कळवतो आहे. तूच सर्वांचा निर्माता आहेअस व तुका म्हणतो की म्हणुनच तुझ्याच पाय़ी सर्वांचा मेळ बसेल.

**अभंगाचा सखोल अर्थ :-**

आपण जाणतोच की तुकाराम महाराज हे स्वत: ब्रह्मज्ञानी होते पण सर्वच संतांनाइतर बद्धजनांचाही उद्धार व्हावा हीच ईच्छा असते तशी त्यांना पण आहे. हा अभंग त्याच कळवळ्य़ाने लिहिलेला आहे.

आपण द्वैतामधे आहोत म्हणजेच भगवंत व आपण वेगळे आहोत असे आपल्याला वाटते. ह्याच द्वैताच्या भूमिके मधून ह्या अभंगामधे भगवंताला महाराज एक विनवणी करताहेत. ती विनवणी विवेक विचार घडावा ह्यासाठीच आहे. ह्या विवेका साठीच येथे मार्गदर्शन केलेले आहे. कसे ते अभंगाचा अर्थ पाहिला की कळते.

**अभंगाच्या पहिल्याच दोन चरणांत** महाराज म्हणतात की हे केशीराजा ( कृष्णा पांडुरंगा) तुझ्या चरणी मस्तक ठेवून माझी हीच विनवणी आहे की माझा हा देह कश्याही परिस्थिती मधे राहू दे; पण **माझे चित्त मात्र** तुझ्या पायां ठायीच राहू द्यावे..

येथे **मना** ऐवजी **चित्त** हा शब्द वापरला आहे. ह्याचे कारण हेच असावे की आपल्या चितामधेच प्रथम **वासनेचा बुडबुडा** वर येतो. **त्यालाच स्फुरण असे नांव आहे.** ह्या स्फुरणावर पुढचे सर्व कार्य घडते. (बुद्धि काय करायचे ह्याचा निर्णय देते. मगच कार्य प्रत्यक्षात घडते.)

चित्तामधेच सर्व वासना; फक्त ह्या जन्मा मधल्याच नव्हेत तर पूर्वीच्या अनेक जन्मांनधल्या; बीजरुपाने साठवलेल्या असतात. आपण कळत वा नकळत सकाम कर्म करून त्यांमधे भरच घालत असतो.

**आपण कोणतेही कर्म केले की त्याचे दोन अंकूर तयार होतात. त्यातल एक वासनेचा व दुसरा भोगाचा असतो.**

उदा. जर आपण पेढा खाल्ला तर भोग मिळतो तो गोडिचा व मनामधे पेढ्य़ाच्या चविच्या आठवण रुपाने वासना चित्तामधे बीजरूपाने साठवली जाते. ती कधीतरी वर येते व तोच भोग पुन: भोगावासा वाटतो.

समर्थ रामदास म्हणतात " जन्म घेणे वासनेच्या संगतीने" व ह्याच कारणासाठी "चित्त " हा शब्द येथे आलेला आहे.

जर जन्ममरणाच्या फेऱ्या मधून सुटका हवी असेल तर चितामधे अशी कांही साठवण व्हायला हवी जेणेकरून नव्या वासना तेथे साठवल्याच जाऊ नयेत. अर्थात हरीनाम , भगवंताचे रूप, हेच जर चितामधे सतत असेल तरच हे घडू शकते. म्हणून महाराज म्हणतात की " हे कृष्णा माझे चित्त हे तुझे पायी असो दे" .एवढे पुरे.मग माझा देह कोणत्याही परिस्थितीत कां असेना त्याला माझी हरकत नाही. आपला देहा कौणत्या स्थितीत आहे हे आपल्या हाती नसते. बालपण, तरूणपण, वार्धक्य ह्या देहाच्या निरनिराळया अवस्था, तसेच शरीराच्या जागृत , स्वप्न , सुषुप्ति ह्या अवस्था.ह्या सर्वामधे माझे चित्त तुझ्या पायी असावे ही प्रार्थना ह्या ठिकाणी आहे.

आपल्या मनाचे वैशिष्ठ्य हे जरी आहे की त्याला एखाद्या गोष्टीचा जर ध्यास लागला तर मग ईतर काही सुचत नाही तरी ही स्थिति फार वेळापर्यंत टिकत नाही . माया ह्या भगवंताच्या शक्तीच्या जोरामुळे माणूस शरीराचे सुख, मनाचे सुख, पैसा ह्यामधेच गुंततो. हे अगदी नकळत व सहजपणे होत असते. . जर तन, मन व धनाच्या बाबतीत विन्मुखता म्हणजे विरक्ति आली व भगवंताच्या भेटिची आस लागली तर मग मात्र चित्तामधे फक्त भगवंतच उरतो किंवा उरेल. **"जन्ममरणापासून सुटका होणे म्हणजेच " काळाचे खंडन अथवा नाश -मृत्यूवर विजय होय." ह्यासाठीच " तुझे चिंतन माझ्याकडून होवो " हे मागणे अभंगाच्या तिसऱ्या चरणामधे आहे.**

**चौथ्या चरणाचा** अर्थ समजण्यासाठी हे पण लक्षांत घ्यायचे की मन पण स्वस्थ निरोगीच रहायला हवे. मनाच्ह्या विकारामुळेच खरेतर शरीरास रोग होतात हे आपण जाणतोच. ह्या शिवाय पूर्व कर्मानुसार शरीर धारणा झाली की त्याला रोग आजार हे कधितरी होणारच. आपला नेहमीचाच अनुभव आहे की थोडे जरी डोके दुखले किंवा सर्दीने पछाडले तर केंव्हा एकदा बरा होईन एवढाच विचार मनामधे घोळत रहातो.. आयुर्वेदाप्रमाणे जेव्हा कफ, वात, पित्त ह्यांचे संतुलन बिघडते तेंव्हा माणूस आजारी पडतो. आजार झाला की मग भगवंताचे स्मरण करणे कठीण होते

श्री. रामकृष्ण परमहंसांचे गुरु तोतापुरी एकदा डिसेंट्री ने आजारी झाले व एवढे त्रासले की गंगेमधे देहविसर्जनासाठी गेले. पण त्यांना आढळले की पाण्यात ते बुडूच शकत नव्हते. मग त्यांना कळले की **अगदी ब्रह्मज्ञानी असला तरी त्याचे जगामधले य्वव्हार हे भगवंताच्या ईच्छे प्रमाणेच घडत असतात. हे अर्थातच तुकाराम महाराजांना माहीत आहे व म्हणूनच महाराजांनी अभंगाच्या ४ थ्या चरणांत प्रार्थना केली आहे की हे देवा मला देहाच्या आजारपणांपासून दुर ठेव.**

**हठयोगामधे म्हणूनच सर्वप्रथम शरीरस्वास्थ्याकडे लक्ष केन्द्रित करतात.**
**" शरीर आद्यं न खलु सर्व धर्म साधनात् " हे संस्कृत वचन सुप्रसिद्ध आहे.**

येथे आणखी एक गोष्ट लक्षांत घ्यायची आहे ती म्हणजे खरा भक्त हा भगवंताला अनन्य भावे शरणागत असतो. जे जे कांही घडते ते भगवंताच्या ईच्छेप्रमाणे घडत आहे ही अश्या भक्ताची धारणा असते. **महाराजांची हीच धारणा आहे म्हणून त्यांनी भगवंताला वरीलप्रमाणे विनवणी केली आहे म्हणजे भगवंताठायी अनन्य भाव पण**
**असायला हवा**

**मग आपले प्रयत्न काय असावे? प्रयत्नांची खरच गरज आहे कां? हे प्रश्न पुढे येऊ शकतांत.** असे प्रश्न महाराजांनाही पूर्वी पडले असणारच. त्याचे **उत्तर** पण **त्यांना मिळाले होते तेच ह्या पुढच्या ५व्या व ६व्या चरणांमधे येते.**

महाराज म्हणतात " मला माहीत आहे की माझे मन इंद्रियांच्या मागे न जाऊ देणे म्हणजेच वासनांना मी बळी पडायचे नाही हा प्रयत्न मी करायला हवा. देवा तू ह्याबद्दल पुर्वी मला हांक देऊन हे सांगितले आहेस व ते मी विसरलेलो नाही. मी ह्याबाबत सावधच आहे."

**श्रेय ( जे प्राप्त करायचे आहे ते अम्ररत्व किंवा ईश्वराची भेट ) हे भक्ताचे मुख्य फार मोठे ध्येय आहे म्हणून प्रयत्न पण तसेच पराकाष्टेचे लागत्तात. हे प्रयत्न करण्याची बुद्धीदेणाराही भगवंतचच आहे.**

हेच समजण्यासाठी आपल्या जीवनात अनेक कठीण प्रसंग येतात. हीच भगवंताची हांक होय. **पण ही भगवंताची हाक फार थोडेजण ऐकतात.** . आपली वासना काय आहे हे पाहाण्याचे सावधपण ठेवणे हाच खरा प्रयत्न होय. हा प्रयत्न करणे आपल्या हाती आहे.

म्हणुनच तुकाराम महाराज शेवटी म्हणतात की हे पांडुरंगा तुच सर्वाचा निर्माता आहेस. ह्याबद्दल सर्वांचे एकमतच आहे.

हे सर्व ध्यानी धरूनच महाराजांनी हा विनवणीचा अभंग लिहिला आहे.

**अभंगाची शिकवण :**

या अभंगावरून आपण हेच शिकतो की " आहे तितुके देवाचे " , " कर्ताकरविता तो भगवंतच आहे" हे समजून रहावे. त्याचे स्मरण सतत ठेवण्याचा प्रयत्न करत रहावे. प्रयत्नांना तोच यश देईल हि खात्री ठेवावी" मगच मनुष्य जन्माचे सार्थक होईल.ह्या शिवाय आपले प्रयत्न शरीर व मन दोन्ही निरोगी रहावे ह्यासाठी तर हवेतच. म्हणजेच रोज पुरेसा व्यायाम , ध्यान, योग्य ग्रंथांचे वाचन सत्संग इत्यादी हे पण करायला हवेत.

तसेच मुख्य प्रयत्न हे मनावर ताबा मिळवण्यासाठी करायला हवेत त्यासाठीच " जे जी घडते त्याचा कर्ता मी नाही तर भगवंतानेच मला आलेले प्रत्येक काम दिले आहे व मी ते नीटच करेन " ही धारणा सतत जागी ठेवायची आहे.

ॐ

*************

**प्रार्थनापर अभंग : गोड बोलणे असावे**

**घेईं घेईं माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥१ ॥**
तुम्ही घ्यारे डोळे सुख । पहा विठोबाचे मुख ॥ २॥
तुम्ही आईकारे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥
मना तेथें धांव घेई । राहें विठोबाचे पायीं ॥ ४॥
तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५॥

**अभंगाचा शब्दार्थ :-**

हे माझ्या वाचे, तू विठोबाचे गोड नांव घे. हे डोळेहो तुम्ही सदा विठ्ठलाचे मुख दर्शन घ्या, हे श्रवणेंद्रियांनो तुम्ही विठठलाचे गुणवर्णन ऐका. हे मना विठोबाच्या पायांपाशी धाव घे. तुका म्हणतो हे माझ्या जीवा तू विठ्ठलाला विसंबू नको.

**अभंगामागची भूमिका :-**

आपण आधिच्या अभंगाचा अर्थ समजून घेतला तेंव्हा पाहिलेच आहे की सर्वच संतांनी नामस्मरणावर भर दिलेला आहे. संत रामदासस्वामी , वासुदेवानंद सरस्वती ( गरुडेश्वर येथील) यांनी तर हे ही सांगितले आहे की " जर एखाद्याने साडेतीन कोटी जप केला तर त्याला स्वनामधे व जेंव्हा १३ कोटी पूर्ण होईल तेंव्हा प्रत्यक्ष जागृतावस्थेतच भगवंताचा साक्षात्कार होईल.

ह्या दोनही संख्या खूप मोठ्या वाटतात. आपल्यापैकी बरच जण वयाच्या ५०-५५ नंतर अध्यात्माचा शोध घ्यायला लागलो आहोत. जर रोज ५ तास जप केला तर १ कोटी जपसंख्या पूर्ण होण्यास ६ वर्षे व १३ कोटीस ६६ ते ७० वर्षे लागतील. म्हणजे ह्याजन्मी मोक्ष अशक्यच आहे असे वाटेल. ह्याचे कारण म्हणजे आपल्याला संसाराची कामे सोडून फक्त जप करत बसावे लागेल. पण असे वागणे नक्कीच घातकच असते ह्यात संशय नाही

**पण आता आपल्यापाशी फार थोडा वेळ उरलेला हे असे वाटणे पण चूकच आहे.**

**मागे पाहिलेल्या प्रमाणे हा अभंगसुद्धा आपल्याला काय उपाय करायचा तेच मार्गदर्शन करतो आहे. तो उपाय अभंगात सविस्तर रीत्या दिलेला आहे. सारांश खालोे देत आहे. मनाची एक विशिष्ट तयारी फक्त असायला हवी आपल्या सर्व ज्ञानेंद्रियांना व मनाला ताब्यात ठेवणे जर केले तर आपली प्रपंचातली सर्व कामे करूनसुद्धा परमार्थ साधता येईल.**

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टिकरण :-**

**१ला चरण:-** सर्वप्रथम महाराज म्हणतात की त्यांच्या वाचेने भगवंताचे गोड नांव घ्यावे. ह्याला बराच सखोल अर्थ आहे. आपण वैखरीत ( ईतरांना बोलणे ऐकू येईल असे म्हणजे संवाद करत असतान ) नेहमी बोलतो. तसेच मनातल्या मनात पण बोलतो. जर सर्वांभूती भगवंत आहे हे मनास पटले तरच आपले इतरांबरोबरचे बोलणे गोड होईल. असे बोलणे म्हणजेच " विठोबाचे गोड नाव घेणे होय" कधीही कोणालाच राग आला असला तरिपण कर्कश, मनाला जखम करणारे , उद्वेग वाटेल, दु:ख होईल असे बोलू नये हेच येथे सांगितले आहे. त्यामागची भूमिका : सर्वांभूती भगवंत पाहाणे हीच असायला हवी.

**२रा चरण;:-** ह्याठिकाणी महाराज म्हणतात की त्याना सतत सर्वत्र स्मितहास्यकरणारे विठोबाचे मुख दिसावे. विठोबा म्हणजेच पांडुरंग .हे भगवान श्रीकृष्णांचेच एक नांव आहे. हे सर्व जगत् भगवंतानेच व्यापले आहे असे ईशोपनिषद सांगते. सर्व संतांच पण हाच स्वानुभव आहे. अशी दृष्टी ठेवली की सर्व जगत आनंदमय आहे हेच अनुभवास येते. अशी जगाकडे पाहण्याची दृष्टी असावी हेच येथे सांगितले आहे.

**३रा चरण :-** ह्या चरणामधे तुकाराम महाराज म्हणतात की त्यांच्या कानांनी भगवंताचे गुंणवर्णन ऐकू येवो. असे गुणवर्णन जेथे चालू असेते तेथे कोणतिही भांडणे , वादविवाद , आरडओरडा नसतो. थोडक्यांत म्हणजे जेथे वाचेने गोड शब्द आहेत ते भगवंताचे कीर्तनच जणू असते.

**जरा विचार केला तर असे म्हणता येते की गोड बोलण्याने दुसऱ्या च्या अंतरात्म्यास आनंदच होतो म्हणजेच असे गोड बोलणे हे भगवंताचे कीर्तन कां म्हणता येते ते पटू शकते.**

तुकाराम महाराजांना हेच येथे बहुतेक सांगायचे आहे. निदान मला तरी असेच वाटते.

**४था व ५ वा चरण :- येथे तुकाराम महाराज सांगतात की त्यांचे मन सतत भगवंताच्या पाय़ांशी राहो. व " ह्या केशवाला कधीही सोडू नका " असा उपदेश पण त्यांनी केलेला आहे.**
***येथे त्यांनी " हा केशव " हे शब्द वापरून आपल्याला हेच सांगितले आहे की ते भगवंतास प्रत्यक्ष सतत बघत आहेत. तो आहेच हेच सत्य आहे हे येथे ठासून सांगितले आहे. ह्याचाच अर्थ हा पण आहे की हा संपूर्ण अभंग ज्यांना भगवंताच्या भेटीची आंस लागली आहे त्यांना मार्गदर्शनासाठीच जणू लिहिलेला आहे.***

*जवळपास ह्याच अर्थाचा एक श्लोक शिवमानसपूजेमधे आहे. तो खालीलप्रमाणे आहे.*
***आत्मा त्वं गिरिजा मति: सहचरा प्राणा: शरीरंगृहम् ।***
***पूजा ते विविधोपभोगरचना निद्रा समाधि:स्थिति:।***
***संचार: पदयो: प्रदक्षिणविधि: : स्तोत्राणि सर्वा गिरो ।***
***यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम् ॥***

श्लोकाचा अर्थ :- हे शिवा ! तूच शरीरस्थ आत्मा आहेस . बुद्धी हीच पार्वती आहे व शइर हेच त्यांचे राहण्याचे ठिकाण आहे. देहाने पंचइंद्रियांद्वारे घेतलेले भोगच तुझी पूजा आहे. निद्रा हीच समाधीची स्थिती आहे. पायान्नि केलेला संचर हीच जणू तुला घातलेली प्रदक्षीणा आहे. जे जे बोलणे घडले तीच तुझी स्तुती आहे. हे शिवा मी जे जे कर्म करतो आहे ती तुझी आराधनाच आहे.

तुकाराम महाराजांनी स्वानुभवावर आधरित अभंगामधे हेच वेगळया शब्दांमधे लिहिले आहे *जीवन्मुक्त व्यक्ती जगामधे कशी राहते त्याचेच हे वर्णन आहे असेही म्हणता येईल. असो.*

**अभंगाची शिकवण :- खालीलप्रमाणे आहे.**
**१) जगाशी कसे वर्तन असावे .**
**२) सर्वांभूती भगवंतास पाहावे व तसे वागावे. हाच मुख्य मुदा आहे.**
**३) सर्वांशीच आदराने , प्रेमाने बोलावे.**
**४) सर्व सृष्टी भगवंतच आहे म्हणून वस्तूचे नुकसान करू नये.**

**५) प्रत्येक कार्य भगवंताची पूजा असे समजूनच नीट करावे.**

ॐ

**************

**प्रार्थनापर अभंग : मनाला आवर घालता यावा ह्या साठीचा.**

मन माझे चपळ । न राहे निश्चळ । घडि घडि पळ पळ स्थिर नाही ॥ १ ॥
आता तू उदास नव्हे नारायणा । धावे मज दीना गांजियले ॥ २ ॥
धाव घाली पुढे इंद्रियांचे ओढी । केले तडातोडी चित्त माझे ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा न चले सायास । राहिलो हे आस धरोनि तुझी ॥ ४ ॥

**अभंगाचा शब्दार्थ:-**

माझे मन अत्यंतचपळ आहे व कोठेही क्षणभसुद्धा स्थिर रहात नाही. सारखे एकडेतिकडे पळत असते ॥ १॥

हे नारायणा तू माझ्याबाबतीत उदास होऊ नकोस . मला ह्यापरिस्थितीतून वाचवायला धाव. मी अगदी दीनवाणा झालो आहे व ह्या परिस्थितीमुळे गांजून गेलो आहे ॥ २ ॥

माझे चित्त इंद्रियांच्या विषयां मागे धावते व समाधान न मिळाल्यामूळे जणू चित्तचे तुकडे झाले आहेत. ॥ ३॥

तुका म्हणतो की माझे सर्व प्रयत्न अपूरे पडत आहेत. आता मला कळून चुकले आहे व म्हणून मला हीच आशा आहे की ( हे नारायणा) तूच ह्यातून सोडवशील ॥ ४॥

**अभंगाचा अर्थ समजण्यासाटी आवश्यक माहिती :-**

आपण आधीच्या अनेक अभंगाच्या विवरणामधे पाहिलेच आहे की माणसाचे मन हे सतत पंचेंद्रियांच्या कोठल्यातरी एका विषयांमागे धावत असते. त्यामुळेच मनामधे वासना निर्माण

होतात. ही क्रिया आपल्या जन्मापासून जागेपणी तसेच आपण झोपी गेलो तरी चालूच असते. ह्यामुळे मन अस्थिर असते. असो.

मनाचे चपळपण हे भल्याभल्यांना आवरता येत नाही. अगदी उच्च कोटिच्या साधकंना सुद्धा ते आवरणे कठीणच जाते. आपल्या संतांच्या साधकावस्थेमधे म्हणुनच ह्यावर ओव्या व अभंग आहेत.
उदाहरणार्थ : एका करूणाष्टकामधे समर्थ रामदास स्वामींनी म्हटले आहे की
"चपळपण मनाचे नावरे नावरीता. तुजविण शिण होतो , धाव रे धाव आता."
संत तुकारामांचा हा अभंग अशाच काव्यामधला एक आहे.

मनाची एक वाईट सवय म्हणजे संशय वाटणे. ही सवय साधकालाच नव्हे तर इतरांना पण व्यवहारामधे सुद्धा साधारणत: घातक ठरते. आपण पहातोच की अगदी हुषार मुले मला सर्व येते असे समजून अभ्यासाकडे दुर्लक्ष करतात. हा सुध्दा संशयाचाच एक प्रकार आहे.
पण दृश्य सृष्टीचे व्यवहार करतांना " प्रथम संशय घेणे, त्यानंतर तर्काने व अनुभवाने संशयाचे निराकरण होणे ,व मग विश्वास बसणे हे घडते. ह्यानंतर पुढे खात्री झाल्यावर एखाद्या व्यक्तीला काम देणे " ह्या पद्धतीने चालतात/केले जातात.
अर्थात व्यवहारामधे हा विवेक विचार उपयोगी पडतो हे स्पष्टच आहे. असा विचार करणारी व्यक्ति व्यवहारात संशयावर मात करून यशस्वी होते.

**पण परमार्थामधे याच्या उलट जावे लागते..** प्रथम श्रद्धा असावी लागते. अशी श्रद्धाच परमार्थामधे यश देंणारी असते. बरीच मंडळी संशयाने आपली साधना सोडतात व जीवन व्यर्थ घालवतात. **ठाम श्रद्धा असल्यानंतर माणसाला योग्य प्रयत्नांमुळे भगवंत आहेच व तो माझ्या भल्यासाठीच सर्व कांही करतो आहे हा अनुभव येतो.** तो आहेच हि खात्री झाली की आपले त्याच्याशी नाते जोडले जाते. मग आपण जसे एखादे मूल आपल्या आईकडे आपली त्राती म्हणुन पाहते व तिच्यावर सारा भार टाकून निश्चिंत होते तसे आपण होऊ शकतो. भगवंत अशा

भक्ताचा नेहमीच कैवारी असतो. भगवंताने तसे गीतेमधे सांगितलेच आहे.म्हणुन हे समजून घ्यावे व **आपली दृष्टी परमार्थांत संशयरहित ठेवावी असे पण म्हणता येते. असो.**
**पण कितीही प्रयत्न केले तरी मन अस्थिर राहते हाच आपला अनुभव आहे /असतो.**
**ह्या परिस्थितीतूमधून कसे बाहेर पडायचे ह्याचे मार्गदर्शन ह्या अभंगात आहे.**

**अभंगाच्या अर्थाचे स्पष्टीकरण :-**

तुकाराम महाराज येथे म्हणतात की हे नारायणा मी सर्व प्रयत्न करून आता थकलो आहे. मन सतत अस्थिरच आहे. सारखे तुझा स्मरणापासून दुर जाते आहे. पण तूच सर्व जाणतोच. तूच माझा त्राता आहेस. म्हणुन तुलाच माझी प्रार्थना आहे की आता मला ह्यास्थितीतून बाहेर काढ. हीच आशा लावून मी बसलो आहे.

**अभंगाची शिकवण:-**

महाराज म्हणतात तशीच आपण प्रार्थना करू शकतो**. प्रार्थना व विनंती मधे फरक असतो. ज्याला विनंती केली आहे तो तिच्याकडे दुर्लक्ष करू शकतो. पण प्रार्थना नक्कीच ऐकली जाईल अशी खात्री प्रार्थना भक्ताला असते.**

तुकाराम महाराजांचे असे अभंग आहेत. तसेच समर्थ रामदासस्वामींचे "रघूनायका मागणे हेची आता" असा शेवटचा चरण असलेले करूणाष्टक साधाकांसाठी प्रार्थनेला घेता येते. **आपल्याकडे प्रात:स्मरणामधे प्रार्थना म्हणण्याची पद्धत आहे. अशी कोणतीतरी प्रार्थना रोज म्हणावी हीच ह्या अभंगाची शिकवण आहे.**

**ॐ**

*****************

**प्रार्थनापर अभंग : देवाकडे काय मागावे**

**अभंग १ ला**

हेंचि दान दे गा देवा । तुझा विसर न व्हावा ॥
गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥
नलगे मुक्ति धन संपदा । संतसंग देई सदा ॥
तुका म्हणें गर्भवासी । सुखें घालावें आम्हासी ॥ ३ ॥

**अभंग २ रा :-**

कुमुदिनि काय जाणें तो परिमळ । भ्रमर सकळ भोगितसे ॥ १॥
तैसें तुज नाही ठावें नाहीं तुझें नाम। आम्हीच तें प्रेमसुख जाणों ॥ २॥
माते तृण बाळा दुधाची तें गोडी । ज्याची न ये जोडी त्यासी कामा ॥ ३॥
तुका म्हणें मुक्ताफळ शिंपीपोटी ।नाही त्याची भेटी भोग तेथें ॥ ४॥

**अभंग १ चा शब्दार्थ :-**

हे देवा , हेच दान दे की तुझा विसर मला पडणार नाही.॥१॥
मी तुझे गुण प्रेमाने गाईन कारण हीच माझी खरी संपत्ती आहे ॥ २॥
मला मुक्ती , धन संपदा कांहीही नको, फक्त नेहमी संतसंग ( हेच दान) दे ॥ ३।।
ह्यासाठी जरी मला तू पुन: गर्भवास दिलास तरी चालेल. मी हा गर्भवास आनंदाने भोगेन ॥ ४॥

**अभंग २ चा शब्दार्थ :-**

कुमुदिनीला स्वत:तील परिमळाची जानीव नसते पण भुंगा मात्र त्याचा आनंद भोगत असतो ॥१॥ त्याच प्रमाणे ( हे देवा पांडुरंगा ) तुला तुझे नाव ठावूक नाही. आम्हालाच ते घेण्याचे प्रेमसुख माहीत आहे ॥ २॥ गाय गवत खाते पण तिच्या वासराला दूधाचीच गॊडी माहीत असते, त्याचि काशाबरोबरही तुलना होत नाही ॥ ३॥ तुका म्हणतो की मोती ज्या शिंपल्यात तयार होतो , त्या मोत्याचा भोग घेणे ( दागिने घालून आनंद घेणे ) हे मात्र शिंपलीला ठावूक नसते.

**अभंगाची पार्श्वभूमिका :-**

समजा भगवंत आपल्यासमोर प्रगट झाले व आपल्याला वर माग म्हणाले तर आपण काय मागू ? ह्या वर विचार करायचा झाला तर प्रथम आपल्याला प्रार्थना व विनंती ह्यामधील फरक पण ध्यानी घेणे आवश्यक आहे.

आपण प्रार्थना नेहमी अशा भावाने करत असतो की आपण जे मागू ते आपल्याला नक्कीच दिले जाईल. आपल्याला ह्या विषयी कांहीएक शंका मनात नसते. शिवाय प्रार्थना करतांना मनामधे पुर्ण श्रद्धा असते की प्रार्थना ऐकली जाईलच.ह्या उलट जेंव्हा कोणाकडे आपण विनंती करतो

तेंव्हा ही विनंती एखादवेळी ऐकली जाणार नाही हे आपल्याला माहीत असते. आपली विनंती ऐकली जाई ही सुद्धा खात्री देता येत नाही.

भक्तासाठी भगवंत हीच माऊली असते . आई नेहमीच आपल्या मुलांच्या भल्याबाबतच विचार करते. आपल्या बाळासाठी काय योग्य व काय अयोग्य ते तिला पूर्णपणे माहीत असते. हे भक्ताला पण ठाऊक असते व तो हे सर्व माहीत असते तरीही बरेच वेळा भगवंताची प्रार्थना करतो.

म्हणुनच वारकरी संप्रदायामधे हे अभंग ( अभंग १ ला हेचि दान देगा देवा चरणाचा )प्रवचन,,कीर्तनाच्या शेवटी म्हणण्याची प्रथा आहे.

**ह्या पार्श्वभूमीवर अभंगाचा अर्थ पाहणे उचित ठरते. " हेचि दान .... “ हा अभंग ही प्रार्थना आहे व दुसरा अभंग ( कुमुदिनी काय जाणे.......) हा अभंग नामस्मरणाची गोडी वर्णन करणारा आहे.**

**अभंगाचे अर्थस्पष्टीकरण :-**

अभंगाच्या पहिल्याच चरणामधे तुकाराम महाराजांनी भगवंताकडे प्रार्थना केलेली आहे. महाराज हेच म्हणताहेत की हे देवा मला तुझा विसर न पडो . अभंगाच्या ( ३ रा) चरणात महाराज पुढे ही पण मागणी करताहेत की मला सत्संग घडावा.
मला धन ,संपती फार काय मोक्ष सुद्धा नको हे ते भगवंताला प्रार्थना करताना स्पष्ट केले आहे.

आपण महाराजांचे कांही अभंग मागे पाहिलेच आहेत. त्यांवरून हा मुद्दापण स्पष्ट झाला आहे की जेंव्हा एखाद्याच्या हातून भगवंताचे नामस्मरण करणे घ्डते व संत ग्रंथांमधे सांगितल्यानुसार आचरण ठेवले तर असा भक्त सहजत: सतत भगवंताच्या संगामधेच असतो.

**हेच महत्वाचे असल्यामुळे तुकाराम महाराजांनी अभंगात म्हटले आहे की त्यांना भगवंताचे गुण गाण्याची , त्याचे नामस्मरण करण्याची , ( व अर्थात सर्वांचे कल्याण करण्यासाठी ) आवड प्रेम लागो.**

**ह्याठिकाणी आता अभंग दुसऱ्याचा शब्दार्थ पाहिला तरी पुरेसे आहे.**ह्या अभंगात तुकाराम महाराजांनी भगवद्स्मरण करण्यात , भगवंताचे गुण गाणारी भजने गाण्यात जो आनंदाचा अनुभव मिळतो त्याची गोडी कशी असते ते समजावे म्हणून कमळ-भुंगा, गाय-वासरू, मोती-शिंपला ही उदाहरणे ( दृष्टांत ) दिले आहेत.

*ह्या अभंगात तुकाराम महाराज म्हणताहेत की :-*
*अ) कंमळपुष्पाला स्वत:मधील सुगंधाची जाणीव नसते , पण भुंग्याला असते व म्हणुन भुंगा तो आनंदाचा भोग भोगत असतो.*
*ब) गाय गवत खाते व दूध देते . तिला स्वत:च्या दुधाची गोडी कशी असते ते कोठे ठावूक असते !. ती गोडी दूध पिणारे वासरूच जाणते. त्याच्या द्रूष्टीने ह्या दुधाची सर कशालाच नसते,*
*क) ज्या शिंपल्यामधे मोती तयार होतो त्या शिंपल्याला मोत्याचे मोल व मोत्याचे दागिने घालण्याच्या मुळे मिळतो त्या आनंदाची कल्पनाच नसते.*

*त्याप्रमाणेच हे भगवंता , तुला तुझे नाम घेण्याची काय गोडी आहे ते तुम्हाला ठावूक नाही. तो आनंद काय ह्याचा अनुभव आम्ही भक्तच भोगू शकतो. असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे.*

*बरोबरच आहे. भगवंत सर्वत्र , सर्वव्यापी असल्याने कोण कोणाचा भोग घेणार! भोग गेण्यासाठी द्वैत लागते. देव व भक्त वेगळे असावे लागतात व नंतरच भक्ताला देवाचे नाम घेण्याचे सुख काय आहे तो अनुभव येऊ शकतो.आपण द्वैतामधेच आहोत व म्हणूनच आपल्याला पण हा आनंदाचा अनुभव मिळू शकतो.असो.*

*अभंगाचा चौथ्या चरणात तुकाराम महाराज म्हणताहेत की हे भगवंता तुझ्या नामसंकीर्तनाची गोडी एवढी अद्वितीय आहे की ती पुन:पुन्हा अनुभवता यावी त्यासाठी तुम्ही मला पुन: माणसाचा जन्म द्यावा.*

**अभंगाची शिकवण :-**

अभंगाची शिकवण हीच आहे की आपल्याला भगवंताकडे काय मागावे हे लक्षांत यावे.

स्पष्टच आहे की भगवंत आपल्याला धन, संपत्ती, मान सन्मान ईत्यादी सर्व कांही देऊ शकतो. पण हे सर्व मागणे म्हणजे समर्थ रामदास म्हणतात तसे " कामधेनू कडे ताक मागण्य़ासारखे आहे"ह्या नरजन्माचे सार्थक व्हावे असे ज्याला मनापासून पटले असेल तो भगवंताकडे फक्त तुझे प्रेम,भक्ती व ज्यान दे हेच मागेल.

आपली मनोभूमिका अशी आहे कां? हे तपासून पाहण्याची संधीच ह्या निमित्ताने आपल्याला मिळाली आहे.

ॐ

ज्यांच्या कृपेने हे सर्व विवरण झाले त्या सद्‌गुरुंच्या चरणी हे विवरण अर्पण असो.

## ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान मराठी साक्षरांमध्ये वाचनाची आवड निर्माण व्हावी आणि लेखक व कवींना एक सशक्त व्यासपीठ मिळावे या दुहेरी हेतूने स्थापन झाले. मराठीत एक जबरदस्त वाचन संस्कृती निर्माण व्हावी, तरुणांनी भरपूर वाचन करावे, ग्रामीण भागातील तरुणांना मोबाईलवर पुस्तके उपलब्ध व्हावीत, परदेशस्थ मराठी वाचकांना सहजासहजी इंटरनेटवर पुस्तके मिळावीत हे आमचे स्वप्न. जगातील चाळीस देशांतील सुमारे साडेतीन लाख वाचक या चळवळीचे सभासद आहेत. महाराष्ट्राच्या जवळपास प्रत्येक तालुक्यातील खेड्यापाड्यांत ई साहित्य चे वाचक आहेत. याशिवाय सुमारे तीस ते चाळीस लाख वाचक ई साहित्यच्या वेब्साईटला भेट देऊन पुस्तके डाऊन लोड करतात. पण याने आमचे समाधान नाही. जोवर महाराष्ट्रातील प्रत्येक साक्षर हा वाचक होत नाही तोवर ही चळवळ चालेल. आमचे लक्ष्य सहा कोटींचे आहे. आमच्या पाठीशी माऊलींचा आशिर्वाद आहे. “ ईये मराठीचिये नगरी, ब्रह्मविद्येचा सुकाळू करी” ही त्यांची प्रार्थना आपणा सर्वांकरवी सुफ़ळ संपूर्ण व्हावी.

आमच्या वाचकांना एकच विनंती. आपल्या ओळखीच्या किमान दहा साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला पाठवा. अशा रितीने आपण तीनाचे तीस आणि तिसाचे तिनशे होऊ. या मराठीचिये नगरी ब्रह्मविद्येचा सुकाळू व्हायला वेळ नाही लागणार. सर्वांची साथ असेल तर.

एवढी विनंती मान्य कराच.

ई मेल पत्ते esahity@gmail. com या पत्त्यावर पाठवा बरं!